# नकलाकार भोंडे

## व्यक्ति आणि कला

प्रस्तावना

भा. वि. वरेरकर, एम्. पी.

लेखक

वामनराव परांजपे,

बी. ए., एल्एल्. बी.

मूल्य दोन रुपये ऐंशी नये पैसे

एकमेव विक्रेते

व्हीनस बुक स्टॉल : पुणें २

म हा रा ष्ट्रा चा
असाच एक
लाडका कलावंत
श्री. बालगंधर्व
यांस —

# महाराष्ट्र रसिकांस —

नक्कल करणाराची नक्कल कशी करावयाची? दुसऱ्यांचीं चित्रें रंगविणाऱ्याचें चित्र रंगविणें अवघड. तथापि भोंडे मंडळींच्या प्रेमानें व भोंडे-सत्कार-समितीच्या आग्रहानें प्रवृत्त झालों आहें. आपलेपणाचा धागा सूक्ष्म असला तरी मोठा टणक असतो.

वास्तविक गोपाळरावांच्या लौकिक जीवनांत अलौकिक असें कांहींच नाहीं. तथापि त्यांच्या ठिकाणीं नकलांचा जो अद्‌भुत व विलक्षण कलागुण आहे, त्यानें त्यांचें जीवन प्रभावी व प्रकाशमान् झालेलें आहे. अश्वत्थाम्याप्रमाणें तोच त्यांच्या मस्तकांतला मणि आहे. नकलेला त्यांनीं कलेच्या उच्चासनावर बसविलें. हजारोंना आनंद दिला. दिवंगतांचें दुर्लभ दर्शन घडविलें. लोक-रंजनाबरोबर लोकप्रबोधनहि साधलें. आपल्या कलेची माला समाजाला वाहिली. हीच त्यांची खरी थोरवी. गोपाळरावांचा लौकिक व लोकप्रियता हीं त्यांच्या सुस्वभावाचीं व समाजसेवेचीं मधुर फळें आहेत. हें त्यांच्या आयुष्याचें सार उठून दिसावें अशा बेतानेंच पुस्तक रचलें आहे. वैयक्तिक भाग आटोपता घेऊन कलाजीवनाला अधिक जागा दिली आहे. पाल्हाळ टाळून मुद्द्याशीं गांठ घातली आहे. Paint me as I am हें तत्त्व कांहीं जणांना पसंत पडतें. गोपाळरावजींच्या मनाची धारणा तशीच आहे. माझाहि यत्न असाच आहे कीं, भोंडे आहेत तसे दिसावे. हा दृष्टिकोन आपणांस रुचेल असा विश्वास वाटतो.

गुढी पाडवा, शके १८७९
शिवरामपंत परांजपे रस्ता,
६ शुक्रवार, पुणें २.

**वामन कृष्ण परांजपे**

# भोंडे - कला - प्रशस्ति

मातेला हंसवी, पित्यास फसवी, मित्रांसही मोहिलें
सोंगें सुंदर पाहुनी रसिकही चित्तांतरीं रंगले
जादूगार असा हरी जनमना– बोधें तयां उद्धरी
श्रीकृष्णोपम भासते जणुं जनां 'गोपाळ' लीला खरी

काळानें गिळिल्या– पुन्हां विविध त्या मूर्ती पहा सत्वरी
साक्षात्कार असा क्षणीं घडवितो तो हा कलाकेसरी
सर्वांचें प्रतिबिंब-चित्र हलतें दावी कला-दर्पणीं
ऐसा हा नवनाट्यमंडित गुणी शोभे पहा अग्रणी

झाले आजवरी कितीक, पुढतीं होतील– आहेतही
कोणी दाविल का अशी परि कला मोठा कलाकारही ?

रणछोड पांडुरंग भोंडे

# माझे दोन शब्द —

माझ्या नकलांमध्यें कला आहे असें लोक म्हणतात. पण तें माझें मला कांहीं उमगत नाहीं. याचें कारण माझ्या नकला मीं अजून पाहिलेल्या नाहींत ! पहाण्याचा संभवहि नाहीं. चरित्रलेखक श्री. वामनराव परांजपे यांनीं पुस्तकांत मला उद्देशून जो तुकारामाचा अभंग घातला आहे, तो मला फार आवडला.

**करितों कवित्व म्हणाल हें कोणी ।**
**नव्हे माझी वाणी पदरींची ॥**
**माझिया युक्तीचा नव्हे हा प्रकार ।**
**मज विश्वंभर बोलवितो ॥**

मला नकला कशा करतां येतात, तें माझें मलाच कळत नाहीं. करतों खऱ्या. आणि लोकांना त्या आवडतात हीहि गोष्ट खरी. माझ्यांत गुण असो वा नसो, महाराष्ट्रांतल्या रसिक प्रेक्षकांनीं माझें भरपूर कोडकौतुक व चीज केलें आहे. त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें.

अनेक कारणांस्तव प्रस्तुतसारखा मजविषयींचा ग्रंथ माझ्या पश्चात् व्हावा, अशी माझी इच्छा होती. परंतु मला पाऊणशें वर्षें पुरीं झालीं, हा आनंदाचा प्रसंग साधून माझे कुटुंबीय व विशेषतः माझे धाकटे बंधु नानासाहेब, आणि श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार प्रभृति मित्रमंडळी व चहाते यांनीं उचल खाऊन याविषयीं चंग बांधला. त्यांनीं वामनरावांना गांठून त्यांच्याकडे हें काम सोंपविलें व त्यांच्याकडून पुरें करवून पदरांतहि पाडून घेतलें !

श्री. वामनराव परांजपे यांनीं फार कौशल्यानें हें पुस्तक लिहिलें आहे, यांत शंका नाहीं. वकील, वक्ते व लेखक म्हणून त्यांची कीर्ति मी ऐकत होतों. एकदां मला त्यांचें शाकुंतलावरील रसभरित व्याख्यान ऐकण्याचाहि योग आला होता. तथापि ते लेखनकलेंत इतके तरबेज असतील, याची मला कल्पना नव्हती. या पुस्तकाचें त्यांचें हस्तलिखित वाचल्यानंतर माझ्यांतले कांहीं गुण व गोष्टी माझ्या लक्षांत आल्या ! परांजपे घराण्याचा माझा स्नेह-संबंध तीन पिढ्यांचा — कै. शिवरामपंतांपासून. प्रस्तुत लेखकाचे वडील कै. कृष्णाजी शिवराम ऊर्फ बाळासाहेब परांजपे हे डेक्कन कॉलेजमध्यें शिकत

होते, तेव्हांपासूनचे माझे स्नेही. वामनरावांना तर मी जन्मापासून पाहतों आहें. मी अक्षरशः त्यांचें बारसें जेवलेलों आहें. परंतु सदर पुस्तकांत त्यांनीं माझा जो 'फोटो' काढला आहे, त्या शब्दचित्रावरून तेच माझें बारसें जेवले आहेत कीं काय, असा मला भास झाला. मी स्वतः नकलाकार खरा, पण माझी हुबेहुब नक्कल त्यांनीं शब्दांत वठविली आहे! आपला वकिलीचा धंदा संभाळून दीड-दोन महिन्यांत त्यांनीं मजविषयींचें हें पुस्तक लिहून दिलें, याचें आश्चर्य वाटतें. इतक्या थोड्या अवधींत आपल्या सुंदर हस्ताक्षरांत बिन-खाडाखोडीचें हस्तलिखित त्यांनीं पाठवून दिलें, तें पाहून मी थक्कच झालों. त्यांत मधेंच अमेरिकन क्रांतीचें कसलेंसें लिखाण त्यांनीं लिहून दिलें तें वेगळेंच. वामनरावांनीं लिहिलेला हा गोपाळरावांचा ग्रंथ म्हणजे 'वामन गोपाळ यांचा सार्सापरिला' आहे, असें मीं वामनरावांना विनोदानें म्हटलें. तेव्हां ते हंसून वकिली थाटानें म्हणाले, "तुमच्या थट्टेखोर स्वभावाचें मीं जें वर्णन केलें आहे, त्याचाच तुम्हीं हा पुरावा मला दिलात!" असो.

मला पुन्हां पुन्हां वाटतें कीं, मी इतक्या गुणगौरवाला पात्र नाहीं. माझ्या गुणपरमाणूचा पर्वत केला आहे. प्रारंभीं माझी हेटाळणी पुष्कळ झाली. ते दिवस अजून आठवतात. तेव्हांच्या शिव्या आणि आतांच्या ओव्या पाहून मनाला अचंबा वाटतो. मी प्रांजळपणानें इतकेंच म्हणतों कीं, पूर्वीं इतकी अवहेलना करावयाला नको होती आणि आतां इतका गौरवहि करावयाला नको आहे! या दोन्ही टोकांच्या मध्यें कुठेंतरी माझी जागा आहे, असा माझा समज आहे. माझी वेडीवाकडी सेवा लोकांनीं गोड करून घेतली, यांतच मला भूषण वाटतें. आणखी काय सांगूं? वर लिहिलेले शब्द नक्कल नसून माझें खरेंखुरें हृद्गत आहे.

**गोपाळ विनायक भोंडे**

# भोंडे सत्कार समितीतर्फे निवेदन

सुप्रसिद्ध नकलाकार भोंडे हे महाराष्ट्राचे आद्य व अद्‌भुत कलावंत आहेत. त्यांना नुकतींच पाऊणशें वर्षे पुरीं झालीं, या निमित्तानें त्यांचा व त्यांच्या कलेचा गौरव करण्याकरितां त्यांच्या अनेक चहात्यांनीं व कलाप्रेमी लोकांनीं 'भोंडे सत्कार समिति' स्थापन केली. श्री. गोपाळराव भोंडे यांच्या कलादर्शनासंबंधींचा एक ग्रंथ चिरंतन स्वरूपांत महाराष्ट्र वाचकांपुढें येणें हें महत्त्वाचें काम होतें.

सदर ग्रंथलेखनाचें काम आम्हीं काळकर्ते कै. शिवरामपंत परांजपे यांचे नातू व सुप्रसिद्ध लेखक श्री. वामनराव परांजपे, वकील, यांजकडे सोंपविलें व अत्यंत समाधानाची गोष्ट अशी कीं, त्यांनीं तें काम हौसेनें व आत्मीयतेनें केलें; एवढेंच नव्हे तर तें काम त्यांनीं आमच्या अपेक्षेबाहेर अत्यंत अल्पावधींत पुरें केलें. सदर ग्रंथांतील व्यक्तिविषयक मनोरंजक वृत्तान्त आणि अनुकरण-कलेची मीमांसा व वर्णन बहुमोलाचें व यथायोग्य आहे. मराठी भाषेंतील नकलांच्या कलेची चिकित्सा व वर्णन करणारा या प्रकारचा हा पहिलाच ग्रंथ आहे. यामुळें मराठीच्या चरित्र-वाङ्मयांत व टीका-वाङ्मयांत भर पडली असून हा ग्रंथ बहुजनसमाजाला उपयुक्त व प्रिय होईल, असा आम्हांला विश्वास वाटतो.

लेखक श्री. वामनराव परांजपे व या कामीं ज्यांनीं ज्यांनीं हरप्रकारें साह्य केलें त्यांचे व एकमेव विक्रेते 'व्हीनस बुक स्टॉल'चे चालक श्री. अ. ह. लिमये व साधना प्रेसचे चालक श्री. यझे यांचे 'भोंडे सत्कार समिती' तर्फे मी मनःपूर्वक आभार प्रदर्शित करतों. त्याचप्रमाणें या ग्रंथाची प्रस्तावना श्री. भा. वि. ऊर्फ मामासाहेब वरेरकर (मध्यवर्ती राज्यसभेचे सदस्य) यांनीं लिहून पाठविली, याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानीत आहें.

योजलेल्या कार्याची पूर्तता होऊन आज शके १८७९ च्या वर्षारंभीं पाडव्याच्या सुमुहूर्तावर हा ग्रंथ वाचकांच्या हातीं पडत आहे, ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे.

चैत्र शु. प्रतिपदा शके १८७९
१८७ कसबा, पुणें २.

**गंगाधरराव नारायणराव मुजुमदार**
**(सरदार आबासाहेब)**
अध्यक्ष, भोंडे सत्कार समिति.

# प्रस्तावना

सर्व कलांत अभिनयकला ही सर्वश्रेष्ठ समजली जाते. ज्या वेगवेगळ्या कला आहेत, त्यांचीं स्वरूपें प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष आहेत. कांहीं कलांच्या क्षेत्रांत तो तो कलावंत व्यक्तित्वानें व्यक्त होतो तर कांहींत त्याची कला अव्यक्त असते. कलेचें प्रत्यंतर ज्या वेळीं व्यक्त असतें त्या वेळीं त्या कलाकार व्यक्तीला वैशिष्ट्यानें महत्त्व प्राप्त होत असतें, गायन, नृत्य, वक्तृत्व, अभिनय या कला कलाकाराचें व्यक्तित्व प्रस्थापित करतात. लेखन, चित्रकला प्रभृति कला या कलाकाराला प्रख्याति देत असल्या तरी त्याचें व्यक्तित्व त्या कलेच्या क्षेत्रांत दृष्टीआड राहतें.

म्हणूनच अभिनयकला ही वैयक्तिक महत्त्वाच्या दृष्टीनें श्रेष्ठ ठरते. अभिनयांतहि वेगवेगळे प्रकार आहेत : नृत्यांतील अभिनय मूक असल्यामुळें त्याचें स्वरूप अतिरंजित असतें. नाट्यांतील अभिनयाला शब्दाची जोड असल्यामुळें तो वास्तवतेवर आधारलेला असतो. नाट्याभिनयांतील ही वास्तवताहि संपूर्ण रीत्या यथातथ्य असूं शकत नाहीं. त्या वास्तवतेला कल्पकतेची मर्यादा असते, त्याचप्रमाणें दृश्य परिणामाच्या अनुषंगानें अत्यभिनयाचा अल्पसा संपर्क असूनहि हा नाट्याभिनय वास्तव समजला जातो.

नाट्याभिनय सापेक्ष असतो लेखकानें निर्माण केलेली भूमिका अभिनयाच्या द्वारें व्यक्त केली जात असतांना तिला त्या नटाच्या बुद्धिमत्तेची केव्हां केव्हां मर्यादा पडत असते. लेखकानें निर्माण केलेली एकच भूमिका अनेक नटांच्या हातीं वेगवेगळें स्वरूप धारण करीत असते. शेक्स्पिअरनें निर्माण केलेली हॅम्लेटची भूमिका घेतली तर गॅरिक, सर हेन्री आयर्विन, एच्. बी. आयर्विन, मॅथेसन लँग यांच्याप्रमाणेंच अलीकडील लॉरेन्स ऑलिव्हर आणि जॉन गीलगुड इत्यादि टनांनीं ती आपापल्या बुद्धिमत्ता आणि कल्पकतेप्रमाणें वेगवेगळ्या स्वरूपांत वठविली असल्याचें दिसून आलें आहे. नाटककारानें निर्माण केलेली भूमिका मूळ स्वरूपांत जशी असते तशी ती नटाकरवीं वठविली जातेच असें नाहीं. केव्हां केव्हां अभिनयाच्या आविष्काराची ती भिन्नता नटाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करीत असते. तिथें बऱ्यावाइटाचा प्रश्न येत नाहीं. एकाहून दुसरी अधिक चांगली होतो, असेंहि म्हणतां

येत नाहीं. सर्वच भूमिका साऱ्याच नटांकरवीं उत्तम स्वरूपांत प्रदर्शित केल्या गेल्या, असेंच समजलें जातें. तिथें अभिनयाच्या अचूकपणाची कसोटी नसते. कारण लेखकानें निर्माण केलेली मूळ भूमिका लिखित असल्यामुळें तिचा आविष्कार अमुक एका विशिष्ट स्वरूपांत झाला पाहिजे, असें म्हणतां येत नाहीं. त्या भूमिकेचा तो आविष्कार लेखकाच्या मूळ कल्पनेला विसंगत नसला, प्रेक्षकांच्या दृष्टीनें हृद्य असला, मानसशास्त्राच्या दृष्टीनें अप्रस्तुत नसला, म्हणजे तो आविष्कार योग्य झाला, असें समजलें जातें. एवढ्या कसोटीला तो उतरला म्हणजे तो आविष्कार कितपत यथातथ्य आहे, याची कसोटी कुणी लावीत नाहीं.

अभिनयाचें स्वरूप अमर्याद असतें, हें वरील हॅम्लेटच्या उदाहरणावरून सहज कळून येण्यासारखें आहे. भावाविष्काराला मुद्राभिनय, अंगविक्षेप, देहाच्या विशिष्ट अवयवांची विशिष्ट प्रकारें केलेली हालचाल, उच्चारधर्म, आवाजाची फेक आणि शब्दामागील असलेला भावनेचा अधिक्षेप यथातथ्य स्वरूपांत झाला, प्रेक्षकाच्या सहृदयी बुद्धिमत्तेला पटण्याइतक्या यथा-तथ्य स्वरूपांत झाला म्हणजे–तो अभिनय सफल झाला, असें समजण्यांत येतें. नाट्याभिनयाची कसोटी एवढ्याच मर्यादेतून लागत असते.

नाटकांतील अभिनय कथासूत्राच्या अनुरोधानें जे पात्रांचे स्वभावविशेष लेखकानें योजले असतील त्यांना अनुसरून असतो. त्याला एक व्यापक स्वरूप असतें. नाटकांतील अनेक भूमिकांतील एका भूमिकेच्या आविष्काराचें स्वरूप अन्य भूमिकेशीं जो त्या विशिष्ट भूमिकेचा संबंध असतो त्याला अनु-सरून वेगवेगळ्या स्वरूपांत प्रतीत होत असतें. त्याला अपवाद एकच : जनांतिक अथात् स्वगत भाषण. नाटकांच्या तंत्रांत जुन्या स्वगत भाषणाला महत्त्व असे. अंतःकरणाच्या खालच्या थरांत दडलेले विकार वाचेच्या द्वारें व्यक्त करून दाखविण्यांत या स्वगतांची कसोटी असे. इतर पात्रांशीं संबंध येत असल्या-मुळें नटाच्या अभिनयकौशल्याला जी एक मर्यादा पडते, ती स्वगतांच्या अभिनयांत दुरावलेली असल्यामुळें अभिनयदृष्ट्या नटाचें व्यक्तित्व त्यांत पूर्णत्वानें प्रतीत होतें. या विशिष्ट परिस्थितीमुळें "स्वगतात्मक अभिनयाला नाटकांत विशिष्ट स्थान असे. आणि म्हणूनच त्या अभिनयाला प्रेक्षकांच्या दृष्टीनें महत्त्व येत होतें.

या महत्त्वालाहि एका दृष्टीनें मर्यादा होती. त्या अभिनयालाहि कसोटी नव्हती. हॅम्लेटचीं स्वगतें वेगवेगळा नट वेगवेगळ्या प्रकारें करून दाखवीत होता, तरी तें स्वरूप अधिकृत मानण्यांत येत होतें. एवढें खरें कीं, तें नाट्य होतें. त्यांत वास्तवता नव्हती, याथातथ्य नव्हतें.

अभिनयकलेबद्दल जिथें जिथें म्हणून कांहीं लिहिलें गेलें आहे, तिथें अभिनयाची कसोटी व्यापक स्वरूपांत राहिली आहे. व्यक्तिदर्शनाचा आविष्कार हा नाट्यन्तर्गत अभिनयापेक्षां अगदीं वेगळ्या स्वरूपाचा आहे. नाटकांतहि क्वचित् व्यक्तिदर्शनाचे प्रसंग आलेले आहेत. अमेरिकन नाटकांत अब्राहाम लिंकन याच्या चरित्रावर जीं एकाहून अधिक नाटकें लिहिलीं गेलीं आहेत, त्यांत या नायकाच्या भूमिकेंत व्यक्तिदर्शनाची कसोटी लागली आहे. डिस्राएलीच्या जीवनांतहि हीच कसोटी प्रतीत होत असे. मराठी भाषेंत मात्र अशा प्रकारचें व्यक्तिदर्शन झालेलें नाहीं नामदार गोखले यांजसारखी दिसणारी किंवा लोकमान्य टिळकांसारख्या दिसणाऱ्या कांहीं भूमिका रंगभूमीवर दाखविल्या गेल्या होत्या. पण तें नामदार गोखल्यांचें किंवा लोकमान्य टिळकांचें व्यक्तिदर्शन नव्हतें. लोकमान्यांच्या जीवनावर लिहिलेलें एक हिंदी नाटक किर्लोस्कर मंडळीनें रंगभूमीवर आणलें होतें. पण त्यांतील लोकमान्यांच्या पोशाखापलीकडे दुसरें कोणतेंच व्यक्तिदर्शन दिसून आलें नव्हतें. अर्थात् या दृष्टीनें मराठी रंगभूमीवर व्यक्तिदर्शनाची कला क्वचितच आविष्कृत झाली असेल.

प्रस्तुत पुस्तकांतील चरित्रनायक हे नकलाकार म्हणून ओळखले जात होते. नक्कल ही केव्हांहि अस्सलबरहुकूम असतेच असें नाहीं. बहुधा ती मूळ भूमिकेची अल्प अगर अतिरंजित विकृति असते. या दृष्टीनें पहातांना श्री. भोंडे यांना नकलाकार म्हटलेलें मला केव्हांहि मान्य नव्हतें.

श्री. भोंडे यांचे हे प्रयोग मीं सुमारें त्रेपन-चौपन वर्षांपूर्वी मुंबईच्या एल्फिन्स्टन स्कूलमध्यें पहिल्यानें पाहिले, त्याच वेळीं त्यांना नकलाकार म्हटलेलें मला पटलें नाहीं. श्री. भोंडे यांच्यापूर्वी आणि नंतर जे कांहीं कलावंत हे प्रयोग करीत असत, ते नकलाकार होते त्यांच्या या प्रयोगांत मूळ भूमिकेच्या अभिव्यक्तीची विकृति दिसून येत असे; तो त्यांचा अभिनय यथातथ्य नसे. अतिवास्तव अभिनयापेक्षां अतिरंजित अभिनय बहुधा जास्त आकर्षक होत

असतो आणि म्हणूनच नकलाकारांचा अभिनय हा सामान्य प्रेक्षकांना आकर्षक वाटत होता. अशा त्या अतिरंजित अभिनयामुळें बहुधा हास्यानिर्मिति होत असे-अर्थात् त्या अभिनयाच्या पायीं मूळ भूमिकेचें विडंबन होत असे-तें यथातथ्य व्यक्तिदर्शन नव्हतें. श्री. भोंडे यांची कला या नकलाकारांपेक्षां अगदींच वेगळी होती. तें खरेंखुरें व्यक्तिदर्शन असे—आजहि आहे. ती मूळ व्यक्तीची कार्बन कॉपी होती. निसर्गनिर्मित जें साम्य व्यक्तिदर्शनांत आवश्यक असतें तें देखील फारशी रंगरंगोटी न करतां व्यक्त करून दाखविण्यांत भोंडे यांच्या कलेचा चरमोत्कर्ष दिसून येत होता. आवाज, शब्दोच्चार, हावभाव, विशिष्ट प्रकारच्या लकबा, हातवारे, चालण्याची आणि बोलण्याची ढब हीं सर्व इतकीं यथातथ्य असत कीं, अभिव्यक्त झालेली व्यक्तीच आपण प्रत्यक्ष समोर पाहत आहोंत कीं काय, असा जाणक प्रेक्षकाला भास होई. ते लहानसे चुटके नसत. चांगलीं अर्ध्या तासाचीं भाषणें मूळ व्यक्तीच्या सर्वस्वस्वरूपांत दाखविलीं जातांना एक क्षणभर सुद्धां त्यांची विकृति होत नसे.

श्री. भोंडे यांनीं ज्या ज्या व्यक्ति या व्यक्तिदर्शनासाठीं निवडलेल्या होत्या त्या, त्या काळांत सर्वांच्या समोर येणाऱ्या व्यक्ति होत्या. त्यांच्या सर्व लकबा सामान्य प्रेक्षकांच्या ओळखीच्या होत्या. त्यांचें यथातथ्य दर्शन प्रेक्षकांच्या अंतःकरणाला गुदगुल्या करीत असे. एवढेंच नव्हे तर त्या व्यक्तीलाहि आपण आपलें स्वरूप आरशांत पाहतों आहोंत कीं काय, असा भास होण्याइतकें अचूक व अविकृत असे. यांतच श्री. भोंडे यांच्या कलेची खरी कसोटी होती.

या व्यक्तिदर्शनकलेबद्दल अभिनयकलेच्या ग्रंथांतून फारशी चर्चा केल्याचें दिसून येत नाहीं. नाट्याभिनयाबद्दल वर जें लिहिलें आहे, त्या दृष्टीनें पाहतांना व्यक्तिदर्शनकला ही नाट्याभिनयकलेपेक्षां किती श्रेष्ठ दर्जाची आहे, कौशल्याच्या दृष्टीनें किती परिणामकारक आहे, कलेच्या मर्यादेचा या व्यक्तिदर्शन-कलेंत किती अतिक्रम केला जात आहे, अवलोकन-शक्तीची किती कसोटी लागत आहे, याचें प्रत्यंतर पहायचें असलें तर तें श्री. भोंडे यांच्या या व्यक्तिदर्शन-प्रयोगांतच दिसून येतें. अभिनयकुशल सर्व-साधारण नट हा नाटककाराच्या सामर्थ्यावर लोकप्रिय होत असतो—म्हणजे त्याच्या कलेंत नाटककाराच्या कल्पकतेची भागीदारी असते; तसें व्यक्ति-दर्शनाचें नाहीं. व्यक्तिदर्शन-कला ही स्वतंत्र आहे, स्वयंपूर्ण आहे; तिचा

आविष्कार करण्यांत दुसऱ्या कुणाचीहि भागीदारी संभवत नाहीं. या कलेंत कलावंताच्या अवलोकनशक्तीची सूक्ष्मता आणि तिची तीव्रता पूर्णत्वानें प्रतीत होत असल्यामुळें सर्वसामान्य अभिनयकुशल नटापेक्षां व्यक्तिदर्शन करणारा नट हा अनेक पटीनें श्रेष्ठ ठरतो. त्या दृष्टीनें पाहतां श्री. भोंडे हे असामान्य आहेत. त्यांच्या तोडीचा व्यक्तिदर्शक नट महाराष्ट्रांतच काय, पण भारतांतील कोणत्याहि भाषिक प्रदेशांत झाला असल्याचें मला तरी आढळून आलें नाहीं.

दुःखाची गोष्ट ही कीं, श्री. भोंडे यांच्या या कलेचें व्हावें तसें चीज झालें नाहीं. ते महाराष्ट्राच्या मर्यादेंत आपल्या कलेचा आविष्कार करीत राहिले, महाराष्ट्राच्या अभिमानानें राहिले—यामुळेंच तर त्यांच्या कलेचें यथायोग्य मूल्यमापन झालें नाहीं काय, असें केव्हा केव्हां वाटूं लागतें. त्यांच्या व्यक्तिदर्शनाचा चित्रपट घेतला जावा, म्हणून मीं प्रयत्न केला. पण अधिकारी व्यक्तींनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. आज ते वृद्ध झाले आहेत, तरीहि त्यांच्या कलेला यत्किंचितहि वैगुण्य आलेलें नाहीं. अजूनहि त्यांची कला चिरंजीव करण्याचे प्रयत्न मुंबई राज्य सरकार करील, अशी अपेक्षा करणें अस्थानीं होईल काय ?

कलावंत म्हटला कीं त्याच्या क्षेत्राला मर्यादा नाहीं. लेखन असो, अभिनय असो, चित्रकला असो, गायन किंवा नृत्यकला असो, कलावंताचें चीज करण्याचें स्थान म्हणजे विश्वविद्यालय होय. पुण्याचें विश्वविद्यालय श्री. भोंडे यांच्या कलेची उचित अशी दखलगिरी घ्यायला विलंब लावणार नाहीं, अशी अपेक्षा करून ही प्रस्तवाना पुरी करतों.

१९१, साउथ एव्हेन्यू,
नवी दिल्ली,
ता. २०-३-५७.

—मामा वरेरकर

# अनुक्रमणिका

* * *

## नकला करणें हा थट्टेचा विषय नाहीं

न्या. **य. वा. दीक्षित,** जज्ज, हायकोर्ट, मुंबई

श्री. गोपाळराव भोंडे यांच्या नकला पाहण्याची संधि सुमारें दीड महिन्यापूर्वी मला मिळाली. त्यांचें उतारवय लक्षांत घेतां त्यांचा उत्साह वाखाणण्यासारखा आहे. त्यांच्या कामामध्यें सहजता व मार्मिकपणा आहे. लो. टिळक यांची नक्कल काय किंवा डॉ. परांजपे यांची नक्कल काय, ते फारच सुंदरपणें वठवतात. लो. टिळक अगर डॉ. परांजपे आपल्यापुढें उभे आहेत, असें क्षणभर वाटतें. त्यांचा विशेष म्हणजे ज्योतिष्याची नक्कल किंवा जांवईबापूची नक्कल तितक्याच सुलभतेनें ते करून दाखवितात.

नक्कल करणें हा थट्टेचा विषय नसून अनुकरण करून दाखविण्याची ती एक कला आहे, असें मला वाटतें. गोपाळरावजींची स्तुति करावी तेवढी थोडीच आहे.

२७ नोव्हेंबर १९५६

* * *

## मूळ व्यक्तीचा भास

प्रि. **रा. प. सबनीस,** एम्. ए. ( कँटब ), नारायणगांव.

श्री. भोंडे यांच्या नकला चालू असतांना मूळ व्यक्तीच आपण पहात आहोंत, असा भास झाल्याशिवाय रहात नाहीं. एकदां फर्ग्युसन कॉलेजांत पहिल्या क्लबांतील विद्यार्थी जेवत असतां शेजारच्या क्लबांत श्री. भोंडे प्रो. भाट्यांची नक्कल करीत होते. तेव्हां प्रो. भाटे यांनीं दुसऱ्या क्लबांत भाटे कशाला आले आहेत म्हणून डोकाविलें, तों हे 'तोतया भाटे' त्यांना दिसले.

त्याचप्रमाणें टिळकांच्या शेवटच्या भाषणाची नक्कल करण्यासाठीं भोंडे व्यासपीठावर येतात, तेव्हां नमस्कार करण्यासाठीं टिळकांच्या जुन्या स्नेह्यांना घाईघाईनें उठलेलें मीं पाहिलें आहे.

# श्री. भोंडे कोणाच्या नकला करतात?

## त्यांपैकीं कांहींचीं नांवें

| इसम | कोणती भाषा | अनुक्रम | |
|---|---|---|---|
| १ | मराठी | (१) | लोकमान्य बाळ गंगाधर टिळक–स्वराज्यप्राप्तीची तळमळ व जनतेस उद्योग करण्याचा इषारा. |
| २ | ,, | (२) | लो. ना. बापूजी अणे (माजी गव्हर्नर, बिहार)–तात्यासाहेब केळकर यांना ६१ वें वर्ष लागलें त्या वेळीं ग्रंथसमर्पण करतांना केलेलें भाषण. |
| १ | ,, | (३) | कै. न. चिं. केळकर – डॉ. अणे यांनीं राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीमध्यें चाललेला सावळा गोंधळ व डॉ. अनसारी यांची कारवाई याबद्दल दिलेल्या व्याख्यानाच्या वेळीं अध्यक्षीय भाषण. |
| १ | ,, | (४) | स्वातंत्र्यवीर बॅ सावरकर – हैद्राबाद सत्याग्रह यशस्वी झाल्याबद्दल श्री. अण्णासाहेब भोपटकर यांच्या अभिनंदनपर भाषण. |
| १ | ,, | (५) | कै. भालाकार भोपटकर–मुंबई कायदे कौन्सिलांत एका जागेसाठीं पुण्यातर्फे उमेदवार म्हणून (सनातन्यांतर्फे) दिलेलें व्याख्यान. धर्मरक्षणा-साठीं व इतर उमेदवारांवर टीका. |
| १ | ,, | (६) | कै. शिवराम महादेव परांजपे. गणपति-उत्सवांत व्याख्यान नॉन-को-ऑपरेशनचा अवलंब करण्याचा इषारा. |
| १ | इंग्रजी | (७) | कै प्रोफेसर जिनसीवाले-विधवा विवाहाविरुद्ध व्याख्यान. |
| १ | ,, | (८) | डॉ. र. पु. परांजपे–अलजिब्रा थिअरी बोर्डावर व विद्यार्थ्याला खोटें न बोलण्याचा उपदेश. |
| १ | मराठी | (९) | कै. ल. रा. पांगारकर, मुमुक्षुकर्ते–भक्तिमार्गावर उपदेश व कै. मोरोपंत कवि यांचें वर्णन व थोरवी-आर्या म्हणण्यासहित. |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मराठी | (१०) | कै. चिंतामणराव वैद्य-तात्यासाहेब केळकर यांना इतिहास संशोधन संस्थेनें मानपत्र दिलें त्या वेळचें भाषण. |
| १ | इंग्रजी | (११) | कै. बॅ. जम्नादास मेहता-दारूबंदीविरुद्ध टीका, कॉंग्रेस मंत्रिमंडळाविरुद्ध झोड. |
| १ | ,, | (१२) | प्रि. गो. चिं. भाटे-लॉजिकवर व्याख्यान. |
| १ | ,, | (१३) | डॉ० रेव्हरंड मॅक्नीकल-डॉ० भांडारकर यांनीं नगर दुष्काळ मदतीसाठीं व्याख्यान दिलें त्या वेळीं दुजोरा. |
| १ | ,, | (१४) | महात्मा गांधी-परमेश्वराच्या आस्तित्वाबद्दल भाषण. |
| १ | ,, | (१५) | लेफ्टनंट कर्नल मॅक्डोनल्ड-सांचलेलें काम पुरें करण्याबद्दल दमदाटी. |
| १ | ,, | (१६) | क्लार्क भिडे, मिलिटरी खातें-मेंदू बिघडल्याबद्दल व विस्मरणाबद्दल स्वतःचें वर्णन. |
| १ | ,, | (१७) | प्लेग हॉस्पिटल नर्स-रोगी दाखल करण्याकरितां आलेल्या इसमाशीं बोलाचाल व एकमेकांचें बोलणें एकमेकांस न कळल्यामुळें झालेला घोटाळा. |
| ६ | ,, | (१८) | मिलिटरी खात्यांतील एका कारकुनाची चूक झाल्याबद्दल चौकशी, त्यांत एकंदर ६ इसम-पटवर्धन, चेंबूरकर, मुर्गेशमा पिले, चतर्जी, शिपाई, आठवले. |
| ३ | म. व इं. | (१९) | कै. लेलेशास्त्री, नू. म. वि.-कवितेचा तास चालू असतांना शेजारच्या वर्गांतून २ मुलांनीं गडबड केल्यामुळें त्यांना बोलावून शिक्षा केली-भिडे व वैशंपायन. |
| ३ | मराठी | (२०) | कै शंकरराव मुजुमदार, कै. नानासाहेब जोगळेकर व बालगंधर्व ( किर्लोस्कर नाटकमंडळी ) डेक्कन कॉलेजांत गंधर्व यांना गाण्यासाठीं बोलावणें आलें त्या वेळचा प्रसंग. अंतर्गत राजकारण. |

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | मराठी | (२१) | एक एक वाक्यामध्यें नू. म. विद्यालयांतील मास्तर लोक यांची ओळख-केसकर ( संतापशमन नाटकाचे कर्ते ), तेलंग, डोंगरे, सिनकर, बापट, आबा कुलकर्णी, दामुआण्णा कुलकर्णी, तात्या केळकर ( क्रीडाभवन ), विनायकराव आपटे, रामभाऊ गोखले, देव, करमेळकर, लेले. |
| १ | ,, | (२२) | विधवा बाईचें भाषण, जांवयाचें कौतुक व अवास्तव स्तुति, नसते गुण जांवयास चिकटविणें. |
| १ | ,, | (२३) | पोनस झालेले सरकारी नोकर श्री. खरे-भोंडे यांच्या नकलांबद्दल प्रथम स्तुति व नंतर स्वतःची नक्कल केली हें कळल्याबद्दल शिव्याशाप, फौजदारी भरण्याची भोंडे यांस धमकी. |
| १ | ,, | (२४) | पर्वते भटजी-श्राद्ध भलत्याच दिवशीं करण्याचा आग्रह व स्वतःची नक्कल केल्याबद्दल संताप. |
| १ | ,, | (२५) | केशवराव ज्योतिषी-हरवलेला जिन्नस सांपडेल किंवा नाहीं, याबद्दल केलेल्या प्रश्नास उडवाउडवीचें उत्तर व कुटुंब निवर्तल्याबद्दल हुंदके. वैराग्याचा, वेदांताचा व दुःखाचा एकत्र समुदाय. |
| ४ | ,, | (२६) | लग्नाच्या वेळच्या वाङ्‌निश्चयाच्या वेळीं ४ भटजींचे मंत्र व दक्षणेबद्दल आपापसांत भांडणें. |
| १ | ,, | (२७) | संगमनेरचे शीघ्रकवि **गंगारामसा** ( भोंडे यांच्या नकलांचें वर्णन कटावामध्यें ). |
| १ | ,, | (२८) | आहिताग्नि राजवाडे-वैदिक धर्माची महती. |
| १ | ,, | (२९) | वस्त्रहरणाच्या वेळचा द्रौपदीचा धावा. श्रीकृष्णाला मदतीसाठीं बोलाविलें. |
| १ | ,, | (३०) | आबा कुलकर्णी मास्तर : आत्मस्तुति व खुसखुशीत शिव्या. |

याशिवाय, अप्रसिद्ध अशा नातेवाइकांच्या, घरांतील कित्येक मंडळींच्या व आल्यागेल्यांच्या नकला किती तरी आहेत. त्यांची संख्या जवळ जवळ दोनशें भरेल.

* * *

पुस्तक लिहितांना —



नकलाकार भोंडे　　　　वामनराव परांजपे

श्री. अप्पासाहेब भोंडे

ह्यांच्या ७१ व्या वाढदिवसानिमित्त घेतलेलें छायाचित्र

पुणें २. ( भोंडे कुटुंब-मंडळी ) दि. ७-११-५१.



उभे राहिलेले :—(१) सौ. नलिनी, (२) रा. रणछोड, (३) रा. कृष्णराव, (४) सौ. शालिनी, (५) प्रवरा पुरंदरे.

खुर्चीवर बसलेले :—(१) सौ. यमुनाबाई, (२) रा. नानासाहेब, (३) रा. अप्पासाहेब, (४) रा. काकासाहेब, (५) रा. रामचंद्र, (६) सौ. रजनी.

खालीं बसलेले :—(१) चि. प्रकाश, (२) उषा, (३) शोभा, (४) प्रभाकर, (५) शैला, (६) रमेश, (७) शशिकांत, (८) मंगला.

: १ :

# जीवनवृत्त

## बालपणांतली बदनाम

सन १८९९ किंवा १९०० असेल. कोवळ्या वयाचा एक तरुण मुलगा – नूतन मराठीचा विद्यार्थी–पुण्याच्या अप्पा बळवंत चौकाच्या रस्त्यावर उदासवाणा भटकत होता. पुढें काय करावें, हें त्याला समजत नव्हतें. पेच येऊन पडला होता. एकदां तो विश्रामबागेंत सरकारी हायस्कूल होतें तिथपर्यंत जाई आणि पुन्हा मोरोबादादांच्या वाड्याजवळ असलेल्या आपल्या घराकडे परत येई. अशा त्याच्या सारख्या येरझारा चालू होत्या. त्याला आईवडील होते. घरांत सुस्थिति होती पण त्याचा जीव सुचित नव्हता. त्याला बाहेर तोंड काढण्याची चोरी झाली होती. शाळेंत देखील उजागरीनें जातां येत नव्हतें. शाळेंतल्या शिक्षकांनीं या विद्यार्थ्याला 'टारगट', 'टवाळखोर' ठरविलें होतें. नातलगांच्या व शेजाऱ्यापाजाऱ्यांच्याहि तक्रारी होत्या. त्याचे सख्खे मामा अनंतराव रेडे हे तर घरीं येऊन 'याचं तोंड पहायचं नाहीं मला' असें निक्षून सांगून तणतणत गेले होते. शाळेंतली प्रगति पहावी तर बाबाला पेपरांत २ किंवा ३ मार्क मिळालेले असायचे. जास्तींत जास्त एकदां ७ मिळाले होते! त्यामुळें वडीलहि मनांतल्या मनांत नाखूष आणि चिंतातुर होते. त्यांतून नू० म० वि० नें आतां स्कूल फायनल परीक्षेचा वर्गहि चालत नाहीं म्हणून बंद केला होता. त्यामुळें शाळा सोडण्याची पाळी आली होती. सगेसोयरे असून निराधार अशी चमत्कारिक स्थिति त्याच्या वांट्याला आली होती. बाहेर आणि घरांतहि तिरस्कार व अवहेलना जबर होत होती. त्याची मोठी पंचाईत झाली होती कीं, पुढें करायचें काय? विद्यार्थी दशेंतील हा तरुण मुलगा म्हणजेच पुढच्या आयुष्यांत प्रसिद्धि पावलेले गोपाळ विनायक भोंडे.

## 'नालायक आहे कार्टे!'

गोपाळचा मोठा अपराध कोणता असेल तर तो हा होता कीं, त्याला लहानपणापासून दुसऱ्यांच्या नकला करण्याची संवय जडली होती. फोटोग्राफीचा

नवीन नाद लागलेल्यानें कॅमेरा घेतला म्हणजे तो दिसेल त्याचे फोटो काढीत सुटतो. त्याला तो चाळाच लागतो. लहानग्या गोपाळलाहि तसाच नकला करण्याचा छंद लागला. माणूस नजरेसमोर आला कीं त्याचें चित्र त्यानें वठवावें. घरांतल्या भाडेकरू सोनाराची व शाळेंतल्या मास्तरांच्या नकला तर गोपाळ इतक्या हुबेहूब वठवी कीं, विचारूं नका. ही त्याची ‘ वाईट खोड ’ होती. शाळेंतले स्नेही-सोबती वाहवा करीत असल्यामुळें तो अधिकच शेफा-रला होता. हे गोपाळचे प्रकार किंवा चाळे मास्तरांच्या कानावर गेल्यामुळें त्यांचा संताप झाला होता. गुरुजनांबद्दल आदर बाळगण्याऐवजीं हा आमची कुचेष्टा, टवाळी करतो, असा समज होऊन शिक्षकमंडळी वर्गांतहि गोपाळवर धसकफसक करीत असे. ‘ नालायक - हलकट आहे कार्टे ! ’ असा शेलका शेरा त्याला मिळालेला होता. आतां नू० म० वि० चें हायस्कूल सोडून सरकारी हायस्कुलांत जाणें भाग होतें. परंतु तिथेंहि या टवाळखोर मुलाला प्रवेश देऊं नये, म्हणून कांहीं जणांनीं खटपट चालविली. वडील रुष्ट, नातलग नाराज आणि शिक्षक चिडलेले ! गोपाळचें लहान जग त्याच्यावर बिघडून गेलें होतें. त्या वेळीं सुप्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे यांच्या घरीं प्रतिष्ठित लोकांची एक बैठक असे. त्यांत नू० म० वि० चे प्रमुख विनायकराव आपटे, इतर शिक्षक व गोपाळचे मामा अनंतराव रेडे हेहि असत. त्यांतल्या कांहीं जणांनीं या आनंदाश्रमांतल्या अड्ड्यांत हा विषय काढून अनंतरावांच्या मार्फत गोपाळला चांगली तंबी देवविली. गोपाळ रडकुंडीस आला होता. त्याच्या नकलांचा प्रताप त्याला चांगलाच भोवला होता. अनंतराव मामांनीं पकडून गांगरलेल्या गोपाळला आनंदाश्रमांत या बड्या बड्या मंडळींच्या पुढें नेऊन उभा केला...

माणूस म्हणजे जीवनपटावरील जणूं सोंगटीच. दान पडेल तशी पुढें-मागें सरकावयाची. गोपाळच्या भवितव्याची सोंगटी कुचंबली होती, टोकरा खात होती. फांसे उलटे पडूं लागले म्हणजे मोठमोठ्यांची मति गुंग होते, तिथें पंधरा वर्षांच्या पोराची काय कथा !

पण पुढें याच गोपाळचा गोपाळराव झाला. कुचेष्टेखोराचा कलावंत झाला. जी कला बालपणीं दूषण ठरली होती, तीच पुढें भूषण ठरावयाची होती. ज्या अनुकरणाच्या छंदानें लहानपणीं त्यांना बदनाम केलें, त्याच छंदानें

ते आज नामवंत झाले आहेत. उपहासास्पद टवाळखोराचा कौतुकास्पद कलाकार कसा बनला, याचा इतिहास म्हणजेच गोपाळराव भोंड्यांचें चरित्र.

## भोंड्यांचा जन्म 'केसरी 'बरोबर

गोपाळ विनायक भोंडे यांचा जन्म पुण्यास हल्लींच्या त्यांच्या राहत्या घरांत दिनांक ३१ ऑक्टोबर १८८१ म्हणजे कार्तिक शुद्ध नवमी शके १८०३ रोजीं झाला. "केसरी आणि मी एकाच वर्षीं जन्माला आलों" असें भोंडे विनोदानें सांगतात. पण हा विनोदाचा भाग सोडून दिला आणि नकलांपुरतें पाहिलें तर भोंडे हे देखील एक 'कलाकेसरी' नाहींत काय? सन १८८१ या सालांत महाराष्ट्रांत जन्माला आलेल्या या दोन्ही गोष्टी गाजाव्या, असाच त्या कालाचा योग असला पाहिजे. 'केसरी'नें एक प्रकारची कामगिरी करून कीर्ति मिळविली, त्याप्रमाणें श्री. भोंडे यांनीं दुसऱ्या एका प्रकारची कामगिरी करून कीर्ति मिळविली आहे. एका दृष्टीनें 'केसरी' ही संस्था असल्यामुळें ती पंचाहत्तर वर्षें टिकली यांत नवल नाहीं. परंतु पाऊणशें वर्षें झालीं तरी भोंडे व त्यांची कला टिकून आहे, ही गोष्ट त्यांना व्यक्तिशः खचित भूषणावह आहे.

## गेला तो काळ!

खरोखर तो पांचपन्नास वर्षांपूर्वींचा काळ डोळ्यांसमोर आला कीं मन थक्क होतें. तो जुना काळ अद्भुतरम्य होता यांत शंका नाहीं. सुमारें १८७० ते १९२० या पन्नास वर्षांतील महाराष्ट्र म्हणजे एक अजब चीज होती. स्वातंत्र्य खच्ची केलेला हा वृक्ष पुन्हा दरदरून फुटत होता. ग्लानींतून पुनरुत्थान होत होतें. इतिहासजमा झालेलें आपलें महत्त्व महाराष्ट्र स्वपराक्रमानें पुन्हा एकदां आपल्याकडे खेचून आणीत होता. पुणें शहर हें त्याचें हृदय होतें त्या वेळचें पुणें आकारानें लहान पण कीर्तीनें मोठें होतें. इतर शहरांतून संपत्तीचें ऐश्वर्य असल, पण पुण्यांत गुणसंपदेचें वैभव होतें. पुणें विद्येनें आणि कलेनें उणें नव्हतें त्या काळांत महाराष्ट्राच्या नापीक भूमींत धान्याचा दुष्काळ होता—कर्तबगार माणसांचा दुष्काळ नव्हता. केवळ पट्टीच्या पंडितांनीं नव्हे तर कसलेल्या कलावंतांनीं गजबजलेला तो काळ होता. महाराष्ट्राचें तें सुवर्णयुग होतें. विधात्यानें जणुं महाराष्ट्रांतली हिरे-

माणकांची खाण खोदून उपडी केली होती. आतां त्या जुन्या आठवणींवर जगण्याचा प्रसंग आला आहे. 'ते हि नो दिवसा गताः।' हल्लींचा महाराष्ट्र ठेंगू आहे. कांहीं आंब्याच्या झाडांना भरपूर फळबार आला म्हणजे पुढल्या वर्षी तीं अजिबात मोहरत नाहींत, तशांतला तर हा प्रकार नव्हे ना ?

नमुन्यादाखल त्या काळांतली हीं कांहीं नांवें पहा : त्यांनीं आपल्या तेजानें विविध क्षेत्रें व्यापलीं होतीं. न्या. रानडे, म. फुले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, डॉ. भांडारकर, आगरकर, टिळक, शिवरामपंत परांजपे, खाडिलकर, केळकर, अच्युत बर्वे, राजवाडे, गणेश व्यंकटेश जोशी, हरि नारायण आपटे, ना. गोखले, कर्वे, रँ. परांजपे, किर्लोस्कर, देवल, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, राम गणेश गडकरी, भास्करबुवा बखले, रामकृष्णबुवा वझे, गणपतराव जोशी, भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व, केशवराव भोसले—किती म्हणून सांगावे ? एकेकांत असा गुण किंवा कला होती कीं, पहाणाऱ्यानें तोंडांत बोट घालावें. अनुकरण-कलेचे आद्यप्रवर्तक व प्रयोगकार भोंडे या वैशिष्ट्यवंतांच्या यादींत बसूं शकणार नाहींत काय ?

### भोंड्यांसारखे भोंडेच

भोंडे हें नांव महाराष्ट्रांत कोणाला परिचित नाहीं? भोंडे हा शब्द उच्चारतांच गोपाळ विनायक भोंड्यांची आठवण होते आणि त्यांच्या मनोवेधक नकलांचें दृश्य डोळ्यांपुढें उभें रहातें. त्या स्मरणानेंहि मनुष्य आनंदानें डोलूं लागतो. भोंडे हें व्यक्तिनाम राहिलेलें नसून तो एक प्रतीकशब्द बनला आहे. कल्पनासाहचर्याच्या योगानें शब्दांना निराळेच अर्थ चिकटतात, असा भाषाशास्त्राचा एक नियम आहे. तशीच भोंडे या शब्दाची स्थिति झाली आहे ज्याप्रमाणें राजवाडे म्हणजे इतिहाससंशोधन, कर्वे म्हणजे स्त्री-शिक्षण, नायडू म्हणजे उन्मादक क्रिकेट किंवा बालगंधर्व म्हणजे नाट्यगानमधुर स्त्री-भूमिका, त्याप्रमाणेंच भोंडे म्हणजे नकला, असें समीकरण रूढ होऊन बसलें आहे. भोंडे = कला किंवा नकला, असा या शब्दाचा अर्थ लोक समजतात, आणि तें रास्तहि आहे. भाषा झाली तरी ती समाजव्यवहाराचाच प्रतिध्वनि नव्हे काय ? भोंड्यांप्रमाणें भाषा देखील नक्कलच करीत असते ! व्यवहाराचें चित्र शब्दांत वठविणें हें तिचें काम. भोंडे हेच करीत आले आहेत. पण तें

इतक्या कौशल्यानें आणि कलात्मकतेनें कीं, 'भोंड्यांसारखे भोंडेच!' असा धन्योद्गार रसिकाच्या तोंडून सहज बाहेर पडतो.

भोंडे या शब्दांतली ही जादू त्यांच्या अंगच्या अद्वितीय कलेमुळें उत्पन्न झाली आहे. आपल्या अजब गुणानें ते पुण्याचें एक भूषण होऊन बसले आहेत. पुण्यनगरीच्या प्रसिद्ध पुरुषांच्या पंक्तींत त्यांचें स्थान अढळ आहे. पुण्यांतच वास्तव्य केल्यामुळें त्यांचा लौकिक वाढायला मदत झाली असेल; पण तें ऋण त्यांनीं केव्हांच फेडलें आहे. कारण पुण्याचा जो एकुण लौकिक बाहेर आहे, त्यांत नकलाकार भोंड्यांचा हातभार अंशतः आहेच आहे, याबद्दल शंका वाटत नाहीं.

भोंड्यांच्या ठिकाणीं बीजरूपानें वसणाऱ्या कलेचा विकास कसा झाला, त्यांच्या कलेचें स्वरूप काय व त्याचें कलादृष्ट्या व समाजदृष्ट्या सौंदर्य व उपयुक्तता कोणती, या प्रश्नांचें विवेचन हेंच भोंड्यांच्या जीवनचरित्रांतलें मर्म होय. अशाश्वत जीवितांतला शाश्वत भाग तेवढाच. कलावंताची कला हेंच त्याचें व्यक्तित्व, हाच त्याचा प्राण. त्याकरितां तो जगत असतो आणि त्याकरितांच तो मरत असतो. त्याच्या कलेचा परिचय हेंच त्याचें खरें चरित्र. तें प्रस्तुत ग्रंथांत ग्रथित करावयाचें आहे.

## व्यवहारदक्ष विनायकराव

गोपाळरावांचे वडील विनायक रावजी भोंडे हे पुणें येथें मुलकी खात्यांत नोकरीवर होते. मावळ तालुक्यांत कामशेटपासून सात मैलांवर पालें नांवाचें गांव आहे. तेथें रावजींचे वडील रघुनाथ यांची शेत-जमीन व घरें होतीं, तेथेंच ते रहात. परंतु पुढें रावजी व विनायकराव यांचें रहाण्याचें व कामधंद्याचें ठिकाण पुणें येथेंच होतें. हल्लींच्या त्यांच्या घरांत भोंडे मंडळी सन १८६५ पासून रहात आहेत. पुण्यास नोकरींत असतांना विनायकरावांनीं वडिलोपार्जित मिळकत वाढवून व त्यांत आपल्या कर्तबगारीनें बरीच नवी भर घालून भोंडे घराण्याची सांपत्तिक स्थिति सुधारली. हल्लींचें घर विनायकरावजींनींच १४०० रुपयांना खरेदी केलें.

विनायकराव उंचनिंच, गोरेपान, दिसण्यांत भव्य व देखणे होते. पहातांक्षणींच छाप पडावी, असा त्यांचा एकंदर डौल होता. त्यांचे कपडे सुद्धां फार

टापटिपीचे, पांढरे स्वच्छ व परीट घडीचे असत. आंत बंडी, शुभ्र अंगरखा, पागोटें, वर रूईफूलकांठी उपरणें आणि गोऱ्या कपाळावर उभें तांबडें गंध व मधें टिळा असा त्यांचा थाट असे. आनुवंशिक गुण कसे उतरतात, हें कळण्याच्या दृष्टीनें त्यांचें स्वभाववर्णन दिलें पाहिजे. विनायकरावांनीं पैसा पुष्कळ मिळविला तरी ते अत्यंत काटकसरी व हिशेबी होते. हुशार, चाणाक्ष व व्यवहारांत मुरलेले होते. कोर्टाच्या कामकाजाची माहिती फार, त्यांत पूर्ण वाकबगार. ते निम्मे वकीलच होते. इस्टेट त्यांनीं आपल्या उदार मतीनें मिळविली. लग्न-कार्यें हातून पुष्कळशीं झालेलीं. स्वभाव शांत, धिमा. बोलणें-चालणें गोड, पण हुशारीचें. टेवरेव अतिशय चोख व टापटिपीची. लांडीलबाडी नाहीं पण व्यावहारिक डावपेच चांगले माहीत. एक टापटीप सोडली तर व्यवहारज्ञान व धूर्तता हे गोपाळरावांच्या स्वभावांतले प्रमुख गुण त्यांनीं आपल्या जन्म-दात्यापासून उचलले असले पाहिजेत, हें सहज ध्यानांत येतें.

## आई-वडिलांची धर्मनिष्ठा

त्या काळांतला अधिकांत अधिक पगार–म्हणजे दरमहा रु. ३५–विनायकरावांना मिळत होता. शिवाय सावसावकारी करीत. शेतीचें उत्पन्न होतेंच. घरांत सुस्थिति होती. विनायकरावांचें घर भरलेलें असे. नात्या-गोत्याच्या मंडळींचें येणें-जाणें, आल्या-गेल्यांची वर्दळ नित्याची. धान्य वर्षाचें सांटविलेलें. दूधदुभतें मुबलक. गोपाळराव सांगतात : त्यांच्या लहानपणीं रुपयाला दहा शेर दूध आणि बारा शेर तांदूळ होते. उत्तम हिरवीगार बाजरी रुपयाला पांच पायली हल्लींच्या लोकांना ही स्वस्ताई म्हणजे स्वप्नांतली गोष्टच वाटायची. गोपाळरावांच्या मातुःश्री रखमाबाई मात्र वडिलांच्या अगदीं उलट टोकाच्या होत्या वर्णानें काळ्यासांवळ्या. स्वभाव तापट, किंबहुना खाष्ट म्हणण्याजोगा. तथापि दोघांचीहि धर्मावर फार श्रद्धा असे. विनायक-रावांचें श्रीबेलबाग विष्णुदर्शन क्वचितच चुकलें असेल ते एकादशीव्रत पाळून चातुर्मासांत दर द्वादशीस बारा ब्राह्मणांना भोजन घालीत. वर्ष-सहा महिन्यांनीं यात्रेचा मोसम टाळून पंढरपूरला जात व निवांतपणें एक-दोन दिवस राहून दर्शन घेऊन परत येत. एकदां त्यांनीं विठोबा-रखुमाईच्या मूर्ति आणल्या व आपल्या घरांत त्यांची स्थापना केली. आतां त्यांची

पूजा-अर्चा गोपाळराव पितृस्मरणपूर्वक मोठ्या आस्थेनें व कर्तव्यबुद्धीनें चालवीत असतात.

विनायकरावांस पांडुरंग, गोपाळ, दामोदर, वामन व नारायण असे पांच मुलगे व चार मुली अशीं एकूण नऊ अपत्यें झालीं पांडुरंग ऊर्फ तात्या थोरला खरा, पण त्याला आईचा लळा होता. वडिलांची मर्जी गोपाळवरच होती.

## गोपाळ नकला करूं लागला

वडिलांच्या भरलेल्या घरांत हीं मुलें लहानाचीं मोठीं होत होतीं. पण गोपाळच्या लीला कांहीं वेगळ्याच होत्या. त्यांचें जें वैशिष्ट्य होऊन राहिलें आहे त्या अनुकरणविद्येचा प्रादुर्भाव त्यांच्यांत लहानपणींच झाला. वयाच्या आठव्या-नवव्या वर्षापासून गोपाळला नकला करण्याची चटक लागली. त्याच्या आईला तशी थोडीशी संवय होती. रखमाबाईना बाळंतपणांत अंगाला लावायला एक बाई येत असे. तिचें अनुकरण त्या गमतीनें करून दाखवींत असत या सहज गोष्टीचा ठसा गोपाळच्या बालमनावर उमटून त्याला ही लकब किंवा छंद लागला असावा, असें दिसतें.

बालपणीं बालांची कोमल-तरु-तुल्य बुद्धि वाकेल।
घेईल ज्या गुणाला तो गुण मति वेष्टुनीहि फाकेल ॥

हें कविवचन किती सार्थ आहे! नेमानेम असला म्हणजे थोडें निमित्तहि पुरेसें होतें आणि बीजाचा वृक्ष बनतो.

मुंज होण्याच्या आधींपासूनच गोपाळ घरांतल्या भाडेकरूंच्या-विशेषतः एका वृद्ध सोनाराची व घरीं येणाऱ्या नातलगांच्या-नकला करूं लागला. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात ते हे असे. एकेकाला एकेक देणगी असते. अर्थात् बाल्यावस्थेंतील या नकला कांहींशा अविकासित व ओबडधोबड असल्या तर त्यांत नवल नाहीं. तथापि त्यांत चुणूक होती आणि भावी यशाच्या खुणाहि होत्या. बहुतेक कलावंतांचा बालपणापासून आपल्या कलेकडे कल असतो, असें त्यांच्या चारित्रावरून आढळून येतें. गोपाळ नूतन मराठींत जाऊं लागल्यावर त्याचें क्षेत्र वाढलें. तो मास्तरांच्या नकला करूं लागला. या

काळांतील त्याचा श्रोतृवृंद म्हणजे वर्गांतले व शाळेंतले सवंगडी. हीं पोरें गोपाळवर बेहद्द खूष असत.

## पोरांचा ' भोंडे क्लब '

गोपाळच्या नकलांची शाळेंतल्या मुलांना इतकी चटक लागली कीं, त्यांनीं एक ' भोंडे-क्लब ' स्थापन केला ! निवांतपणें ही मजा उपभोगतां यावी म्हणून सुमारें पन्नास शाळकरी विद्यार्थ्यांचा हा ' भोंडे क्लब ' मधल्या सुट्टीत भोंड्यांच्या घरांत भरत असे. नूतन मराठी त्या वेळीं भोंड्यांच्या घरासमोरच किबे-वाड्यांत असल्यामुळें ही जागा फारच सोयिस्कर व मुलांच्या पथ्यावर पडली होती. हल्लींचे नटवर्य गणपतराव बोडस हे या भोंडे क्लबाचे एक प्रमुख व उत्साही सदस्य होते. हा गणू गोपाळाचा तेव्हांपासूनचा स्नेही व चहाता आहे. मधल्या सुट्टीची घंटा होते केव्हां आणि भोंडे क्लब भरतो केव्हां, अशी उत्कंठा मुलांना लागून राही. घंटा झाली कीं धांवत पळत जाऊन भोंड्यांच्या घरांतल्या एका बाजूच्या लहानशा खोलींत-पंचवीस जण बसण्याइतपत जागेंत-पन्नास-साठ जण दाटीवाटीनें एकावर एक असे कोंबून-ठेचून बसत आणि मग या बाळगोपाळांची बैठक व दंगा सुरू होई. एकेका मास्तरांची नक्कल होऊं लागली म्हणजे या बालश्रोत्यांना जी मजा वाटावयाची व हंशा पिकायचा त्यांतली गोडी अपूर्व होती.

रम्य तें बालपण । देई देवा फिरूनि ॥

या पदांत म्हटल्याप्रमाणें पुन्हा लहान होण्याची हौस वाटते ती अशा प्रसंगांमुळेंच. त्या वेळच्या भोंडे क्लबांतील हयात असलेली बोडसप्रभृति मंडळी एकत्र जमली-भेटली म्हणजे त्यांना ते बहारीचे जुने दिवस व प्रसंग आठवून प्रेमाचें व आनंदाचें भरतें येतें. आधींच मुलें, त्यांत मास्तरांच्या खुबीदार नकला, मग काय विचारतां ? असा रंग भरायचा कीं बस्स ! ' भोंड्या ' त्यांचा प्यारा दोस्त किंवा नायक बनला होता. खुषींत येऊन ते त्याची पाठ थोपटून हुळहुळी करून सोडीत. मुलांमध्यें मर्म व बरेंवाईट समजण्याची एक उपजत शक्ति असते. गोपाळच्या नकला जर कलाहीन किंवा कांहींतरी वेडेंवांकडें विडंबन असतें तर त्याच्या स्नेह्यासोबत्यांना त्यांत कायमचा रस वाटला नसता आणि भोंडे क्लबचें गुणग्राहक कोंडाळें त्याच्याभोंवतीं खासच

जमलें नसतें, ही गोष्ट अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे. लांड्या चड्डया व फाटक्या टोप्या घालून मधल्या सुट्टींत जमणारा तो पांचपन्नास पोरांचा तांडा व त्यांचा मनमुराद हंशा हीं भोंडयांच्या भावी लोकप्रियतेचीं व प्रचंड श्रोतृवृंदाचीं पूर्वचिन्हें होतीं, यांत शंका नाहीं.

पुढें देखील या भोंडे क्लबचें गॅदरिंग दरवर्षी होत असे.

### पंधराव्या वर्षी नोकरी धरली

परंतु पोरांमध्यें प्रिय झालेला गोपाळ त्याच कारणामुळें मास्तरांना अप्रिय होऊं लागला. हा टारगट आमच्या नकला करतो, हें कळल्यापासून शिक्षक-वर्ग गोपाळला पाण्यांत पाहूं लागला. 'One man's food is another man's poison' या न्यायानेंच कीं काय, पोरांना अत्यंत प्यार होणाऱ्या नकला मास्तरांना झोंबूं लागल्या. या प्रकाराचा बोभाटा वडिलांच्या कानीं गेल्यामुळें तेहि खट्टू झाले. शिवाय गोपाळची अभ्यासांतील प्रगति अगदींच मागासलेली होती. शंभरापैकीं २ ते ७ च्या दरम्यान त्याचे मार्क असत. हे 'गुण' पाहून वडील बोलत नसले तरी मनांतून कष्टी झाले होते. विद्या कमी म्हणून स्वतः गोपाळहि मनांत खिन्न असे. त्याचें बालमन कानकोंडें झालें होतें. गोपाळ इंग्रजी सहावींत होता; तथापि आपला वडिलांना व कुटुंबाला कांहींच उपयोग नाहीं, अशी टोचणी त्याच्या मनाला लागली. न्यूनगंड उत्पन्न झाला. गोपाळनें त्याच वर्षी म्हणजे १८९६ सालीं नू० म० वि०मध्यें शिकत असतांनाच कलेक्टर कचेरींत मुलकी खात्यांत दरमहा आठ रुपयांवर नोकरी धरली. गोपाळ एक तारखेला आपला मिळालेला पगार वडिलांच्या स्वाधीन करी, तेव्हां त्याला किती आनंद होत असे! याखेरीज येरंडवणें व बिबव्याची वाडी येथें त्याच्या वडिलांचीं कुळें असत. पहांटे उठून तिथें जाऊन वसूल आणण्याचें कामहि गोपाळ करी. एवढेंच नव्हे, तर घरांत आईच्या हाता-खालीं घरगुती कामेंहि करूं लागे. निरलसता व कष्ट करण्याची संवय गोपाळांत लहानपणींच रुजली.

### मुंबईची पहिली खेप : न्या० रानड्यांचें दर्शन

याच सुमारास गोपाळनें न्यायमूर्ति रानडे यांना पाहिलें, त्याची हकीगत पुढीलप्रमाणें आहे : येरंडवणें येथील जमिनींचा कज्जा पुणें कोर्टांत चालू

होता. त्याचा निकाल विनायकरावांच्या बाजूनें लागला. परंतु विरुद्ध बाजूनें मुंबई हायकोर्टांत अपील केलें होतें. त्यांचे हायकोर्टातले वकील चंदावरकर होते आणि भोंडयांचे वकील सुप्रसिद्ध दाजी आबाजी खरे हे होते. दाजी आबाजींचें पत्र विनायकरावांना आलें कीं, 'माझी फी तुम्हांला झेपणार नाहीं. कारण तुम्हांस फीदाखल मला ३५ रुपये द्यावे लागतील!' विनायकरावांनीं तातडतोब फीची रक्कम खऱ्यांकडे रवाना केली. अपिलाची सुनावणी होती त्या दिवशीं विनायकराव मुंबईस गेले तेव्हां त्यांनीं गोपाळला बरोबर नेलें होतें. गोपाळराव सांगतात: मुंबईचें भाडें फक्त सव्वा रुपया होतें आणि घोडे ट्रॅम ओढीत होते. गोपाळची ही मुंबईची पहिलीच खेप. हायकोर्टांत न्याया-सनावर बसलेली रानडयांची भव्य मूर्ति, मोठाल्या मिशा व जंगी पागोटें गोपाळरावांना अजून चांगलें आठवतें दोन्ही बाजूंच्या वकिलांचीं भाषणें ऐकून घेतांच न्यायमूर्तींनीं लगेच निकालपत्रक (Judgement) सांगण्यास सुरुवात केली, याचें बारक्या गोपाळला फार नवल वाटलें. अपिलाचा निकालहि भोंडयांसारखा झाला.

## 'कारट्याचं तोंड पाहूं नये!'

गोपाळ एकीकडे नोकरी करून व घरांत कामें करून आई-वडिलांची मर्जी सुप्रसन्न राखण्याची शिकस्त करीत होता इतकें झालें तरी व्हायचें तें थोडेंच चुकणार? नोकरी व घरांतलीं कामें सांभाळून गोपाळ शाळेंत जात होता. त्याच्या नकला करण्याच्या कामांत खंड पडलेला नव्हता. नकलांनीं आपली मानखंडना होते, असें समजून शिक्षकांनीं 'याचें सारें लक्ष चेष्टेकडे आहे आणि म्हणून अभ्यासाकडे मुळींच लक्ष नाहीं' याचा बराच गवगवा केला. या 'टवाळ कारट्या'वर वर्गांतहि ते बरीच हिसकाहिसक करीत. गोपाळ, त्याचे धाकटे मामा नाशिक म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर विष्णुपंत रेडे यांचा लाडका होता पण थोरले अनंतराव मात्र गोपाळवर चिडून होते. ते त्याची उघड हेटाळणी व निर्भर्त्सना करीत.. 'या कारट्याचं मला तोंड पहायचं नाहीं' अशा जळजळीत शब्दांत त्यांनीं आपला संताप व्यक्त केला होता. त्यानंतरच या प्रकरणाच्या प्रारंभीं वर्णन केलेला प्रसंग गोपाळवर येऊन ठेपला.

आनंदाश्रमांत हरिभाऊ आपट्यांच्या घरीं बड्या बड्या मंडळींची बैठक असे. त्यांत नू. म. वि. चे व्यवस्थापक दामुअण्णा कुलकर्णी, मुख्याध्यापक विनायकराव आपटे व कांहीं शिक्षक, पुणें नगरपालिकेचे चीफ ऑफिसर के. एम्.कुमटेकर, माजी असिस्टंट कमिशनर रा. ब. अंजनगांवकर, रावबहादूर हणमंतराम रामनाथ इत्यादि प्रतिष्ठित लोक असत. या क्लबाच्या नेहमीं नित्य व नैमित्तिक बैठकी होत. गोपाळचे मामा नाशिक म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर विष्णुपंत रेडे व त्यांचे थोरले बंधु अनंतराव हेहि या क्लबामध्यें जाणारे प्रमुख सदस्य होते.

## ‘ वाघापुढें बकरें बांधलें ’

या मंडळीसमोर एके दिवशीं अनंतरावांनीं गोपाळला त्याच्या गुन्ह्याच्या चौकशीकरितां नेऊन उभा केला. तीं मोठमोठीं माणसें पाहून गोपाळ गडबडून गेला. घटकाभराच्या मौजेच्या नादीं लागून आपण उगीच या फंदांत पडलों, असें त्याला वाटूं लागलें.

“ काय रे, हे काय तुझे धंदे ? मास्तरांची कुचेष्टा करतोस ? तुला शरम नाहीं वाटत ! ” बैठकींतले एक शिक्षक गोपाळवर खेकसले.

सगळे मोठाले डोळे त्याच्यावर रोखले गेले होते गोपाळला वाटलें, इथून मागल्या पावलीं पळ काढावा आणि जीव द्यावा. नको हा प्रसंग ! गोपाळच्या तोंडून शब्द फुटेना. वाघापुढें बकरें बांधावें, अशी त्याची स्थिति झाली होती.

इतक्यांत धाकटे मामा विष्णुपंत मदतीला धांवले.

“ गोपाळ, नकला म्हणजे करतोस तरी काय, दाखव बघूं करून. ” विष्णुपंत म्हणाले. सगळी मंडळी गोपाळकडे पाहूं लागली.

शरमिंधा झालेल्या गोपाळनें आपलें सारें धैर्य एकवटून नक्कल करण्यास प्रारंभ केला.

पहिल्याच नकलेला मंडळींत खसखस पिकली. त्यांना गुदगुल्या झाल्या होत्या, पण त्यांचें हास्य अजून दिलखुलास नव्हतें. हंसावें कीं न हंसावें अशा कात्रींत ऐकणारे होते. पण दुसऱ्या नकलेला हाहि बांध फुटला आणि नंतर

प्रत्येक नकलेगणिक हास्यरसाला नुसती भरती येत होती. अखेरीस नूतन मराठींतले मास्तर आबा कुलकर्णी यांची नकल तर इतकी फक्कड व हुबेहूब वठली कीं, मंडळींची हंसतां हंसतां पुरेवाट झाली.

'लहानपण दे गा देवा। मुंगी साखरेचा रवा॥ कायरे कार्ट्या! रवा हें व्याकरणांत काय आहे रे?' हीं आबा मास्तरांचीं वाक्यें—त्यांच्यासारखे अर्धबोबडे व ठसकेदार हेल काढून उच्चारलेलीं ऐकतांच सर्व मंडळींची मुरकुंडी वळली. सर्व जण खूष झाले होते. नकलांच्या या अपराधाकरितां या पोराला येथें आणला आहे, याची देखील कोणाला आठवण राहिली नाहीं. गोपाळवरचे आरोप त्यानें उत्पन्न केलेल्या हास्यरसांत बुडून गेले होते!

सर्वांनीं गोपाळची प्रशंसा केली. हरिभाऊ आपट्यांनीं तर 'याच्याजवळ फार मोटी कला आहे' असें म्हणून पाठ थोपटली. घटकाभरांत 'Those who came to scoff remained to pray' असा चमत्कार घडून आला. हरिभाऊंनीं गोपाळची चौकशी करून त्याला 'स्कूल फायनल' करितां सरकारी हायस्कुलामध्यें जाण्याचा सल्ला दिला. अनंतराव मामा मात्र मनांतल्या मनांत खजील होऊन बसले. ते करायला गेले एक, पण झालें भलतेंच!

## विश्रामबागेंत पहिला नंबर

विश्रामबागेंतल्या सरकारी हायस्कुलांत दाखल झाल्यापासून मात्र गोपाळच्या शालेय प्रगतीचा रंग साफ पालटून गेला. जणुं ट्रॅन्स्फर सीन झाला. गोपाळला नवा हुरूप चढला होता. आपलें इंग्रजी कच्चें आहे याचा विषाद वाटून गोपाळनें प्रायमरच्या पहिल्या बुकापासून अभ्यास सुरू केला. पाठांतर पुष्कळसें केलें. मन लावून केलेल्या मेहनतीला एका वर्षांतच फळ आलें. मॅट्रिकचे दोन वर्ग व स्कूल फायनलचा एक वर्ग यांची चांचणी परीक्षा (Preliminary) शाळेंत झाली. त्यांत चारशें मुलांत गोपाळचा पहिला नंबर लागला व त्याला 'एक तासांत १६ पानें निबंध लिहिणारा' असें नांव कै. साने हेडमास्तर यांनीं दिलें. भोंडे असें न म्हणतां 'Writer of 16 pages' असा गौरवपूर्वक उल्लेख ते नेहमीं करीत. पुढें सन १९०२ मध्यें स्कूल फायनल वर्गातील ७६ विद्यार्थ्यांपैकीं ३६ परीक्षेकरितां पाठविले. त्यांपैकीं फक्त सहाच विद्यार्थी उत्तीर्ण झाले. त्यांत गोपाळ पहिला आला व

त्याला सरकारी बक्षीस देण्यांत आलें. याचा परिणाम असा झाला कीं, कलेक्टर कचेरीत मुलकी खात्यांत छत्तीस उमेदवारांना मागें टाकून गोपाळला कायमची सरकारी नोकरी देण्यांत आली. तेथें त्यानें पांच वर्षेपर्यंत उत्कृष्ट काम बजावलें व युरोपियन अधिकारी वर्गाची मर्जी संपादन केली. वडिलांची मर्जी होतीच ती अधिक बसली. बाब्या सुधाराला, असें त्यांना फार वाटे. त्यामुळें ते खूष झाले नूतन मराठींतला टवाळ पोरगा पहिला नंबर व बक्षीस पटकाविणारा विद्यार्थी झालेला पाहून पुष्कळांस अचंबा वाटला.

हायस्कुलांतहि नकलांचा धागा कायमच होता. दुपारच्या सुट्टींत कांहीं शिक्षकांच्या, तर कांहीं विद्यार्थ्यांच्या नकला अधूनमधून करण्याचा क्रम चालू होता. हायस्कुलात पारशी-ख्रिस्ती-मुसलमान विद्यार्थ्यांची संख्या बरीच होती. त्यांची या नकलांच्या प्रयोगांनीं इतकी करमणूक होई कीं, त्याशिवाय त्यांना चुकल्याचुकल्यासारखें वाटे. या विद्येच्या करामतीनें गोपाळराव या नव्या शाळेंतहि विद्यार्थ्यांना प्रिय होऊन बसले होते. पूर्ववयाप्रमाणें पुढील आयुष्यांतहि या विद्येच्या बळावर त्यांना पुष्कळ स्नेही जोडतां आले.

## कुटुंबांतील मंडळी

सन १९०४ मध्यें विनायकराव मधुमेहाच्या विकारानें वैकुंठवासी झाले. दोन वर्षांनीं मातुःश्री रखमाबाई निवर्तल्या तेव्हांपासून कुटुंबाच्या कर्तेपणाचा भार गोपाळरावांवर येऊन पडला. कै. पांडुरंगपंत उर्फ तात्या ज्येष्ठ बंधु असले तरी ते एकमार्गी होते. पोस्टखात्यांत नोकरी करून त्यांनीं पुढें पेन्शन घेतलें. त्यांचे एक चिरंजीव कृष्णराव वीज-कंपनींत नोकरीला असून दुसरे रणछोडराव वकील आहेत. आणि तिसरे रामभाऊ डॉक्टर आहेत. गोपाळ-रावांच्या धाकट्या तीन बंधूंपैकीं दामोदरपंत ऊर्फ काकासाहेब हे शिक्षणखात्यांत असिस्टंट डेप्युटी व पुढें पुणें म्युनिसिपालिटीचे ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर झाल्यावर सेवानिवृत्त झाले. त्यांना गायन-वादनाचा छंद आहे. तबला वाजविण्यांत ते चांगले प्रवीण आहेत. मास्तर कृष्णरावांसारख्यांचीहि ते साथ करूं शकतात. त्यांच्याहून धाकटे वामनराव भोंडे हे एक चांगले ज्योतिषी म्हणून पुण्यांत ओळखले जातात. सर्वांत कनिष्ठ श्री. नानासाहेब हे पुण्यांतील नामवंत वकील असून शिवाय सार्वजनिक कार्यकर्ते या नात्यानें

त्यांनीं चांगला लौकिक संपादन केला आहे. विविध संस्थांतून त्यांनीं मोलाची कामगिरी केली आहे. त्यांचा अधिक विस्तृत वृत्तान्त परिशिष्टांत जोडला आहे.

भोंडे बंधु विभक्त झाले असले तरी त्यांचें बंधुप्रेम व जिव्हाळा कायम आहे.

गोपाळरावांची तीन लग्नें झालीं. पण नशिबाचा योग असा कीं, त्यांना अपत्यलाभ झाला नाहीं. तिन्ही पत्न्या निवर्तल्या.

‘ जगीं सर्वसुखी असा कोण आहे ? ’

असें या संसाराचें स्वरूप आहे. दैवाची एक मेख असतेच. ही उणीव खरी. तथापि गोपाळरावांनीं त्याबद्दल फारसें दुःख मानलें नाहीं किंवा ती गोष्ट जिवाला लावून घेतली नाहीं.

## मिलिटरी अकौंट्स्च्या नोकरींत

सन १९०२ पासून पांच वर्षें गोपाळराव कलेक्टर ऑफिसमध्यें रेव्हेन्यू खात्यांत होते. परंतु १९०७ मध्यें त्यांनीं आपलें खातें बदलून मिलिटरी अकौंट्स्मध्यें नोकरी पत्करली. याचें कारण असें कीं, रेव्हेन्यूंत आठ रुपये मिळत होते आणि नव्या नोकरींत बारा रुपये पगार होता ! हा लाभ दिसायला दिसला खरा पण अखेर तो तोट्याचाच ठरला. गोपाळराव सांगतात कीं, मी रेव्हेन्यू खात्यांतच चिकटून राहिलों असतों तर कलेक्टरच्या जागेपर्यंत वाढलों असतों आणि कलेक्टर म्हणून निवृत्त झालों असतों ! हुद्दा आणि पगार दोन्हीहि वाढले असते. पण मग कदाचित् लोक निदान कांहीं दिवस तरी नकलांच्या कलेला मुकले असते. असो, पण तें व्हायचें नव्हतें. आयुष्याच्या सट्टयांत जसा अनपेक्षित लाभ तशीच अनपेक्षित हानिहि वांट्याला येते दोन्हींचा एकमेकांना उतारा देऊन समचित्तानें व्यवहार करण्याची युक्ति गोपाळरावांना साधली आहे.

सन १९२० पर्यंत गोपाळरावांना नोकरींत असूनहि पुण्यांत रहावयास सांपडलें. बदली झाली नाहीं. या कालांतील त्यांच्या ऑफिसमध्यें घडलेली एक महत्त्वाची घटना येथें नमूद करतों : सन १९१० मध्यें कॅप्टन मरे नांवाचा वरचा अधिकारी आला. त्याच्या डोक्यांत काय लहर आली कोणास ठाऊक. ऑफिसांतल्या लोकांच्या सर्वसाधारण ज्ञानाची व बुद्धीची परीक्षा घेण्याचें त्याच्या मनांत आलें. “ What would you like to do after passing

your examination ? " या विषयावर त्यानें इंग्रजींत निबंध लिहिण्यास सांगितलें. सुमारें अडीचशें लोकांत भोंडयांचा निबंध सरस ठरून त्यांचा पहिला नंबर आला. फेरहर्स्ट साहेब हुशार अशी त्याची ऑफिसांत ख्याति होती. त्याचा नंबर दुसरा लागला आणखी एक विशेष गोष्ट म्हणजे ठराविक वेळांत भोंडयांनीं आपला स्वतःचा निबंध तर खरडून टाकलाच, पण शिवाय एक विशेष चलाख नसलेला स्नेही कुचमत बसला होता. त्याचा टांक चालेना. स्वतःचें लिखाण जलदीनें संपवून भोंडयांनीं त्या अडलेल्या दोस्ताचाहि निबंध पुरा करून दिला. त्यामुळें त्या मित्राचाहि नंबर बराच वर आला स्वार्थ आणि परार्थ साधण्यांत भोंडे जन्मतःच पटाईत आहेत.

ऑफिसांतहि भोंडे लोकप्रिय होते : नकलांमुळें, तसेंच इतरांच्या कामांत सहाय्य करण्याच्या वृत्तीमुळें तथापि येथेंहि जसे त्यांचे चहाते व हितचिंतक होते, तसेच हेवादावा करणारे व हितशत्रुहि होते. जीवनपथावर सुष्ट व दुष्ट दोन्हीहि भेटायचेच. गोपाळराव दोघांनाहि नमस्कार करतात आणि पुढें चालूं लागतात.

## नकलांचा विकास व प्रसिद्धि

इतके दिवस शाळेच्या चार भिंतींच्या आंत गुंगत राहिलेली गोपाळरावांच्या नकलांची कीर्ति हळूहळू जनतेंत पसरूं लागली खऱ्या गुणाचा गंध फार काळ अप्रसिद्ध राहूं शकत नाहीं न बोलावतांच भुंगे त्याकडे धांव घेऊं लागतात. आणि इंग्रजींत Whispering Campaign म्हणतात त्याप्रमाणें भोंड्यांच्या बाबतींत झालें. त्यांच्या नकलांची माहिती कर्णोपकर्णीं होऊन सहजपणें त्याची प्रसिद्धि सर्वत्र झाली. कस्तुरीच्या सुवासाला जाहिरातीची गरज कितीशी लागणार ?

स्कूल फायनल परीक्षा पास झाल्यापासून म्हणजे सुमारें १९०२ पासून गोपाळरावांनीं प्रसिद्ध सार्वजनिक व्यक्तींच्या नकला करण्यास सुरुवात केली. लहानलहान सावजें सोडून ते आतां मोठ्या शिकारी करूं लागले. लोकमान्य टिळक, मुमुक्षुकर्ते पांगारकर, शिवरामपंत परांजपे, प्रो जिन्सीवाले इत्यादींच्या नकला त्यांनीं बसविल्या. शाळामास्तरांच्या अल्प भक्ष्यावर संतुष्ट न रहातां त्यांची कला मोठमोठ्या प्रसिद्ध पुढाऱ्यांवर झडप घालूं लागली !

ही कला पाहण्यालायक आहे असें वैद्य पंचानन कवडेशास्त्री यांना वाटलें आणि त्यांनीं दोनशें मंडळी जमवून भोंडे यांच्या नकलांचा कार्यक्रम शनिवार पेठेंतील गांधी यांच्या वाड्यांत करविला. सार्वजनिक असा हा प्रथमच प्रयोग, त्यामुळें भोंड्यांच्या नकलांचा बोलबाला फार झाला. त्याच वेळीं तुळशीबागेच्या बोळांत राहणारे पेंटर भिडे यांनीं भोंड्यांचा जाहीर सत्कार करावा असें सुचविलें. ह्या सूचनेला अनुसरून १९०५ सालीं किर्लोस्कर कंपनीच्या विद्यमानें गणेश पेठेंतील थिएटरमध्यें नकलांचा कार्यक्रम झाला व भोंडे यांस रौप्यपदक देण्यांत आलें. शंकरराव मुजुमदार, नानासाहेब जोगळेकर, बालगंधर्व प्रभृति मार्मिक व नाट्यनिष्णात मंडळींनीं नकला पाहून आनंद व आश्चर्य प्रकट केलें. पुढें दादासाहेब खापर्डे यांना मुद्दाम पुण्यास बोलावून त्यांच्या अध्यक्षतेखालीं आर्यभूषण थिएटरमध्यें भोंडे यांचा तीन तासांचा नकलांचा कार्यक्रम पुन्हा करण्यांत आला. त्या वेळीं जरीचें उपरणें अर्पण करून त्यांचा सत्कार केला. १९०८ च्या नाशिक येथील नाट्यमहोत्सवांत कै. अनंत वामन बर्वे यांनीं भोंड्यांना पाचारण करून त्यांच्या नकलांचा कार्यक्रम करविला व त्यांना सुवर्णपदक अर्पण केलें. नंतर दोन वर्षांनीं दादासाहेब खापर्डे यांनीं भोंड्यांना उमरावतीचें आमंत्रण देऊन तेथील लोकांस त्यांच्या नकला दाखविल्या.

## फर्ग्युसन कॉलेजच्या संमेलनांत

सन १९१२-१३ सालीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें फार मोठ्या प्रमाणावर संमेलन झालें. विद्यार्थ्यांना नाट्यप्रयोग करून दाखविण्याची फार हौस होती. तथापि अशा प्रयोगांनीं फायद्यापेक्षां तोटाच फार होतो, ह्या समजुतीनें कॉलेजच्या चालकांनीं नाटकाला बंदी केली. विद्यार्थ्यांनीं गंधर्वांचें गायन व भोंड्यांच्या नकला ठरविल्या. भोंड्यांच्या नकला सुरू झाल्या, तेव्हां 'रँ. परांजप्यांची नक्कल करा' असा गोंगाट सुरू झाला. परन्तु रँ. साहेब तिथें समक्षच हजर असल्यामुळें भोंडे संकोच करूं लागले 'खुद्द परांजप्यांनींच अनुज्ञा दिली तरच मी त्यांची नक्कल करीन,' असें भोंड्यांनीं जाहीर केलें प्रिन्सिपॉल परांजपे असे दिलदार व खेळाडू वृत्तीचे कीं, त्यांनीं केवळ परवानगी दिली एवढेंच नव्हे, तर त्याकरितां आपली रँग्लरची पसरट चौकोनी काळी टोपी व काळा गाउन त्यांच्या स्वाधीन केला. तो वेष धारण करून भोंड्यांनीं स्टेजवर

प्रवेश केला त्या वेळीं सर्वांनीं टाळ्यांच्या कडकडाटानें थिएटर डोक्यावर घेतलें. ' Qualities are said to be arithmetical progression, when they increase or decrease by a common difference." हा गणिताचा पाठ नकलेचा विषय होता. फलकावर आंकडे मांडण्याची, बोटांवरील खडूची भुकटी फुंकरण्याची, कपाळावरील आठ्या व भुंवया उडविण्याची, विषय समजावून देण्याची, प्रश्नांचीं उत्तरें देण्याची, गोंगाट करणाऱ्या विद्यार्थ्यांची हजेरी घेण्याची व शिस्तीचा उपदेश करण्याची या सर्व परांजप्यांच्या लकबांची व वैशिष्ट्यांची नक्कल भोंडे यांनीं इतकी छानदार वठविली कीं, प्रेक्षकांना ते प्रति-रँग्लरच भासावे.

अशा रीतीनें पुण्या-मुंबईत व महाराष्ट्रांत सर्वत्र भोंड्यांच्या कलेचा लौकिक झपाट्यानें पसरूं लागला. निरनिराळ्या संस्थांत, समारंभांत व शाळा-कॉलेजांतील संमेलनांत त्यांचे कार्यक्रम आवर्जून होऊं लागले. विशेषतः गणेश-उत्सवांतून तर नकला पाहायला तोबा गर्दी लोटत असे. कित्येकदां त्यांचे नियोजित कार्यक्रम अति गर्दीमुळें बंद करावे लागले. एकदा मुंबईच्या ब्राह्मणसभेंत त्यांचा कार्यक्रम त्या वेळचे सेक्रेटरी कै. डॉ. भडकमकर यानीं ठरविला होता परंतु अनिवार्य गर्दीमुळें सदर कार्यक्रम दुसऱ्या दिवसपर्यंत स्थगित करावा लागला.

एकदां डेक्कन कॉलेजांत प्रिन्सिपॉल बेन यानीं नकला पाहिल्या व ते उद्‌गारले: " Mr. Bhonde, you are second Ranglar Paranjape ! "

तसेंच वॉटर वर्क्सचे अधिकारी मि. कॉलेट नकला पाहून भोंड्यांना म्हणाले—

" If you go to England, you will come back with lots of money ! "

या अपूर्व विद्येमुळें भोंड्यांची लोकप्रियता अतोनात वाढली. अखिल महाराष्ट्रभर त्यांचा लौकिक पसरला. या कीर्तिलाभाबरोबर आर्थिक लाभहि थोडाबहुत होतच होता.

## नकलेनें नोकरी बचावली

नोकरी म्हटली कीं ती बिकटच. मग ती कारकुनाची असो कीं ऑफिसरची असो. कांहीं झालें तरी ती दुसऱ्याची ताबेदारी. हेवेदावे असतात.

मत्सर, सूडबुद्धि असते. वरचे ऑफिसर लहरी असतात. अशा हजार भानगडी. म्हणूनच विचारवंतांनीं म्हटलें आहे : 'सेवाधर्मः परमगहनः ।' भोंड्यांना नोकरींत अनेकदां अडचणी आल्या, संकटें आलीं. पण तीं सर्व निवारलीं गेलीं. त्या कामांत त्यांच्या नकलेच्या विद्येनें त्यांना चांगला हात दिला. त्यांतले कांहीं प्रसंग सांगण्यासारखे आहेत :—

सन १९०७ मध्यें गोपाळराव मिलिटरी अकौंट्स् खात्यांत कायमचे लागले परंतु कित्येकांना मागें सारून त्यांना वरची जागा देण्यांत आली, हें पुष्कळांना सहन झालें नाहीं. गोपाळराव त्यांच्या डोळ्यांत सलूं लागले व त्या असंतुष्ट लोकांनीं गोपाळरावांना या नोकरींतून उडविण्याची खटपट चालविली. त्यांच्यावर खोटेनाटे आरोप व 'हे कामास नालायक आहेत' अशा तक्रारी उपस्थित करण्यांत आल्या. हें प्रकरण निर्णयाकरितां मोठ्या साहेबाच्या टेबलावर गेलें होतें. गोपाळराव धागधुगींत होते. सोन्यासारखी नोकरी आयुष्याच्या सुरुवातीलाच गेली म्हणजे करणार काय? पण याच सुमारास (१९०८) योगायोगानें या खात्याचें संमेलन झालें व त्यांत चहात्या मंडळींनीं गोपाळरावांच्या नकलांचा कार्यक्रम आंखला. या प्रसंगीं एक युरोपियन ऑफिसर फेरहर्स्ट या साहेबाची नक्कल इतकी हुबेहूब व चित्ताकर्षक झाली कीं, सर्व युरोपियन अधिकारीवर्ग आश्चर्यानें स्तंभित होऊन बेहद्द खूष झाला. खुद्द कंट्रोलर चक्क म्हणाला कीं—

"इतका गुणी माणूस आपण कसा दवडावा? हा आपल्याच खात्यांत राहिला पाहिजे."

अशा रीतीनें भोंड्यांना काढून लावण्याचें पहिलें प्रकरण निकालीं काढण्यांत आलें.

### खाष्ट मॅक्डोनल साहेब

पुढें कर्नल मॅक्डोनल नांवाचा एक अति कडक ऑफिसर आला. तो इतका खाष्ट व दुष्ट होता कीं, वेळीं कोणाला लाथ मारण्यासहि मागेंपुढें पहात नसे. त्या वेळच्या साहेबी मगरूरीचा व उन्मत्तपणाचा तो नमुना होता. मॅक्डोनलसाहेबाच्या कानावर भोंडयांच्या नकलांची बातमी गेली. त्यानें भोंडयांना स्वतःच्या ऑफिसमध्यें बोलावून नकला करून दाखविण्यास सांगितलें

भोंडयांनीं आपला सहा इसमांचा ऑफिशियल डायलॉग करून दाखविला. तेव्हां साहेबबहादुर खूष झाले, पण त्यांनीं आपलेंच घोडें पुढें दामटलें ! त्यांनीं स्वतःची नक्कल करण्याविषयीं आग्रह धरला व त्याकरिता फक्त आठ दिवसांची मुदत दिली. त्या अवधींत चांगलें व बिनचूक काम करण्याबद्दल ऑफिसांतल्या सगळ्या लोकांना बजाविलें. तथापि दुसऱ्याच दिवशीं तो पुष्कळांवर संतापला. दोन दिवसांनीं मात्र त्यानें ऑफिसांतील कामकाजाबद्दल समाधान व्यक्त केलें. मुदत संपतांच कर्नल मॅक्डोनलनें भोंडयांस आणून आपली नक्कल करण्यास फर्माविलें. तेव्हां भोंडयांनीं चातुर्यानें वरील तिन्ही प्रसंगांची नक्कल करून साहेबास दाखविली. साहेब हंसूं लागला व खूष झाला. इतका कीं, यानंतर दर सोमवारीं १०॥ ते ११ च्या दरम्यान भोंडयांना आपल्या खोलींत बोलावून घेऊन व त्यांच्याकडून नकला करवून घेऊन मग तो कामाला लागे इतक्या कडक साहेबालाहि भोंडयांच्या गुणांनीं मऊ केलें होतें.

गोपाळरावांचें बहुतेक वास्तव्य पुण्यांतच झालें. सन १९२० मध्यें त्यांना बाहेर जावें लागलें. मुंबई, नसराबाद व पेशावर अशा ठिकाणीं बदल्या होऊन ते पुन्हा १९२८ मध्यें पुण्यास रुजू झाले दोन वर्षें काम केल्यानंतर १९३० मध्यें पुन्हा त्यांची बदली जबलपूरला झाली व तेथें असतांनाच १९३२ मध्यें ते सेवानिवृत्त झाले.

## मारुतीला संकट घातलें

पेशावरला असतांना ईश्वरावरचा भरंवसा दृढ होण्यासारखी एक गोष्ट घडली. कर्नल मरे नांवाचा एक मोठा व मातबर ऑफिसर ऑफिस-इन्स्पेक्शन-करितां आला होता त्या वेळीं भोंडयांचें ‘ नोट–बुक ’ पाहून तो फारच खूष झाला नोट बुकांत सगळ्या गव्हर्मेंट ऑर्डर्सची नोंद ठेवावयाची असते. भोंडयांनीं आपल्या सुंदर अक्षरांत सर्व सरकारी हुकुमांची नोंद क्रमवार विल्हेवारीनें व टापटिपीनें ठेवलेली होती. तें पाहून भोंडयांविषयीं साहेबाचा ग्रह फारच चांगला झाला व त्यानें मुद्दाम भोंडयांना बदलून आपल्या स्वतःच्या ऑफिसमधली जागा दिली. विचित्र योग असा कीं, त्यानंतर थोडयाच दिवसांनीं साहेबाला कामांत एक महत्त्वाची अडचण येऊन त्याला त्याबाबत आधाराची ( Reference ) जरूर पडली. भोंडे हा हुकमी एक्का आहे, तो

खास ताबडतोब आपल्याला हवा तो आधार काढून देईल, या भरंवशानें त्यानें भोंडयांना सांगितलें. इकडे गोपाळरावांना घाम फुटला त्यांची हुडका-हुडकी व धांदल सुरू झाली आपल्या हुषारीची झांकली मूठ उघडी होणार, व सगळें मुसळ केरांत जाणार, या भीतीनें गोपाळरावांचा थरकांप झाला. साहेबाला तोंड दाखविण्याची पंचाईत झाली साहेब काय करतो कुणास ठाऊक ? त्या दिवशीं शनिवार होता. मारुतीवर भोंडयांची भक्ति. गोपाळराव सांगतात : "मारुतीचें स्मरण केलें, माझी लाज तुला आहे असें बोललों." इतक्यांत साहेबाचा निरोप आला कीं, 'रेफरन्स सांपडला, शोधण्याची जरूर नाहीं !' साहेबाचें काम झालें आणि भोंडयाचेंहि काम झालें !

सन १८९६ मध्यें गोपाळराव प्रथम नोकरीला लागले तेव्हां त्यांना ८ रुपये पगार मिळत होता निवृत्त होतांना १९३२ मध्यें तो ४१० रुपये झाला.

निवृत्तीनंतर बहुतेक पेन्शनर फुकट जातात. कोणी थकतात. कोणी व्याधीनें जर्जर होतात. कोणी व्यसनांत तर कोणी पत्ते-गंजिफांत उरलेलें आयुष्य घालवितात. शरीर व मन कार्यक्षम राखून जीवनाचा सदुपयोग करीत राहणारा विरळा. गोपाळराव भोंडयांची गणना अशा अनुकरणीय अपवादांत करावी लागेल. पेन्शन घेतल्यानंतर देखील त्यांचे शरीराचे व मनाचे व्यापार पूर्वीं होते तसेच चालू आहेत. त्यांत फरक नाहीं. खंड नाहीं. कलेच्या एक-निष्ठ सेवेचें तर त्यांनीं जणुं व्रतच घेतलेलें आहे.

## गुण विकसित केला

आपल्या अंगच्या गुणांचा उपयोग न करणाराला समर्थांनीं करंटा म्हटलें आहे. निसर्गानें बहाल केलेल्या गुणांचा विकास व वापर न करणें म्हणजे एक प्रकारें परमेश्वराच्या घरीं गुन्हा करणें होय. एक जुनी गोष्ट आहे : एका गांवांत चुरमुरे-फुटाणे विकणारा भडभुंजा होता. एके दिवशीं त्याच्याकडे एक साधू आला. साधूजवळ एक परीस होता पण त्याला यात्रेला जावयाचें असल्यामुळें तो परीस त्यानें त्या फुटाणे-विक्याजवळ सांभाळण्याकरितां ठेवला. जातांना साधूनें बजावलें—"बघ बेटा ! हा परीस आहे वर्षभर नीट जपून ठेव आणि मी यात्रेहून परत आल्यावर मला दे. तुला कधीं गरज लागली तर वापरीत जा. हा लोखंडाला लावला कीं तुला हवें असेल

तेवढें सोनें मिळूं शकेल." साधू गेला आणि वर्षानें परत आला. तो भडभुंजा पहिल्यासारखेच चुरमुरे-फुटाणे विकीत बसला होता. साधूला आश्चर्य वाटलें. साधूची कल्पना अशी कीं, हा भडभुंजा एव्हांना चांगला गबर झाला असेल. कारण प्रत्यक्ष परीस लाधल्यावर श्रीमंत व्हायला कितीसा उशीर ? भडभुंजानें साधूला त्याचा परीस देऊन टाकला. साधूनें विचारलें, "तूं परिसाचा उपयोग केला नाहींस काय?" भडभुंजानें उत्तर दिलें—"दोन-तीनदां पैशांची गरज भागली होती म्हणून सोनें करण्याकरितां लोखंड खरेदी करावयाला बाजारांत गेलों. पण लोखंड महागलें होतें. शेराला दोन आणे भाव चढला होता. मग तसाच परत आलों. म्हटलं, होईल स्वस्त तेव्हां घेऊं. पुढें राहिल तें राहिलं झालं !"

वरील गोष्टींतल्या परिसाप्रमाणें भोंडयांनीं आपला निसर्गदत्त गुण वायां घालविला नाहीं. उलट तो विकसित केला. गोपाळरावांनीं आळस केला असता किंवा कच खाल्ली असती, तर लहानपणींचा 'टवाळखोर गोपाळ' तसाच कायम राहिला असता आणि आतांपर्यंत लोकांच्या स्मरणांतून नाहींसा झाला असता. पण त्यांनीं आपल्यांतलें कलाबीज उपेक्षिलें नाहीं. त्याला जपून जोपासून त्याचा भव्य वृक्ष उभा केला.

भोंडयांचें भाग्य हें कीं, लोकांनींहि त्यांच्या कलेचें चीज केलें. गुणांची चहा न होणें यापरतें कलावंताचें दुसरें दुर्भाग्य नाहीं. तो त्याचा मृत्युच होय, असें म्हटलें तरी चालेल. एका कवीनें काकुळतीनें ब्रह्मदेवाची प्रार्थना केली आहे माझ्या कपाळीं दुसरी वाटेल ती शिक्षा लिही. पण—

अरसिकेषु कवित्वनिवेदनं
शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।

विधात्यानें ही पाळी भोंडयांवर आणली नाहीं. उतारवयांतहि त्यांच्या मालाला मागणी आहे, मोल आहे. त्यांच्या कलेचें स्वागत होत आहे—जयजयकार होत आहे.

### ७५—नाबाद

जीवनाच्या बाजारांत अद्यापि हा नकलाकार आपल्या कलेची पोतडी घेऊन उभा आहे. '७५—नाबाद' असा भोंडयांचा आजचा जीवन-फलक आहे. अजून ते खेळत आहेत.

पाऊणशें वर्षे निरोगी आयुष्य लाभलें हेंच अपेक्षेबाहेर लाभलें, असें गोपाळराव समजतात. गोपाळराव मृत्यूला भीत नाहींत, तसेंच जीवनालाहि बिचकत नाहींत. मरण ही माणसाची नित्याची प्रकृति, उलट जीवित हीच विकृति, असें तत्त्वज्ञ मानतात. हेंच सिद्धान्तसत्य गोपाळरावजींना शास्त्र-वाचनानें नव्हे पण अनुभवाच्या धोपटमार्गानें गवसलें आहे. ते तृप्त आहेत.

'होते जे गुण सर्वही विफल ते झाले गुणज्ञांविना!'

असा ऊर बडविण्याचा खेदकारक प्रसंग त्यांच्यावर ओढवला नाहीं. त्यांच्या कलेचें व जन्माचें सार्थक झालें आहे. पण ते त्याच्यांतहि मोठी बहादुरी मानीत बसत नाहींत. जीवनांतला व कलेंतला मिळेल तो आनंद चाखीत त्यांची वाटचाल सुरू आहे. खरोखरच केळकरांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांची आज मनःस्थिति आहे:

" आज मी अत्यंत समाधानाच्या मनःस्थितात आहें. मन शांत आहे-हात जोडले आहेत- ' हांके 'ची वाट पहात आहें."

माणसाला जीवनाच्या नाटकांत कोणती ना कोणती भूमिका करावीच लागते. अनेक भूमिका करणें ही भोंडयांची भूमिका होती. ती त्यांनीं चोख बजावली आहे ही देखील भूमिका केव्हां तरी संपावयाचीच; मग ती उद्यां संपली काय किंवा आज संपली काय सारखेंच, असा भोंडयांचा हिशोब आहे.

अशी खुद्द त्यांच्या मनाची अवस्था असली तरी कलाप्रेमी त्यांना ' शतायुषी भव ' असाच आशीर्वाद देणार. न. चिं. केळकरांनीं एकसष्टीला टाईप-रायटरच्या घंटेची उपमा दिली आहे. तथापि भोंडयांच्या टाईपरायटरची घंटा वाजून चारपांच अक्षरें वर झालीं आहेत. एवढेंच नव्हे तर त्यांनीं ती ओळ पुरी करून दुसरी ओळ सुरू केली आहे आतां पुन्हा घंटा वाजेल तेव्हां पहातां येईल!

* * *

: २ :

# व्य क्ति चि त्र

कस्याऽपि कोऽप्यतिशयोऽस्तिस तेन लोके
ख्यातिं प्रयाति ग हि सर्वविदस्तु सर्वे
किं केतकी फलति ? किं पनसः सुपुष्पः ?
किं नागवल्ल्यपि च पुष्पफलैरुपेता ?

गोपाळरावांच्या मोठ्या मित्रपरिवारापैकीं एक समवयस्क जुने स्नेही.××× गांवचे मान्यता पावलेले एक प्रतिष्ठित वकील. त्यांचें आग्रहाचें पत्र आलें कीं, ' मुलीचें लग्न आहे. तुम्ही निदान आठ दिवस दिवस रहायला याच. ' बरेच दिवसांत भेट झाली नव्हती तथापि गोपाळराव गेले नाहींत. त्यांनीं टाळाटाळ केली.

कांहीं दिवसांनीं याच गृहस्थांकडून पत्र आलें. ते आजारी पडले होते. ' नानासाहेबांना अर्धांगाचा झटका येऊन ते अंथरुणाला खिळले आहेत. त्यांनीं हाय खाल्ली असून तुमचा ध्यास धरला आहे ' असा मजकूर पत्रांत होता. गोपाळरावांचे पाय दुखत होते, ठणकत होते – पण अशा वेळीं त्यांचा पाय पुढें असतो. दहा कामें बाजूला ठेवून गोपाळराव निघाले. त्यांनीं पहिली गाडी गांठली...

नानासाहेब विमनस्क व विकालांग होऊन पडले होते. अर्धांगासारखें दुखणें, त्यांत मनानें कच खाल्ल्यावर प्रकृति काय सुधारणार ? गोपाळरावांची आठवण काढीत रखडत पडले होते

तोंच एक दिवशीं लांब फाटकापासून घोगऱ्या पण लवचिक आवाजांत मोठ्यांदा मारलेली ' नानासाहे ऽ ऽ ब ' अशी हांक ऐकूं आली. तो चिरपरिचित आवाज ऐकतांच नानासाहेबांचा चेहरा प्रफुल्लित झाला. कानांत मंत्र सांगितल्याप्रमाणें त्यांच्या मनाला एकदम उभारी आली. गोपाळरावांचाच तो आवाज होता आणि लांब अंतरावरूनच हांक मारीत येण्याची त्यांची ती नित्याची पद्धत होती.

गोपाळरावांनीं कांहीं दिवस मुद्दाम मुक्काम केला, पण त्या चारदोन दिवसांत नानासाहेबांच्या प्रकृतींत आश्चर्यकारक प्रगति दिसून आली व सर्व कुटुंबांत आनंदाचें वातावरण पसरलें. गोपाळरावांच्या कोट्यांनीं व विनोदानें नानासाहेब चार महिन्यांत हंसले नव्हते ते हंसूं लागले. चेहऱ्यावर टवटवी आली. डॉक्टरी उपचारानें जी सुधारणा होऊं शकली नाहीं, ती गोपाळरावाच्या भेटीनें व सहवासानें थोड्याच दिवसांत घडून आली. हा गोपाळरावांचा गुण! ते मनाचे डॉक्टर आहेत, असें म्हटलें तरी चालेल. आश्चर्याची गोष्ट ही कीं, गोपाळराव पुण्यास जाण्यासाठीं निघाले तेव्हा चार महिने अंथरूण न सोडलेले नानासाहेब त्यांना दारापर्यंत पोंचवायला आले!

रंजल्या-गाजलेल्यांना सहाय्य करणें, दुःखीकष्टी जीवांना धीर देणें आणि आपत्तींतल्या मित्रांच्या मदतीला धावून जाणें हा गोपाळरावांचा सगळ्यांत मोठा गुण होय. क्षणांत खेळीमेळीचें व आनंदी वातावरण निर्माण करणें व धीर देणें. हा त्यांच्या हातचा मळ आहे. हा त्यांच्या हरहुन्नरी स्वभावाचा आत्मा होय

गोपाळराव भोंडे म्हणजे महाबुद्धिवान् किंवा दैवी अंश असलले अवतार आहेत, अशातला भाग नाहीं किंवा ते म्हणजे सर्व सद्‌गुणांचा पुतळा आहेत, असेंहि नाहीं मनुष्यमात्रांत जसे गुण-दोष असतात तसेच ते त्यांच्यांतहि आहेत. आदर्श असा पुरुष कोण असेल? थोडेंफार तरी हिणकस असल्याशिवाय माणसाचें नाणें जगाच्या बाजारात चालत नाहीं व टिकतहि नाहीं! अखेर व्यक्तीचें मूल्यमापन त्याच्या गुण-दोषांच्या बेरीज-वजाबाकीवरूनच करावें लागतें गोपाळरावाच्य त वाइटापेक्षां चांगल्याचें प्रमाण निःसंशय अधिक भरेल. त्यांचे कांहीं वैयक्तिक गुण तर विलोभनीय आणि कित्ता घेण्यासारखे आहेत.

## घरांतील राहणी

गोपाळरावांची घरांतली राहणी अत्यंत साधी आहे. कांहींशी अव्यवस्थित व गबाळी म्हटली तरी चालेल. काटकसर तर इतकी आहे कीं, स्वस्तांत स्वस्त असेल ती वस्तु घेतील पण खर्चाच्या बाबतींत जाईल तिथें हत्ती, नाहीं तिथें शेपूटहि जायचें नाहीं, असा थोडासा प्रकार आहे. कपडयांकडे व

पेहेरावाकडे तर त्यांचें लक्षच नसतें. त्यांचा वेष पहावा म्हणजे ही गोष्ट ध्यानांत येईल. पेन्शन घेण्यापूर्वीपर्यंत ऑफिसांत जाण्यापुरते त्यांचे कपडे कांहींसे बरे असत. पण आतां तोहि वचक नाहींसा झाल्यामुळें त्यांचा पोषाख अगदीं मासलेवाईक झाला आहे. पण त्याची ते पर्वा करींत नाहींत नैतिक बंधनांना किंवा समाजांत रूढ व मान्य असलेल्या इतर नियमांना व सकेतांना न जुमानण्याची लहरी व बेछूट वृत्ति बहुतेक कलावंतांत आढळते. याचीं उदाहरणें म्हणून कै. गणपतराव जोशी, बालगंधर्व, केशवराव भोसले, पठ्ठे बापूराव इत्यादिकांचीं देतां येतील. गोपाळरावहि या नियमाला अपवाद नाहींत. असो.

## जणुं खेडेगांवचा भिक्षुकच

त्यांना डामडौल व छानछोकीची बिलकुल आवड नाहीं एक साधें जाडें-भरडें अर्धवट पांढरें, जेमतेम गुडघ्यापर्यंत आलेलें व कसें तरी नेसलेलें पंचे-वजा धोतर, वर फारसा स्वच्छ नाहीं अशा बेताचा, कधीं बराच लांब, नाहीं-तर कधीं बराच आंखूड असा शर्ट, न लावलेल्या गुंड्या, लहर लागल्यास घालावयाचा एक लॉंग कोट, पुष्कळदां अनवाणी, डोक्यावर एक जुनीपानी टोपी आणि पाय अधू झाल्यामुळें आधाराकरितां घ्यावी लागणारी एक लठ्ठ काठी हा गोपाळरावांचा पोषाख. रोजच्या शिरस्त्याप्रमाणें स्वारी झोळी घेऊन एकदां मंडईत निघाली म्हणजे तर खेडेगांवचा ( तो सुद्धां शहरांतला नव्हे ) एखादा भिक्षुकच वाटावा. पण वरून असा अवतार दिसला, तरी आंतला चमत्कार वेगळा आहे वरचें सोंग गबाळें असेल; पण आंत स्वारी पक्की आहे

वेष असावा बावळा। परि अंतरीं नाना कळा॥

जणुं हा समर्थांचा उपदेश डोळ्यांपुढें ठेवूनच भोंड्यांचा कारभार चाललेला आहे. भोंड्यांचें हें ' आंत-बाहेर ' पाहिल्यानंतर वरून बावळट पण आंतून बिलंदर अशा बहिर्जी नाइकाची आठवण होते. ' खालीं मुंडी अन् पाताळ धुंडी ' यांतला भोंड्यांचा प्रकार आहे. माहीत नसलेल्याला हे भोंडे म्हणून दाखविले तर त्याला आश्चर्यच वाटेल या वेषांतला हा गृहस्थ अनुकरण-कलेचें माहेरघर असेल, अशी कल्पना त्याला कदापि येणें शक्य नाहीं. लोक काय

म्हणतील, ही काल्पनिक भीति गोपाळरावांच्या मनाला शिवत नाहीं विचार केला म्हणजे पटूं लागतें कीं, बाह्यांगाला महत्त्व कीं अंतरंगाला? अधिक डौल कुणाचा—कपडयांचा कीं गुणांचा? ‘ एक नूर आदमी और दस नूर कपडा ’ अशी म्हण आहे. पण माणसाचा—कलावंताचा नूर कपडयावर अवलंबून नसून त्याच्या कलागुणांवर आधारलेला आहे, हें तत्त्वच जणुं कांहीं गोपाळरावांचा गबाळा पोषाख न बोलतां आपल्याला सांगत असतो. कपडे हें साधन आहे, साध्य नव्हे. भर्तृहरी म्हणतो कीं, पुरुषाचा सर्व थाटमाट व भूषणें हीं नाहींशीं होणारीं आहेत. फक्त ‘ वाण्येका समलंकरोति पुरुषम्। ’ भोंडयांची ‘ नकली ’ वाणी हाच त्याचा खरा अलंकार होय. महात्माजींनीं हेंच तत्त्व निराळ्या शब्दांत सांगितलें होतें.

‘ खरूं सौंदर्य तो गुणमांज होय ’

गुणी माणूस असून तो सुवेषभूषित असेल तर अधिक चांगलें यांत शंका नाहीं. केशरी दूध रुप्याच्या वाटींतून दिलें तर त्यांत अयोग्य काय? तथापि माणसाला नखरेबाज पोषाख आवश्यक किंवा अपरिहार्य आहे असें नाहीं. गुण हाच त्याचा दागिना आणि कर्तबगारी ही त्याची खरी शोभा नव्हे काय?

## विक्षिप्त आवडीनिवडी

गोपाळरावांच्या आवडीनिवडी अगदींच जगावेगळ्या आहेत. त्यांचे कपडे आपण पाहिलेच. त्यांना छानछोकीची आवड नाहीं आणि स्वच्छतेचीहि फारशी चाड नाहीं. कलावंत स्वच्छंदी आणि तऱ्हेवाईक असतो म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. खाण्यापिण्याच्या बाबतींत गोपाळरावांना सगळ्यांत प्रिय काय, तर शिळा भात आणि भजीं. ते म्हणतात, या दोन गोष्टी असल्या कीं मला पंचपक्वान्नांची मेजवानी मिळाल्यासारखें वाटतें. दिवसाचें असो कीं रात्रीचें असो, त्यांचें घरचें जेवण या दोन पदार्थांखेरीज व्हायचेंच नाहीं. बाकी कांहीं नसलें तर चालेल. घरीं रोज भजीं खाणाऱ्या या कलावंताला बाहेर मात्र कधींहि भजीं खाण्याचा प्रसंग आला नाहीं, ही गोष्ट त्यांना खचित भूषणावह आहे.

गोपाळरावांना मंडळींच्या बैठकींत जसा थट्टेकरितां कोणीतरी ‘ तोंडी लावायला ’ लागतो, त्याचप्रमाणें जेवणांत त्यांना तोंडी लावायला लोणचें,

हिरवी मिरची किंवा कोरड्या खोबऱ्याच्या तुकड्याची जरूरी लागते. खारट-तुरट आणि तिखट-तेलकट चाखणारी गोपाळरावांची जिह्वा बोलतांना मात्र मिष्ठास गोड आहे ! त्यांची मूळची प्रकृति सुदृढ. शिवाय सर्व तऱ्हेची संवय. बारा गांवचें पाणी प्यालेले त्यामुळें आवडीनिवडी कांहीं असल्या तरी अमक्या-वांचून धकत नाहीं, अशी गोष्ट नाहीं. सब चलता है ! या वयांतहि रात्रीं-बेरात्रीं जेवण किंवा जाग्रण त्यांना सोसतें. तक्रार नाहीं. सर्व अनियमितपणा त्यांनीं पचनीं पाडला आहे. ते फारसे आजारी कधीं पडले नाहींत. आणि थोडेसे आजारी असले तर त्याला ते जुमानीत नाहींत. एकदां त्यांना ताप येत होता गोपाळराव सांगतात : मीं एक दिवशीं पोटभर भात आणि भजीं खाल्लीं तेव्हां माझा ताप गेला !

गोपाळरावांना चहाची तलफ किंवा आवड नाहीं. कोणाच्या घरीं गेले आणि त्यांना चहा विचारला, तर साफ 'नको' असें सांगतात आणि थोड्या वेळानें हळूंच थोडी तंबाखू अन् चुना असला तर 'द्या' असें म्हणतात सुपारीचीं चार खांडें तोंडांत टाकलीं आणि वर तंबाखूची चिमटी सोडली कीं स्वारीची तब्बेत खूष. पंचम म्हणजे त्यांना पंचामृतासारखा रसभरित वाटतो. नकलांत काय किंवा खासगी बैठकींत काय या पंचमाखेरीज त्यांचा षड्ज लागायचाच नाहीं. तंबाखूचा बार भरल्यानंतर मात्र त्यांच्या डोक्याला चालना मिळते आणि बोलण्याला रंग चढतो. त्या वेळीं तंबाखू मुखरसच नव्हे तर वाग्रसहि उत्पन्न करते कीं काय कोण जाणे !

### गोपाळरावांचा गबाळग्रंथीपणा

घरांतल्या वागणीचा गोपाळरावांचा खाक्या असाच गबाळग्रंथी आहे. मिलिटरी अकौंट्स्च्या नोकरींत होते तेव्हां ऑफिसांत जातांना त्यांची कोण लग्नघाई उडायची आयत्या वेळीं सगळी धांवाधाव अन् गडबड. वेळेचें धोरण असावयाचें, पण शोधाशोध, घाईगर्दी, आरडाओरडा याच्याशिवाय काम धकावयाचें नाहीं. आतांहि तोच नमुना आहे ही गडबड, धांदल, हांकाहांक गोपाळरावांच्या अंगवळणीं पडून गेली आहे. सहा महिने लग्न आधीं ठरून राहिलें असलें तरी ऐनवेळीं ज्याप्रमाणें गोंधळ आणि घाई उडते, त्याप्रमाणेंच गोपाळरावांचा कारभार आहे. त्यांना पानतंबाखू खाण्याची संवय आहे. हल्लीं नुसतीच 'चुनेगर्ची' असते. पण कधीं व्यवस्थित

तबकांत किंवा डब्यांत भरून सगळा संच ठेवला आहे, असें कधीं झालें नाहीं. डबा पुढें ओढावा तर पानेंच नसायचीं, नाहींतर चुना वाळलेला असायचा. कधीं कातानें दगा द्यावा किंवा एखादी सुपारी तीहि कुचकी निघावी सगळें नीट असलें तर अडकित्ता कोणत्या तरी गादीतक्क्याखालीं दडी मारून लपलेला असावयाचा. मग कांहींवेळ हुडकाहुडकी, याला हांका मार, त्याला हांका मार, नाहींतर स्वतः उठून आंतल्या खोलींत दोन-तीन हेलपाटे मारून न्यून असेल त्यांची पूर्तता करावयाची. भोंड्यांच्या इथलें तांबूलसेवन म्हणजे असा शिवाशिवीचा खेळ चालतो. आवडीच्या व्यसनाच्या बाबतींत इतका ढिलेपणा सहसा कोणाला पत्करत नाहीं. पण आमचे गोपाळ-राव इतके खप्पी आहेत कीं, वेळप्रसंगीं चुना नसला तर भिंतीचा चुना नखानें खरडून घेऊन त्याच्यावरच काम भागवतात!

हा एक नमुना म्हणून सांगितला आहे. या शितावरून बाकीच्या भाताची परीक्षा वाचकांना करतां येईल. पैशाअडक्याचें तसेंच. गोपाळराव पैसे कधीं पाकिटांत, पिशवीत किंवा कोटाच्या खिशांत ठेवीत नाहींत. पैसे धोतराच्या कनघटीला लावण्याची त्यांची संवय आहे. चिल्लरच नव्हे तर चारपांचशें रुपयांच्या नोटा असल्या तरी इतकें मोठें भेंडोळें ते आपल्या कनवटीला लावून बाळगतात व चोवीस तास तसेच वावरतात. एकदां मंडईत भाजी घेतांना वीस रुपयांच्या नोटा पडल्या व सांडल्या. पुष्कळ शोधल्या; पण चवाठ्यावर गहाळ झालेल्या नोटा काय सांपडतात? घरच्या मंडळींनीं त्यांना पुष्कळदा सांगितलें : ' अप्पासाहेब, तुम्ही पैसे पाकिटांत कां ठेवीत नाहीं ?" तेव्हां अप्पासाहेबांनीं हंसत हंसत उत्तर दिलें : " अहो, पैसे जायचे असले म्हणजे कुलूप लावलेल्या पटींतून सुद्धां नाहीं का जात ?"

## गप्पांतली आठळी

जन्मभर सरकारी नोकरींत हिशोब ठेवण्याचें काम केलेल्या गृहस्थाच्या वागण्यांत इतका बेहिशोबीपणा कसा, याचें कोडें पडतें. कांहीं वेळेला कळतें पण वळत नाहीं, अशी स्थिति होते. स्वभावाला औषध नाहीं हेंच खरें. गोपाळरावांना या गोष्टी कळत नाहींत, असें मुळींच नाहीं. एखादा टाप-टिपीचा मनुष्य भेटला म्हणजे त्याबद्दल ते त्याची तारीफ करतात, शाबासकी

देतात आणि विनोदानें म्हणतात—‘ काय बुवा, आमचा हा देशस्थी गबाळा कारभार असाच चालायचा. आम्हांला जमतच नाहीं तें.’ भोंड्यांच्याकडे ‘ अस्ताव्यस्त समस्त ’ असा जरी एकंदर पसारा व पद्धत असली तरी त्यांतली एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत न घेतल्यास बाह्यात्कारीं दिसणारें हें गबाळेपणाचें चित्र चुकीची व भ्रामक कल्पना देणारें ठरेल. ‘ हॅम्लेट ’ नाटकांत एक मार्मिक वाक्य आहे :

‘ There is a meth d in his madness ’ ( हॅम्लेटचें वेड असलें तरी त्या वेडालाहि एक प्रकारची शिस्त आहे ! ) हें वाक्य उच्चारतांना हॅम्लेटच्या चुलत्याला त्याच्या शहाणपणाचा संशय येऊं लागला होता. त्याचप्रमाणें भोंड्यांच्या दिसणाऱ्या बेहिशोबीपणांत हिशोबाचा एक बळकट धागा आहे, हें परिचित मार्मिकांना उमगल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांना फणसांतल्या गऱ्याची उपमा साजेल. त्यांच्या स्वभावाच्या गऱ्याचें वरचें कवच मऊ व बुळबुळीत असेल; पण त्याच्या आंत सावधगिरीची, दूरदर्शीपणाची टणक आठळी आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

## धूर्त, चाणाक्ष व मिश्किल

गोपाळराव अत्यंत साध्या व निगर्वी वृत्तीचे आहेत. मी कोणी बडा अथवा बडा कलावंत आहें, असा विचार कधींच त्यांच्या मनांत डोकावत नाहीं. दंभ, अहंकार किंवा स्वतःचें फाजील स्तोम माजविणें या गोष्टी त्यांना मनापासून आवडत नाहींत. अहंमन्यतेला गोपाळरावांच्या चित्तांत प्रवेश नाहीं. विनीतभाव आणि स्वभावांतला गोडवा हीं त्यांच्या वृत्तींतील विलोभनीय वैशिष्ट्यें आहेत. माणुसकी आणि व्यवहारचातुर्य याची मांगड त्यांच्या स्वभावांत व वर्तनांत पदोपदीं दिसून येते. त्याचें बोलणें-चालणें नेहमींच मृदु, मिष्टास आणि मोहक असतें.

दारिद्र्य ज्यांजवळिं अप्रिय बोलण्याचें
भांडार ज्यांजवळिं वाग्रस-माधुरीचें

अशा व्यवहारचतुर व सत्प्रवृत्त सज्जनांच्या यादींत यांचें नांव घालण्यासारखें आहे. वरील सद्‌गुणांच्या जोडगोळीनें गोपाळराव कोणाचेंहि मन सहज जिंकून घेतात. धिम्मेपणा-शांतपणा हा तर त्यांचा स्थायीभाव आहे त्याचा

मनःसंयम दांडगा आहे. कधीं तट्कन कुणाला बोलायचे नाहींत. रागाचें प्रदर्शन करावयाचे नाहींत. उसन्या रागाचें जोरदार अवसान मात्र नेहमीं आणतात; पण त्यांत दाहकता नसून रंजकता असते. हा त्यांचा लटका राग किती रमणीय असतो, हें परिचितांना चांगलें ठाऊक आहे. गोपाळरावांचा मनाचा ताबा व तोल सुटत नाहीं. आणि क्वचित् सुटलाच तरी ते कधीं दिसूं देणार नाहींत आणीबाणीच्या बिकट किंवा नाजुक प्रसंगीं धैर्य आणि प्रसंगावधान राखण्याचा गुण त्यांच्या अंगीं आहे व अंगवळणीं पडला आहे. आलेल्या प्रसंगाला तोंड देणें व त्यांतून खुबीनें वाट काढणें हा त्यांच्या हातचा मळ आहे. ऐन वेळीं ते डगमगत नाहींत. उपजत धूर्ततेतून आणि संचित अनुभवांतून त्यावर योग्य उपाय, तोडगा अथवा शक्कल काढतात. आणि दैवयोग असा कीं, आतांपर्यंत बहुतेक वेळीं त्यांची उपाययोजना लागू पडलेली आहे. गोपाळरावांच्या अंगचा उपजत धूर्तपणा व चाणाक्षपणा अनुभवानें चांगलाच पक्का व तल्लख बनला आहे. त्यांतच माफक मिश्किलपणाचें मिश्रण आहे. तथापि या त्रिगुणांची दुसऱ्याला झळ लागणार नाहीं किंवा उपद्रव होणार नाहीं, अशी त्यांच्या स्वभावाची घडण आहे. ते कोणाला निंदणार नाहींत; दुखवणार नाहींत. ते कोणाचें नुकसान करणार नाहींत. आपला मार्ग सुकर करण्यापुरताच ते आपल्या धूर्ततेचा उपयोग करतात. कच न खातां, कुणाला न तोडतां, न दुखवतां आपला मुद्दा व मतलब साधीत रहायचें, ही कला शिकावी भोंड्यांपासूनच. इंग्रजींत ज्याला Common sense म्हणतात ती उपजत सारासार-विवेकशक्ति त्यांच्यापाशीं जबरदस्त आहे. शिवाय त्याला समयसूचकतेची जोड आहेच आणि प्रसंगोचित विनोदाची फोडणीहि आहे. वेळ मारून न्यावी त्यांनींच.

## गोपाळराव दिसतात तसे नाहींत !

अपरिचिताला किंबहुना परिचिताला देखील भोंड्यांच्या अंतरंगाचा थांग लवकर लागावयाचा नाहीं वरवर पहाणाऱ्याला गोपाळराव हे गबाळे, भाबडे, भोळसट किंबहुना बावळट वाटण्याचा संभव आहे. परंतु याच्याइतका चुकीचा समज दुसरा कोणताच नसेल. या पांघरलेल्या वेडाखालीं मोठें शहाणपण लपलेलें आहे, हें अनुभवानें मागाहून

लक्षांत येतें. ते दिसतात तसे नाहींत! गोपाळरावांची निरीक्षणशक्ति जबर आहे, सूक्ष्म आहे. तशीच आकलनशक्तीहि. त्यांच्या नजरेंतून बारीक-सारीक गोष्टी देखील सुटत नाहींत त्यांना मनुष्य-स्वभावाचें ज्ञान चांगलें आहे. अनुभवाचा सांठाहि भरपूर आहे. कोण मनुष्य कसा आहे, याचा आडाखा ते जलद बांधूं शकतात हेतु चटकन् हेरतात. त्यांचे अंदाज व परीक्षा सहसा चुकत नाहींत, त्यांचें वागणें-बोलणें सभ्य, मृदु पण चोख व सावधगिरीचें असतें पण त्यांत विनोद, थट्टामस्करी, मिश्किलपणा यांचें इतकें दाट मिश्रण असतें कीं, त्यांच्या संभावितपणापेक्षां थट्टेखोरपणाचीच छाप अधिक पडते. गोपाळरावांचा स्वभाव व चालचलणूक विरोधाभासात्मक आहे त्यांच्या गांभीर्यांत नाटकीपणा व खेळकरपणा डोकावत असतो. उलट, ग्राम्य पण मार्मिक कोट्यांनीं बहरलेलें त्यांचें खासगी संभाषणदेखील सभ्यतेची एक विशिष्ट मर्यादा सोडीत नाहीं. ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्यापासून दोन वर्षांच्या पोरापर्यंत आणि एखाद्या जख्ख म्हाताऱ्या बाईपासून तों परकरांतल्या पोरीपर्यंत कोणाशींहि ते सारख्याच समरसतेनें बोलूं-चालूं शकतात. पोर असो वा थोर असो—भोंडे भेटल्याचा आनंद व्हावा, असेंच त्यांचें बोलणें असतें. कोणी दुःखी-कष्टी भेटला तर त्याच्याशीं असे कांहीं दोन गोड शब्द बोलतील कीं, त्याचें सगळें दुःख पार हलकें व्हावें एखाद्या गांजलेल्या आई-बाईपुढें असा दीनवाणा व सहानुभूतिदर्शक चेहरा करून मानभावीपणानें बसतील-बोलतील कीं, भोंडेच जगांत आपला खरे हितचिंतक, असें तिला वाटावें. डोळे मोठे करून, माना डोलावून, पाठीवर हात फिरवून, आंजारून-गोंजारून, सगळी चिंता काय ती तुमची आहे असें दाखवून हूं हां करून असें सोंग आणतील कीं, त्याला गोपाळरावांबद्दल प्रेमादर व आपलेपणा वाटूं लागेल. पोटांत शिरून आपलेंसें करून एखाद्याच्या मनांतलें काढून घ्यावें गोपाळरावांनींच. बोलतां बोलतां डोळ्यांतलें काजळ नकळत काढून घेण्याची विद्या त्यांना चांगली अवगत आहे.

**सगळेंच नाटक**

या सगळ्या वागण्यांत नाटकीपणा व नकलीपणा नाहीं असें खासच म्हणतां यावयाचें नाहीं. पण त्यांतला हेतु मात्र नाटकी किंवा लबाडीचा नसतो, ही महत्त्वाची गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. एखाद्याशीं बोलावयाचेंच तर मग

त्याला बरें वाटेल, आनंद होईल असे दोन शब्द कां बोलूं नयेत, हा गोपाळरावांचा सात्त्विक व स्तुत्य उद्देश त्यांत असतो. आविर्भाव खोटा पण हेतु खरा, असा हा प्रकार आहे. जगाच्या रंगभूमीवर वागतांना हा नकलाकार इतकी सफाई, संभावितपणा व समरसता दाखवितो कीं, त्याचें हें नाटक चांगलेंच रंगतें व यशस्वी होतें ! श्रोता साफ फसतो ! जसा माणूस भेटेल त्याप्रमाणें गोपाळराव आपल्या बोलण्याची पगडी कौशल्यानें फिरवूं शकतात 'गंगा गये गंगादास, जमना गये जमनादास' हें त्यांच्या वागण्याच्या धोरणांतलें सहेतुक सूत्र आहे. स्त्रीपुरुष, भलाबुरा, गरीब-श्रीमंत, लहान-थार कसाहि असो, त्याच्याशीं त्याच्या त्याच्या भूमिकेवरून बोलण्याचा गोपाळरावांचा हरहुन्नरीपणा व हजरजबाबीपणा मात्र वाखाणण्यासारखा आहे. अपरिचितालाहि माझा सखा मला भेटला, असें वाटायला लावतील. मरणाच्या दारीं असलेल्या खितपणाऱ्या रोग्याला प्रफुल्लित करतील. निराश व उदासीन झालेल्या मित्राला आपल्या विनोदी व मार्मिक संभाषणानें उमेद आणि तरतरी आणतील. एखादी उपवर किंवा नवविवाहित तरुणी भेटली तर तिच्या लग्नासंबंधीं किंवा पतिविषयक कोटी करून तिच्या गालांवर लज्जेचा रक्तिमा चढवतील आणि तिच्या अधोवदनावरचें चारटें स्मितहास्य पाहून डोळे मिचकावीत हंसत हंसत निघून जातील. शाळकरी मुलाला वेडेवांकडे पण गोड व प्रेमळ ठसकेदार हेल काढून एखादें भक्तिपर गाणें किंवा धांवा म्हणून दाखवून रंजवतील. लहानांहून लहान होण्याची त्यांच्यांत पात्रता आहे. गोपाळराव पोरांत पोर आणि थोरांत थोर होऊं शकतात एका संस्कृत 'कवीनें माणूस हा जगाच्या रंगभूमीवरचा एक नटच आहे' अशी कल्पना मांडली आहे. हें कविवचन गोपाळरावांच्या बाबतींत अधिकच सार्थ झालें आहे. भोंडे केवळ व्यासपीठावरच अनेक भूमिका वठवितात असें नव्हे. खाजगी जीवनांतहि ते पुष्कळ निरनिराळ्या भूमिका करीत असतात. कोठेंहि असला तरी नाट्य व नकला हाडींमाशीं खिळलेला हा गृहस्थ आपल्या वळणावर जायचाच !

## व्यवहारचातुर्य : सुंदर हस्ताक्षर

व्यवहारांत कसें वागावें, याचे धडे गोपाळरावांपासून शिकावे. मुद्दा सोडायचे नाहींत, वाकुडपणाहि वाढवायचे नाहींत. करायचें तें करतील

श्री० आप्पासाहेब भोंडे यांच्या हस्ताक्षराचे नमुने

So far as our "Hindu Religion" goes we have the grand and eternal promise Shri Krishna has given in the "Bhagwat Gita." that whenever there is a decay of 'Dharma', well, Shri Krishna comes down to save us. I say & I am prepared to prove this statement. (Lokmanya Tilak)

15th March 1957 G.V. Bhonde

या अनंतकोटी ब्रम्हांड नायकाचे अघटित घटना पटुत्व इतके जोरकस, प्रभावशाली, आणि फलद्रूप की, या मातोश्रींच्या अव्यभिचारिणी भक्तीच्या प्रभावे, भगवंताची आकाशवाणी या आ हातांच्या देहाच्या मडक्यातून बाहेर पडली. माझी काय किंमत आहे काय म्या पामरे, बोलावी उत्तरे परि तो विश्वंभरच बोलविता (कै. ह. रा. पागारकर)

गोपाळ विनायक भोंडे. ता. १५ मार्च सन १९५७

[illegible]

[illegible]

[illegible]

[illegible]

( [illegible] )

[illegible] [illegible]

# नक्कल व अम्मल



बॅ. सावरकर यांच्या वेषांतील श्री. भोंडे



रँ. परांजपे यांच्या वेषांतील श्री. भोंडे



श्री. भोंडे यांच्या वेषांतील श्री. भोंडे

पण कटुता किंवा अप्रियता निर्माण करणार नाहींत. चावा घ्यायचाच झाला तर चिमणीच्या दांतांनीं चावतील, आग होऊन घ्यावयाचे नाहींत. वर फुंकरहि घालतील. नमतील पण मेचणार नाहींत. अप्रिय बोलायचें असेल तर त्याला मृदु शब्दांचा गोड पेहेराव देतील. थट्टामस्करी करतील पण आपला मार्ग सोडायचे नाहींत. अशा अनेक खुब्या त्यांच्यापाशीं आहेत. गोपाळरावांनीं समर्थांचा दासबोध वाचलेला नसेल. दासबोध कशाला, त्यांनीं कोणतेंच पुस्तक आजपर्यंत वाचलेलें नाहीं. रोजच्या वर्तमानपत्रांतल्या ताज्या बातम्यांच्या चार ओळी देखील वाचायची जिथें मारामार, तिथें ग्रंथवाचन तर लांबच राहिलें! गोपाळरावांना अक्षरशत्रु जरी म्हणतां आलें नाहीं तरी पुस्तकशत्रु किंवा वाचनशत्रु खचित म्हणता येईल. मात्र गोपाळराव साक्षर आहेत खास. नुसते साक्षर नव्हेत तर त्यांचें अक्षर मोठें फरडें व झोकदार आहे. मोडी, बालबोध व इंग्रजी अशीं त्यांचीं तीनहि हस्ताक्षरें बघत रहाण्यासारखीं आहेत. त्यांचा ठसा करून छापला आहे तो नमुना वाचकांनीं पहावा. मोत्यांच्या ओळी आहेत जशा! त्यांच्या धांवत्या व लपेटीच्या हस्ताक्षरांत गोलपणा व गोडवा असल्यामुळें तें सुबोध, वळणदार व मोहक दिसतें. त्यांचें मोडी देखील 'बालबोध' आहे! सहज वाचतां येतें. शिवरामपंत परांजपे भोंडव्यांच्या हस्ताक्षरावर खूष असत. तें घरांतल्या मुलांना दाखवून म्हणत : 'अक्षर असावें तर असें असावें.' शिवरामपंतांनीं कोनकराचा वाडा सोडून तुळशीबागेजवळ घर घेतलें, तेव्हां आपल्या नव्या घराचें खरेदीखत मुद्दाम भोंडव्यांच्याकडून लिहून घेतलें होतें.

असो. हस्ताक्षराच्या ओघांत मुद्दा सुटला. वागण्याचा विषय चालला होता. गोपाळरावांच्या वागण्याचें वळण त्यांच्या अक्षराप्रमाणेंच निर्दोष, नमुनेदार, मोहक आणि कित्ता घेण्यासारखें आहे. दासबोध न वाचतांहि त्यांत वर्णिलेला एकहि मूर्खपणा त्यांच्या हातून घडत नाहीं. ते कधींहि आत्मप्रशंसा करीत नाहींत. तसा विषय निघालाच तर उलट आत्मटीका करतात. गोपाळराव आपले पूर्वीचे पराक्रम वर्णन करीत नाहींत किंवा फुशारकी मारीत नाहींत. उगीच अद्वातद्वा बोलायचे नाहींत. आपलें काम उरकल्यावर

तिथें अधिक वेळ बसणार नाहींत. बसलेच तर इतरांचा कल व आग्रह पाहून त्यांचा शब्द मानण्याकरितां बसतील.

## विद्येला शोभणारा विनय

लीनता ही तर त्यांच्या स्वभावाची शोभा आहे. यामुळें गोपाळराव कुणाच्या डोळ्यांत खुपत नाहींत. सगळ्यांना हवेहवेसे वाटतात. सामान्यतः गुणवत्तेच्या चंदनवृक्षावर अहंकाररूपी फूत्कार टाकणारे सर्प असावयाचेच. पुष्कळदां कलावंतांच्या हिरव्या चांफ्याला घमेंडीचा उग्र दर्प येत असतो. पण भोंड्यांचें तसें नाहीं. ते मुंगी होऊन साखर खाणारे आहेत.

महापुरें झाडें जातीं ।
तेथें लव्हाळे वांचती ॥

हा तुकोबारायांचा उपदेश जणुं त्यांच्या नसानसांत मुरलेला आहे. ताठपणापेक्षां नम्रभाव अधिक टिकाऊ व शोभा देणारा आहे हें व्यवहारज्ञ गोपाळरावजींना पूर्णपणें पटलेलें आहे. "मला काय येतंय? उगीच तुम्ही माझी प्रशंसा करतां झालं!" हे उद्‌गार त्यांच्या तोंडून नेहमींच निघत असतात. हा त्यांचा विनय खोटा किंवा उसना आणलेला नसतो स्वतःच्या गुणाची वाजवी किंमत समजण्याइतका व्यावहारिकपणा आणि एकूण जगतांतील ज्ञानाच्या मानानें मी म्हणजे कोणीच नाहीं असें न्यूटनप्रमाणें खरोखर मानण्याइतका मनाचा थोरपणा हे दोन्ही गुण गोपाळरावांमध्यें आहेत. म्हणूनच मानापमानाची त्यांना मोठीशी मातब्बरी वाटत नाहीं. कार्यक्रमाच्या वेळीं अगर कोठेंहि त्यांना कोणी चटईवर बसावेलें तरी हंसतमुखानें बसण्याची त्यांची तयारी असते. कोणीं त्यांची योग्य बडदास्त ठेवली नाहीं किंवा बूज राखली नाहीं तरी ते मनाला लावून घेत नाहींत. किंवा कोणीं त्यांचा अतिशय मानसन्मान केला आणि वाहवा केली तरी हुरळूनहि जात नाहींत.

## मिळेल तें घ्यायचें

आपल्या कर्तव्याच्या रस्त्यानें जायचें ही मुख्य दृष्टि. वाटेंत द्रव्य, कीर्ति, मान जो काय आपल्या नशिबानें मिळेल तो मिळेल. तो खिशांत टाकून पुढचा रस्ता धरावयाचा, असा त्यांचा खाक्या आहे. सावलीच्या पाठीमागें

लागलें म्हणजे ती पुढें पुढें पळते, पण तिच्याकडे पाठ फिरवून चाललें म्हणजे मात्र ती तुमच्यामागें धावून येते. त्या न्यायानेंच फलाचा हव्यास न धरणाऱ्या भोंड्यांच्या पदरांत मान, मोबदला आणि मोठेपणा आपण होऊन येऊन पडतो आहे, यांत शंका नाहीं. तथापि इतरांप्रमाणें या कीर्तिलाभानें त्यांना कधीं मस्ती किंवा धुंदी चढलेली नाहीं. ‘ कर्मण्येवाधिकारस्ते ’ आणि ‘ यदृच्छालाभसंतुष्टः ’ हें गीतेंतील वर्णन गोपाळरावांच्या स्वभावाला पुष्कळसें लागू पडतें. नेहमीं स्वतःकडे कमीपणा घेण्याची त्यांची मोठी गोड हातोटी आहे. कमीपणा घेण्यांत मोठेपणा आहे हें मोठ्यांनामुद्धां कमी कळतें; आणि कळलें तरी वळत नाहीं. असो. विनयशीलतेच्या या धोरणामुळें गोपाळरावांना आयुष्यांत शत्रु उत्पन्न झाले नाहींत. ते अजातशत्रु आहेत म्हटलें तरी चालेल. बोलतांना आपण होऊन कमीपणा पत्करला तरी तेवढ्यानें कांहीं खरोखरीचा कमीपणा होत नाहीं, हें समजण्याइतका पोच व दूरदृष्टि त्यांच्या अंगीं आहे. शिवाय आपणच खालच्या पायरीवर उतरलों व लघुता घेतली, म्हणजे जे कोणी विरुद्ध बोलूं इच्छिणारे निंदक किंवा टीकाकार असतात, त्यांचीं तोंडें आपोआपच बंद होतात ! हाहि एक फायदा चाणाक्ष भोंड्यांच्या हिशोबांतून सुटलेला असणें शक्य नाहीं.

## याला म्हणावें मित्र

लीनतेची जननी सुजनता ही देखील अर्थातच गोपाळरावांच्या चित्तांत प्रेमानें नांदत असते. मात्र गोपाळरावांचें सौजन्य किंवा शालीनता भाबडी अथवा आंधळी नसून तिला व्यवहारीपणाचे डोळे आहेत. ते जसा दुसऱ्याचा गैरफायदा घेणार नाहींत, तसा स्वतःचाहि कोणाला घेऊं देणार नाहींत. ‘ जशास तसें ’ या न्यायानें क्वचित् एखाद्या मतलबी आणि लबाड माणसाशीं त्यांना युक्तीनें वागावें लागत असेल. परंतु एरवीं त्यांचें सर्व वर्तन व व्यवहार चोख व सचोटीचा असतो; म्हणूनच मित्रांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास व भरंवसा आहे आधीं शब्द देणार नाहींत, पण दिल्यानंतर तो पाळण्याचा आटोकाट प्रयत्न करतील. पैसा खर्च करण्याचें त्यांच्या जिवावर येतें, हा त्यांच्या कंजूष स्वभावाचा भाग झाला. कवडीचुंबकपणाची त्यांना एक संवय लागून गेली आहे आणि आतां तो त्यांचा स्वभावच बनला आहे; पण वेळ

आली म्हणजे गोपाळरावांचा हवा तेवढा पैसा खर्च होतो. अनंतफंदीनें व्यावहारिक इशारा देऊन ठेवला आहे.

'मित्रासाठीं पदरमोड कर परंतु जामिन राहुं नको!'

पण गोपारावांनीं दोन्ही गोष्टी केल्या आहेत. मित्रांना जामीन राहून बुडाले आहेत आणि मित्रांसाठीं पदरमोडहि केली आहे. अशा रकमेचा आंकडा कित्येक हजारांपर्यंत जाईल. शेंकडों वेळां ते स्नेह्यासोबत्यांच्या उपयोगी पडलेले आहेत. इतकें करूनहि आपल्या या परोपकाराचा बोभाटा किंवा गाजावाजा ते करीत नाहींत. 'दे दान गुप्त उपकार करी न बोले' हें गोपाळरावजींचें सूत्र आहे. शिवाय स्नेही अगर नातलग आजारी असला तर वारंवार समाचाराला गेल्याशिवाय रहात नाहींत. नुसती कोरडी विचारपूस करून न थांबतां अडचणींत असलेल्यांना त्यांनीं आर्थिक मदत केलेली आहे. औषधोपचारांत लक्ष घालून त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था करून बोलून-चालून त्यांना धीर देत. कोणी निकटचा स्नेही परगांवीं शरपंजरीं पडला असला तर पदरमोड करून, ऑफिसांतून महिना महिना रजा काढून त्याच्याकडे जाऊन राहून त्याची शुश्रूषा त्यांनीं केलेली आहे.

ते आनंदाचा प्रसंग, लग्नकारण टाळतील, नव्हे टाळतातच; पण दुःखाच्या प्रसंगीं मात्र त्यांचें पुढें पाऊल असतें. मित्र अडचणींत असला तर त्याच्या संकटसमयीं विचार करीत बसायचे नाहींत– उडी टाकून मदतीला धावतील.

## मोठा मित्रपरिवार

गोपाळरावांच्या गोतावळ्याप्रमाणेंच त्यांचा मित्रपरिवार मोठा आहे. त्यांच्याइतक्या केलेल्या व टिकविलेल्या ओळखी क्वचित् सांपडतील. नकलेच्या निमित्तानें त्यांच्या रावापासून रंकापर्यंत ओळखी झाल्या. नाटक मंडळ्या तर सगळ्याच त्यांच्या परिचयाच्या. सुप्रसिद्ध किर्लोस्कर कंपनींतले कै. शंकरराव मुजुमदार प्रभृति जुने नाट्यव्यवसायी त्यांच्या चांगले घष्टणींतले. किर्लोस्कर कंपनींत कित्येक वेळां त्यांचा कार्यक्रम झालेला होता. संगमनेरचे नानासाहेब परशरामी वकील, कै. कृष्णाजी शिवराम ऊर्फ बाळासाहेब परांजपे, नाशिकचे काकासाहेब गद्रे वकील व शाळा खात्यांतील डेप्युटी कै. तखडकर इत्यादि त्या वेळचे डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी भोंड्यांचे अगदीं निकटचे बैठकींतले स्नेही.

गणपतराव बोडस तर गोपाळरावांचे शाळेंतले वर्गमित्रच. बालगंधर्वांचा स्नेह तसाच फार जुना आहे. पुढें गंधर्व नाटक मंडळीचा मुक्काम पुण्यांत असला म्हणजे कंपनीच्या बिऱ्हाडीं भोंड्यांच्या नकलांचा एक कार्यक्रम ठरलेलाच असे. अर्थातच त्यांत शंकरराव मुजुमदार, नानासाहेब जोगळेकर (पहिले धैर्यधर) आणि खुद्द बालगंधर्व यांच्या खटकेबाज व खुबीदार संवादाची नक्कल न चुकतां व्हावयाची, हें सांगावयास नकोच. खुद्द नारायणरावांना आपली स्वतःची नक्कल पाहून खूप मौज वाटे आणि ते पोट धरधरून हंसत. नारायणरावांनीं खूष होऊन भोंड्यांना म्हणावें : 'देवा, आतां एकदां आमचं नाटक पहायला केव्हां येणार?' गोपाळराव रागाचा आविर्भाव आणून म्हणत : 'बाकी काय वाटेल तें सांगा, पण तेवढी नाटक पहायची शिक्षा करूं नका.' उत्तम नाटक करणाऱ्या गोपाळरावांना नाटकांत रस नव्हता-मग तें बालगंधर्वांचें असो, नाहींतर आणखी कोणाचें असो. कै. डॉ. अनंतराव जेजुरीकर यांचा व गोपाळरावांचा चांगला स्नेहसंबंध होता. अनंतरावहि उमद्या व आनंदी स्वभावाचे असून दुसऱ्याला उपयोगी पडण्याची त्यांची वृत्ति असे. दोघेहि पानतंबाखूचे भोक्ते असल्यामुळें त्यांच्या बैठकी रंगत असत.

## दोस्तांच्या रंगणाऱ्या बैठकी

एकदां गमतीनें गोपाळरावांना नाटकांत छोटेंसें काम करायला लावायचें, असा नारायणरावांचा व भोंड्यांचा अलिखित ठराव झाला होता. अखेर गमतीचा योगायोग जमून आला. परंतु गोपाळरावांना स्वतःला मात्र नाटकांत काम जमेलच, असा भरंवसा वाटत नव्हता. पण नटसम्राट स्नेह्याच्या प्रेमळ आग्रहास्तव गोपाळरावांनीं ही कामगिरी पत्करली. नकलाकार नट बनला. पुण्याला 'एकच प्याल्यां'त तीन छोट्या भूमिका यशस्वीपणानें एकाच वेळीं करून आपलें वैशिष्ट्य त्यांनीं प्रकट केलें. मात्र अशा 'एकच प्याल्या'चा एकच प्रयोग झाला. त्याची सविस्तर हकीगत पुढील प्रकरणांत दिली आहे.

गोपाळरावांचे जुने समवयस्क किंवा समानशील स्नेही जमले-भेटले म्हणजे त्या बैठकीला जो रंग चढतो तो कांहीं और असतो यांत शंका नाहीं. आधींच गोपाळराव गमत्या स्वभावाचे, थट्टेखोर, विनोदप्रिय. त्यांतून नकलांचा हुकमी एक्का हाताशीं. मग खेळ रंगायला किती उशीर? हास्य-

विनोदाचा किल्ला हां हां म्हणतां सर व्हायचाच. कोट्या–प्रतिकोट्या, जुन्या आठवणी, पूर्वींचे गमतीचे प्रसंग इत्यादिकांनीं हास्यरसाची चंगळ उडते आणि विनोदसागराला भरती येते.

बहुधा कोणत्याहि बैठकींत एखादा ‘कच्चा गडी’ बावळट माणूस किंवा थट्टेचें पात्र असतेंच. अशी शिकार हेरून जेव्हां भोंडे त्याला ‘बनवितात’ तेव्हां फार मौज येते. त्या एकाचा बळी जातो खरा, पण त्याच्या जिवावर बाकीच्यांची चंगळ उडते.

## बसत्या बैठकींतले ‘बळी’

चेहरा-मोहरा आणि आविर्भाव क्षणाक्षणांत बदलणें, हा त्यांच्या हातचा मळ आहे. त्यांचा तो नित्याचाच खेळ होय. किंबहुना हाच त्यांच्या अप्रतिम अनुकरणकलेचा उत्कृष्ट पुरावा आहे. बोलणाऱ्याशीं बोलतां बोलतां कोणाची तरी किंवा खुद्द त्याचीच नक्कल गोपाळराव त्याला नकळत इतक्या जलद सफाईनें आणि सहजपणें करतात कीं, त्याला तर ती कळूं नये आणि आजूबाजूंच्या मंडळींनीं मात्र खो खो हंसावें! पुन्हां गोपाळराव स्वतः गंभीरच. जसे कांहीं त्या गांवचेच नाहींत! त्यांच्या कलेला आणि नकलेला ‘बळी’ पडलेला मनुष्य मात्र हास्यास्पद झाल्यामुळें आणि बाजूची मंडळी कां हंसत आहेत याचें कारण नीटसें न उमगल्यामुळें बावरतो, गोंधळतो. फिरून ‘संभावित’ गोपाळराव त्याला गोंजारून त्याच्या तोंडावरून हात फिरवायला तयारच. क्वचित् त्या गृहस्थाच्या लक्षांत भोंड्यांचा हा प्रयोग आलाच, तर गोड बोलून, कमीपणा घेऊन, लीनपणा दाखवून त्याची समजूत काढण्यांत गोपाळराव भोंड्यांइतका पटाईत दुसरा कोणीच नसेल. “तुम्हांला राग तर नाहीं ना आला?” गोपाळराव त्या ‘बळी’ घेतलेल्या माणसाला जेव्हां हा प्रश्न सौम्य आणि समजुतीच्या स्वरांत विचारतात त्या वेळीं तो माणूस रागावला असला तरी शांत होतो, विरघळून जातो. बसल्या बैठकींत मित्रमंडळींत, झटपट रंगाऱ्याप्रमाणें अशा तऱ्हेच्या गमती करणें आणि हंशा पिकविणें हा गोपाळरावांचा सहज खेळ आहे. या खेळांत कांहीं जणांचा जीव जातो ही गोष्ट मात्र खरी! असें करण्यांत मूळ हेतु कुचेष्टेखोरीचा नसून केवळ मौजेचा आहे, हें लक्षांत घेण्याइतका सारासारविवेक

व समजूतदारपणा ज्यांच्यापाशीं आहे ते लोक रागावत नाहींत. एवढेंच नव्हे तर कांहीं खेळाडू खेळकर वृत्तीचे लोक गोपाळरावांच्या नकलेच्या चेंडूनें स्वतःची दांडी उडालेली असून देखील त्यांतली मौज चाखतात आणि गोपाळरावांच्या झटपट विनोदी नकलेनें निर्माण झालेल्या हास्यकल्लोळांत सानंद भाग घेतात आणि समरस होतात.

## नकलेचें भय

परंतु कांहीं अकारण गंभीर, स्वतःला शिष्ट समजणारे लोक आपला हा अपमान किंवा टवाळी आहे असें समजून संतापतात, चिडतात आणि अधिकच हास्यास्पद होतात. कारण चार मंडळी जमल्यावर असे हौसेमौजेचे थट्टामस्करीचे प्रकार चालावयाचेच. बैठकींत बसल्यावर लहान कोण आणि मोठा कोण? मात्र अशा खाजगी बैठकींतून विनोदाला जी भरती येते आणि हास्यरसाची जी चंगळ उडते ती सांगतां पुरवत नाहीं. मिष्टान्नाची गोडी जशी चाखल्याशिवाय कळत नाहीं, त्याप्रमाणें या हास्यरसाची लज्जत तसे मौजेचे प्रसंग प्रत्यक्ष अनुभवल्याशिवाय कळणें शक्य नाहीं.

गोपाळराव सहज पान-तंबाखू खात बसले असले तरी त्यांची शोधक व बुभुक्षित नजर घारीप्रमाणें आपलें ‘ भक्ष्य ’ हुडकण्याकरितां सारखी फिरती असते. जरा कुठें विशेष किंवा वेगळें दिसलें कीं, त्यांनीं तें टिपलेंच म्हणून समजावें. भोंड्यांच्या सहवासांत येणारा प्रत्येक जण किंचित् कावराबावरा व धागधुगींत असे, त्याचें कारण हेंच. त्यांचे स्नेही प्रसिद्ध नाटककार गडकरी याच पापाला भीत असत. राम गणेशांनीं भोंड्यांना अशी लालूच दाखविली होती कीं, “ माझं एक नाटक मी तुम्हांला अर्पण करीन; पण माझी नक्कल नका करूं. ” गडकऱ्यांसारखे स्वतःच्या नकलेला बिचकणारे लोक पुष्कळ होते. भोंड्यांनीं गडकऱ्यांच्या वरील विनवणीला मान देऊन किंवा बळी पडून त्यांची नक्कल केली नाहीं, असें वाटत नाहीं. गोपाळरावांनीं मनांत आणलें असतें तर त्यांनीं नक्कल न करण्याच्या विनवणीचीच नक्कल हुबेहूब वठविली असती. पण तो योग आला नाहीं एवढेंच. आपली नक्कल होऊन आपण हास्यास्पद होऊं, असें वाटून कांहीं स्नेही मंडळी व परिचित लोक भोंड्यांना टाळीत असत. पूर्वींच्या पाठ्य-पुस्तकांतून ‘ नकल्याच्या संगतींत

झोपेचें खोबरें ' या नांवाची एक गमतीदार गोष्ट असे. त्याप्रमाणेंच या नकल्याच्या संगतींत आपल्या अब्रूचें खोबरें होईल, अशी भीति या मंडळींना वाटत असे. ज्या गोष्टीकरितां भोंडे कांहीं जणांना अत्यंत प्रिय, त्याच कारणाकरितां ते कांहीं जणांना अप्रिय व्हावे, हा योगायोग गमतीचा नव्हे काय?

## अखेर नकल्या तो नकल्याच !

गोपाळरावांना दुसरा कसलाच छंद नाहीं. वृत्तपत्रें, कादंबऱ्या, किंबहुना कोणतींहि पुस्तकें वाचण्याचा नाद नाहीं, हौस नाहीं व पात्रताहि नाहीं. नकलेच्या कलेमुळें त्यांच्या सर्व नाटक मंडळ्यांशीं ओळखी झाल्या. परंतु अद्यापपावेतों त्यांनीं एकहि नाटक पुरतेपणीं पाहिलेलें नाहीं. गायनकलेशीं त्यांचा छत्तीसाचा आंकडा आहे राजकारण म्हणजे काय आणि समाजकारण कशाशीं खातात याचा बिचाऱ्या गोपाळरावांना पत्ताहि नाहीं! नाहीं म्हणायला श्रवणाची आवड थोडीबहुत आहे. कथा-कीर्तन-प्रवचन अगर व्याख्यान असलें तर गोपाळरावांची स्वारी तिथें असावयाचीच तिथें कांहीं ऐकायला जातात का नकला करायला जातात कोणास ठाऊक! बहुधा दोन्ही हेतु थोडे थोडे असतील. आहिताग्नि राजवाड्यांचीं प्रवचनें त्यांना फार आवडत. पण ऐकायला जातां जातां एके दिवशीं त्यांनीं राजवाड्यांची नक्कल बसावलीच. शेवटीं नकल्या तो नकल्याच! 'मूळ स्वभाव जाईना ' ही तुकारामबोवांची मखे कांहीं खोटी नव्हे!

## अंगलट, आवाज व आकृति

निसर्गानें नकलांना अनुकूल असाच शरीराचा डौल गोपाळराव भोंड्यांना बहाल केला आहे असें दिसतें. 'पानी तेरा रंग कैसा? तो जिसमें मिलावे वैसा।' अशा तऱ्हेची एकंदर अंगलट व चेहरामोहरा या सुप्रसिद्ध नकलाकाराला मिळालेला आहे. त्यांचे सर्व अवयव, बांधा, रंग, कांति इत्यादि मध्यम व माफक प्रमाणांत आहेत. कशाचाही अतिरेक नाहीं. उंची मध्यम. वर्ण निमगोरा–काळाहि नाहीं गोराहि नाहीं. जाडी किंवा लठ्ठपणा तसाच बेताचा अंगाबरोबर. नाक, कपाळ तसेच. डोळे मोठे आहेत पण ते प्रसंगविशेषीं बारीक करतां येतात. अशा तऱ्हेची एकूण चेहरेपट्टी व अंगयष्टि असल्यामुळें अनुकरणाच्या वेळीं तींत वारंवार अनुरूप बदल करणें त्यांना

सोयीचें जातें. या नैसर्गिक अनुकूलतेचा गोपाळराव मोठ्या कौशल्यानें उपयोग करून घेतात.

गोपाळरावांचा आवाज व त्यांची बोलण्याचालण्याची पद्धत कशी आहे, हें समजणें खरोखरच दुरापास्त आहे. नकला अंगांत मुरून इतक्या अंगवळणीं पडल्या आहेत व त्यामुळें सहज बोलतांना देखील ते नकळत इतक्या विविध तऱ्हेचे अंगविक्षेप, हावभाव आणि आवाजाचे चढउतार करतात कीं, त्यांत खुद्द मूळच्या गोपाळरावांचा भाग किती हें सांगणें शक्य नाहीं. हंस एक वेळ दूध आणि पाणी वेंचून वेगळें काढील; पण गोपाळरावांच्या खासगी संभाषणांतून परिचितालाहि अस्सल आणि नक्कल वेगवेगळी काढतां यावयाची नाहीं. अशी कांहीं त्यांची मजेदार गल्लत गोपाळरावांच्या एकूण वागण्यांत होऊन बसली आहे. म्हणूनच त्यांच्याशीं बोलणारा नेहमीं बिचकत असतो. कांहीं वेळ गोपाळराव खरें बोलत आहेत का कांहीं थट्टेचा प्रकार आहे, याची त्याला खात्री वाटत नाहीं. हें लक्षांत येऊन गोपाळराव हंसून, त्याच्या पाठीवर थाप मारून जेव्हां त्याला 'तसें कांहीं नाहीं' असें स्मितहास्ययुक्त गंभीर आश्वासन देतात, तेव्हां कुठें त्याची बरीचशी संशयनिवृत्ति होते. सारांश, नकलाकार गोपाळरावांची मूळची लकब उलगडणें आतां कठीण आहे. कारण नकलेच्या वेळीं नकला आणि एरवीं मात्र नैसर्गिक सहजपणींचा व्यवहार, असा दुजाभाव आतां राहिलेला नाहीं नकल्येपणा रक्तांतच भिनला आहे. नकला करतां करतां गोपाळरावांनीं पटुत्व कमावलें असेल पण स्वत्व मात्र गमावलें, यांत शंका नाहीं !

## कुटुंबाचा धनी व सेवक

भोंडे कुटुंब मोठें आहे व त्यांचा गोतवाळाहि विस्तृत आहे. तरी देखील गोपाळराव एकटेच आहेत, असें म्हटलें पाहिजे ! त्यांची पत्नी निवर्तलेली. मूलबाळ नाहीं. अशा स्थितींत त्यांनीं मनांत आणलें असतें तर स्वतःपुरतें चैनींत व ऐषआरमांत लोळत रहाणें गोपाळरावांना सहज शक्य झालें असतें. तितकी ऐपत ईशकृपेनें त्यांना खास प्राप्त झालेली आहे. वेगळें राहणें आणि चैन करणें या दोन्ही गोष्टी त्यांच्या वृत्तींत नाहींत. पूर्वींपासून चालत आलेलें एकत्र कुटुंबच ते कारभारीपणानें पुढें चालवीत आहेत. कुटुंबांच्या सुखांतच ते रंगले आहेत आणि

कुटुंबाच्या कल्याणाचीच चिंता वहात आहेत. गोपाळरावांचें सध्यांचें रहातें घर त्यांच्या वाडवडिलांपासूनच गेलीं नव्वद वर्षें भोंडे कुटुंबाचें वसतिस्थान आहे. त्यांचे कनिष्ठ वकील बंधु श्री. नानासाहेब भोंडे व ज्येष्ठ बंधु कै. पांडुरंगपंत ऊर्फ तात्या यांचीं मुलें यांच्यासह गोपाळराव याच घरांत रहातात. लहानपण गेलेलें व आयुष्यभर अनेक सुखदुःखाच्या प्रसंगांशीं निगाडित झालेलें हें जुनें घर सोडून दुसरीकडे रहायला जाण्याचा विचार त्यांच्या मनांत सुद्धां येणें शक्य नाहीं. बंधूंचा व पुतण्यांचाहि प्रपंच बराच वाढला आहे सर्वच कुटुंबांतल्या मंडळींवर त्यांची फार माया आहे. पुतण्यांना तर त्यांनीं आपलेच मानलें आहे. पुतणे लहानाचे मोठे झाले असले तरी गोपाळरावांच्या प्रेमळ छत्राखालीं त्यांना अजून दारचें ऊन कसें तें माहीत नाहीं. नानासाहेब आपल्या वकिलीच्या व्यवसायांत व सार्वजनिक कार्यांत मग्न असतात. लग्न-कारण तर राहोच पण मंडई, बाजारहाट, दाणावैरण आणण्यापासून गोपाळ-रावच सगळें पहातात. अप्पासाहेबांनीं कुटुंबाची सेवा प्रथमपासून केली आहे. त्यांत त्यांना शीण वाटत नाहीं, कर्तव्य वाटतें. केशराची पूड खलून श्रीखंडांत कालवावी किंवा लिंबाच्या रसांत घातलेली चमचाभर साखर त्यांत विरून जावी त्याप्रमाणें गोपाळराव आपल्या एकत्र कुटुंबाशीं एकरूप व समरस झालेले आहेत. अप्पासाहेबांचा स्वभाव एकलकोंडा नाहीं, संगति-प्रिय आहे. ते चार मंडळींतले आहेत. चार मंडळींना धरून राहणारे आहेत. स्वतःपुरता पैसा गांठीला असला तरी ते एकटे कुठें जाणार? त्यांना अत्यंत प्रिय घरांतलीं मुलेंबाळें. त्या लहानग्यांबरोबर स्वतः लहान होऊन त्या लीलेंत दंग होणें व रमणें हा त्यांचा आवडता उद्योग आहे. ते मुलांचे लाड व कोडकौतुक फार करतात. कांहीं वेळेला त्यांचे फाजील चोचले पुरविण्यापर्यंत त्यांच्या मायेची मजल जाते. त्यामुळें मुलांना जो धाक व शिस्त लागायला हवी ती लागत नाहीं. पण या बाबतींत ते इतका विचार करीत बसत नाहींत.

### सतत उद्योग

गोपाळराव कधीं स्वस्थ बसले आहेत, असें दिसावयाचें नाहीं. आळस त्यांच्या गांवींहि नाहीं. त्यांचा कार्योत्साह दांडगा. पूर्वीं तर ऑफिस करून

शिवाय रात्रीं नकलांचा भरपूर कार्यक्रम ठोकायला स्वारी तयार असायची. रात्रीं जाग्रणें केलीं तरी सकाळीं पायांवर उभे. कुठें जायचें काम निघालें कीं डोक्यावर टोपी ठेवून बाहेर पडावयाला तयार. निरलसता हा त्यांच्या गुणसमुच्चयांतला मुकुटमणि आहे म्हटलें तरी चालेल. सतत उद्योग करीत रहाण्याची त्यांना संवय आहे. नव्हे, त्याशिवाय त्यांना चैन पडायचें नाहीं. पायीं चालण्याची दांडगी संवय आणि हौसहि. आतां गुडघे दुखतात त्यामुळें चार पावलें टाकायची देखील मारामार आहे हें सोडून द्या. पण दोन वर्षांपूर्वींपर्यंत भिंगरींसारखे फिरायचे जिकडे तिकडे शारीरिक मेहनतीचें त्यांना कांहीं वाटत नाहीं. कष्ट करण्याची संवय लहानपणापासून लागली ती आतां कायमच झाली आहे. त्यामुळेंच त्यांची तब्येत व कार्यक्षमता या वयापर्यंत इतकी टिकली आहे. विद्या जशी दिल्यानें वाढते तसेंच शरीर झिजल्यानें टिकतें! गोपाळरावांच्या दीर्घायुष्यांतली गुरुकिल्ली हीच आहे. शिवाय त्यामुळें–

'उद्योगाचे घरीं। ऋद्धि सिद्धि पाणी भरी॥'

असा 'ट्रान्सफर सीन' दिसतो तो वेगळाच. लक्ष्मी लहरी खरी, पण म्हणून ती आळशाला भेटणार थोडीच!

### कलमबहाद्दर

ब्यायशीं वर्षांचे हंसतमुख रँग्लर परांजपे नेहमीं म्हणतात: कोणतीहि गोष्ट मी मनाला लावून घेत नाहीं म्हणून इतका जगलों. भोंड्यांचेंहि तसेंच आहे. भल्या-बुऱ्या प्रसंगांचा फारसा परिणाम होऊं न देतां आणि कशाचाहि फारसा विधिनिषेध न बाळगतां गोपाळराव आपली धिम्मी वाटचाल चालू ठेवतात. ते फारसे मागें पहात नाहींत, पुढें पहातात. तें सुद्धां फार पुढचें नाहीं, नजिकचें. पेन्शन घेतल्यावर पुष्कळ लोक फुकट जातात. कोणी आळशीपणांत दिवस घालवितात, कोणी चैनीच्या किंवा व्यसनांच्या मागें लागतात, कोणी आजारांत गुरफटतात. गोपाळरावांनीं पेन्शन घेतल्यावर खासगी नोकरी धरली. वेळ जायचें साधनहि झालें, चार पैसेहि मिळाले, बिघडलें काय? शिवाय नकलांचा व्यासंग कायमचा आहेच. पुढें खासगी नोकरीचें काम संपलें. गोपाळरावांचे धाकटे बंधु नानासाहेब यांचा व्यवसाय

दिवाणी वकिलीचा असल्यामुळें दाव्यांतील कागदपत्रांच्या नकलांची त्यांना नेहमींच जरूर असते. गोपाळराव नानासाहेबांकडून त्यांच्या कोर्टातील कामकाजाचे कागद मागून घेत व दुपारीं फावल्या वेळीं कारकुनी पद्धतीप्रमाणें तक्क्याला टेकून अर्ध्या नाकावर चष्मा ठेवून नेहमींप्रमाणें एका हातानें घाम पुशीत, आपल्या लपेटबाज सुंदर मोडी अक्षरांत कागदांच्या नकला तयार करीत व दुसऱ्या दिवशीं नानासाहेबांच्या स्वाधीन करीत. खर्डेघाशीचा कित्येकांना कंटाळा आहे. पण गोपाळरावांना त्या लिहिण्याच्या लयींत रस लागतो. आनंद वाटतो. माणसांच्या उत्कृष्ट नकला करणारा हा बहाद्दर कागदपत्रांच्याहि नकला तितक्याच चांगल्या करतो, हें पाहून मौज वाटल्याशिवाय रहात नाहीं. पण भोंडे केवळ नकला खरडण्याचें यांत्रिक व कारकुनी कामच करूं शकतात असें नाहीं. गोपाळराव मोठ्या व गुंतागुंतीच्या दस्तऐवजांचे ड्राफ्ट किंवा मसुदेहि चांगले करतात. त्याबद्दल त्यांना तज्ज्ञ मंडळींकडून शाबासकी मिळालेली आहे. ड्राफ्ट करणें याचेंसुद्धां एक शास्त्र आहे. या कामांतली त्यांची हुशारी ऑफिसच्या सरकारी कामकाजांत त्यांनीं अनेक वेळां दाखविलेली आहे. गोपाळराव भोंडे दोन्ही अर्थांनीं कलमबहाद्दर आहत.

## पैशासाठीं अडवणूक नाहीं

आप्पासाहेब चतुर व चाणाक्ष असले तरी त्यांचा स्वभाव भिडस्त व ढिला आहे. कोणीं फार गळ घातली किंवा धरणें धरून बसला तर त्याला बळी पडतील. त्यांच्याच्यानें नाहीं म्हणवावयाचें. नाहीं त्यामुळें सबंध नोकरींत त्यांना शिल्लक म्हणून टाकतां आली नाहीं हातावर कायमची कात्रा. अशी परिस्थिति असल्यामुळें नकलांच्या कार्यक्रमानें कांहीं अधिक जोड मिळाली तर हवीच होती. तथापि नकलांच्या बाबतींत मोबदल्याची अट अशी त्यांनीं कधीं घातली नाहीं. नकला ठरवायला आलेले लोक विचारीत: 'तुम्ही काय घ्याल?' त्यावर भोंडयांचें ठरीव उत्तर असे: 'तुम्हांला जशी सवड असेल तसें करा. कांहीं दिलें नाहीं तरी चालेल.' अशा रीतीनें स्वतः आंकडा न सांगतां ते लोकांवर सोंपवीत. नकलांचा कार्यक्रम बहुतेक मोठमोठ्या गांवीं व बहुतेक संस्थांत झालेला आहे. शेंकडा

पंच्याहत्तर जागीं भोंडे हे कांहीं एक न मिळतां आपल्या रम्य कलेचे कार्यक्रम मनापासून व भरपूर करीत आले आहेत. जे कोणी स्वेच्छेनें देतील त्यांत ते संतुष्ट असतात, हें त्यांचें वैशिष्ट्य होय. उलट ज्या ठिकाणीं मोबदला मिळावयाचा नसतो अशा ठिकाणीं नकला करावयाला त्यांना अधिकच उमेद व हुरूप वाटतो. गोपाळराव नेहमीं म्हणतात : ' नकला फुकट असल्या म्हणजे डोक्यावर ओझं नसतं. जबाबदारी व धाकधूक वाटत नाहीं. समजा नाहीं रंग भरला, तरी त्या लोकांना बोलतां येणार नाहीं. ' पण मौज ही कीं, डोक्यावर दडपण नसल्यामुळें मोकळ्या मनानें केलेल्या नकला अधिकच सफाईदार व कलापूर्ण होतात, असा त्यांचा अनुभव आहे.

## कलेचा काळा बाजार

तात्पर्य, गोपाळरावांनीं पैशासाठीं हौशी व श्रवणोत्सुक प्रेक्षकांची कधीं निराशा केली नाहीं. नकला ठरविण्याकरितां आलेल्या कोणालाहि पैसे नाहींत किंवा कमी आहेत म्हणून विन्मुख दवडलें नाहीं. ' देगा उसका भी भला, न देगा उसका भी भला ' अशा प्रकारचें त्यांचें या बाबतींतलें धोरण आहे. द्रव्याकरितां आढेवेढे घ्यावे किंवा प्रयोगांत अंग चोरावें, असें त्याच्या स्वप्नांतहि येत नाहीं. गोपाळराव इतर कांहीं कलावंतांप्रमाणें अडेलतट्टू नाहींत. एक नामवंत, प्रस्थ माजलेले महाराष्ट्रीय गायक आहेत. स्वतः पैशाकरितां अडवणूक करणें किंवा ओढून धरणें तर वाईट दिसतें, नांवाला बट्टा लागतो व गिऱ्हाइकीवरहि परिणाम होतो. मग त्याच्या प्रभावळींतले री ओढणारे लोक भोंवतीं असतातच. त्यांना खुणावलें किंवा न खुणावतांहि ते तितके स्वयंभूच बनेल असले म्हणजे ते सौदा करूं लागतात गायकबुवांनीं मधून-मधून भलेपणा घ्यायचा आणि तुटूं द्यावयाचें नाहीं असा तो सिद्धसाधकपणा चालतो. शेवटीं काजीमुल्ला करून गाणें ठरवायला आलेल्या गिऱ्हाइकांना जास्तींत जास्त चढवायचें. शिवाय बिदागीची रक्कम आगाऊ पदरांत पाडून घ्यावयाची तें वेगळेंच. वास्तविक सदर संगीताचार्योंनीं बरीच माया जवळ केली आहे. तरी देखील असे डावपेंच लढवून गिऱ्हाइकांना ' बनविण्याचा ' त्यांचा बेसूर स्वरव्यापार चालूच आहे. आणि इतकेंहि करून सर्वोतला कळस हा कीं, आपल्या गायनकलेची शिकस्त तर राहोच पण योग्य तें

कसबहि न दाखवितां जेमतेम वेळ मारून न्यावयाची. लक्षांत आलें तरी बड्या धेंडाला जाब कोण विचारणार ! गाणें थोडें आणि अवडंबर **मोठें**. नाटकीपणानें हंसण्याचा आणि शेजारच्या माणसांशीं टाळ्या देण्या-घेण्याचाच सपाटा जास्त. गायकाच्या खिशांत पैशांची रास आधींच ओतून बसलेला बिचारा व्यवस्थापक फजीत होऊन मनांतल्या मनांत चुरमुरे खात स्वस्थ बसतो ! संगीतकलेंतील हा शुद्ध काळा बाजार नव्हे काय ? अशा चलाखीमुळेंच ठेच खाल्लेल्या एका मोठ्या गृहस्थानें सदर संगीतकलाप्रवीणाला ' पान्हा चोरणारी गाय ' अशी वाङ्मयीन शिवी हांसडली होती !

## भोंड्यांजवळ भाडोत्रीपणा नाहीं

भोंड्यांनीं कधीं भाडोत्रीपणा केला नाहीं किंवा लग्नांतल्या हुंड्याप्रमाणें आपल्या कलेचा बाजार मांडला नाहीं. पैसा मिळाला तर कुणाला नको आहे ? पण गोपाळराव स्वसंतोषानें देऊं केलेल्या पैशाची किंमत अधिक समजतात. ' अकृत्वा परसन्तापम् -- दुसऱ्याला यत्किंचितहि त्रास द्यावयाचा नाहीं अगर भार घालावयाचा नाहीं, हें त्यांच्या वागण्यांतलें मुख्य सूत्र आहे. हें व्रत पाळून जरी थोडें मिळालें तरी तेंच पुष्कळ, अशी त्यांच्या मनाची धारणा आहे. थोर कलावंताला साजेशी अशीच ही त्यांची वृत्ति आहे. कलावंताचे श्रम शक्यतों फुकट जाऊं नयेत, असा रसिकांचा बाणा असावा. उलट रसिकांचा खिसा पाहूनच कलावंतानें आपली अपेक्षा धरावी. उभयपक्षांनीं अशी समंजस व उदार वृत्ति दाखविली तर वरच्यासारखे चकमकीचे व वंचनेचे कडवट प्रसंग न येतां कलाविकासाला मदतच होईल. गोपाळराव भोंडे बिदागीची घासाघीस किंवा आग्रह धरीत नाहींत. असो वा नसो, प्रेक्षकापुढें ते आपल्या नकलेचें सर्व भांडार खुलें करतात. कलेची करामत दाखवायची शिकस्त करतात. त्यांना द्रव्यलाभ हवा आहे पण द्रव्यलोभ नको आहे त्यांच्या कार्यक्रमांत अंगचोरपणा यत्किंचितहि नसतो. कुचराई हा शब्द त्यांच्या कोशांत नाहीं. प्रेक्षकांचें समाधान करण्याच्या बाबतींत त्यांना पूर्वाश्रमींच्या बालगंधर्वांचीच उपमा साजेल. चारचारदां एकेक पद म्हणून झालें आणि तरीहि अतृप्त श्रोत्यांनीं ' वन्स मोअर ' दिला कीं नारायणरावांची स्वारी पडद्यांतून पुन्हा बाहेर यायचीच ! प्रेक्षकांकडून चुकती पावती मिळविणें

त्यांना कर्तव्य वाटे. संगीताची ती पोटभर मेजवानी नाट्यरसिक कधींहि विसरणार नाहींत. अंग चोरणाऱ्यांनीं स्वरसम्राटांचें हें उदाहरण मनन करावें. असो. गुणज्ञांनीं केलेली गुणीजनांची वाहवा हेंच त्यांचें खरें बक्षीस, असें भोंडे मानतात तें योग्य नव्हे काय? यालाच म्हणायचें कलेशीं इमान.

कलावंतांनीं आपल्या कलेशीं व रसिकवर्गाशीं निष्कपट व निरपेक्ष निष्ठा बाळगण्याचें व्रत पत्करलें पाहिजे. त्यांत चांगुलपणा मिळतो, लौकिकहि वाढतो आणि त्यामुळें प्रारंभीं जरी फारसा फायदा झाला नाहीं तरी अखेर आर्थिक दृष्ट्या फायदाच होतो, हें तात्त्विक व व्यावहारिक सत्य कलावंत लोक लक्षांत व अमलांत आणतील तर त्यांत त्यांचा स्वतःचा आणि कलेचाहि उद्धार झाल्याखेरीज रहाणार नाहीं.

## नकलांखेरीज बाकी पूज्य

मोराचें सारें वैभव जसें त्याच्या चित्रविचित्र पिसाऱ्यांत असतें, त्याप्रमाणें भोंड्यांचें सर्व वैशिष्ट्य त्यांच्या कलाविलासांत केंद्रित झालेलें आहे. निसर्गदेवतेच्या देणगीची तऱ्हा कांहीं औरच असते. गुणांचा पुंजका एका जागीं न देतां ती वांटणी करीत असते. तिनें प्रसन्न होऊन भोंड्यांच्या मस्तकांत एकच कलेचा चमकणारा मणि ठेवून दिला आहे. पण तेवढ्यानें त्यांचें सर्वसामान्य जीवन असामान्यत्वानें उजळून निघालें आहे. प्रत्येकांत एखादें वैशिष्ट्य असतें. एकेका माणसांत एकेक गुण असा असतो कीं, वा रे वा! पहाणाऱ्यानं तोंडांत बोट घालावें. तें वैशिष्ट्य हेंच त्याचें सारसर्वस्व, त्याचें व्यक्तित्व. तें कणीस काढून टाकलें तर खालीं चिपाडच उरणार. एक लाखाच्या संख्येंतला एकाचा आंकडा उडवला तर बाकीच्या शून्यांची काय किंमत? तो तो गुणविशेष हीच त्या त्या माणसाची शोभा. विष्णुशास्त्र्यांचें पहावें पल्लेदार मराठी. टिळकांचें हिंमतबाज पांडित्य. शिवरामपंतांचें वक्तृत्व. खाडिलकरांचें ओजस्वी नाट्यलेखन. कंठमाधुर्य आणि लाडिक अभिनय बालगंधर्वांचा. गाण्यांतली तडफ केशवराव भोंसल्यांची. तिरकवांचा तबला तर टेंब्यांची पेटी. त्याचप्रमाणें भोंड्यांची अनुकरणकला. तेवढी वजा केली तर बाकी पूज्य होईल. सगळ्यांना सगळें साधत नाहीं; एकेकांत एकेक गुण प्रकर्षानें तळपत असतो. तो काढला तर डोक्यांतला मणि हरपलेल्या

अश्वत्थाम्याप्रमाणें तो निष्प्रभच व्हावयाचा. नक्षत्रांपैकीं सत्ताविसांतले नऊ गेले तर खालीं उरणार काय ? शून्यच, अठरा नव्हे !

### स्वभाव-चित्र

दुसऱ्याचें चित्र रंगविणाऱ्या व्यक्तीचें चित्र रंगविणें अवघड आहे. मनाची मीमांसा कठीण. माणसाच्या स्वभावाचा कांहीं वरचा भाग तेवढा दृश्यमान असतो, पण आंतले थर व पापुद्रे झांकलेले असतात. गुप्त पोलिसा-प्रमाणें अनुमानाच्या साहाय्यानेंच स्वभावाचें कोडें उलगडीत बसावें लागतें. एरवीं ही झांकली मूठ उघडायची कशी ? कल्पनाशक्तीच्या रंगांनीं आणि तर्काच्या कुंचल्यानें बेताबेतानें रेघ-रेघोट्या काढाव्या तेव्हां स्वभाव-चित्र उभें रहावयाचें !

भोंड्याचा स्वभाव विरोधाभासांनीं भरलेला आहे. ते हंसतात आणि हंसवतातहि. गुदगुल्या करतील; वेळप्रसंगीं चिमटेहि घेतील. क्वचित् गुद्देहि देतील, पण इजा करणार नाहींत. भिडस्त आणि संकोची असले तरी धीट आणि कर्तव्यकठोर आहेत. मृदुभाषणी आणि मायाळू असले तरी वस्ताद आणि पक्के आहेत. एखाद्याला न दुखविलें तरी ओळखून ठेवतील. फसले तरी जाणूनबुजून फसतील. त्यांच्या बेहिशेबीपणांत हिशेब असतो आणि गबाळेपणांतहि गांठ असते. गोपाळरावांना द्रव्यलाभ हवासा असला तरी द्रव्यलोभ नकोसा आहे. पै-पैशाला जपतील पण एखादे ठिकाणीं भस्दिशीं हजार रुपये घालवतील. ते रस चाखणारे असले तरी त्यांतच डुंबत बसणारे नाहींत. नादी असले तरी संयमी आहेत. लोलुप असतील पण लाचार नाहींत.

अनेक दुःखें भोगूनहि त्यांची वृत्ति फुलपांखरासारखी आनंदी आहे. जणुं कालचा विचार नाहीं, उद्यांची पर्वा नाहीं. गोपाळरावांना पंचाहत्तर वर्षें झालीं यावर विश्वास बसत नाहीं. ते तितके म्हातारे दिसत नाहींत. त्यांच्या चिरतरुण कलेनें त्याचा उत्साह व उल्हास कायम राखला आहे. गोपाळ-रावाचें वयमान ' अवघें पाऊणशें ' आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. उतार-वयाबरोबर भोंड्यांच्यांतला भोंडेपणा उतरला नाहीं; होता तसाच आहे. ऐंशीच्या उंबरठ्यावर असूनहि ते तरुणांप्रमाणें रंगेल मधुकरवृत्तीचे व आस्वाद-लोलुप आहेत. तसेंच बालांप्रमाणें खोडकर-खेळकर व अल्लड-आनंदी आहेत.

या पिकलेल्या पानांत हिरवटपणा पुष्कळच आहे. गोपाळराव एक वृद्ध तरुण आहेत !

## सभ्यतेला थट्टेची फोडणी

गोपाळराव गमत्ये असले तरी गंभीरहि आहेत. त्यांच्या सभ्यतेला ग्राम्यतेची झांक आहे. तो आतां त्यांचा जन्मस्वभावच बनला आहे म्हणा ना. ते थोर असले तरी त्याचा पोरकटपणा गेलेला नाहीं. पण तीं हवा तितका माफक, मर्यादित व मार्मिक असल्यामुळें गोऱ्या गालावरच्या तिळासारखा उलट शोभादायकच ठरतो लसणीच्या खमंग फोडणीप्रमाणें त्यांत चटकदारपणा व चविष्टपणा उत्पन्न करण्याचा गुण आहे. त्यांच्या प्रमाणशीर ग्राम्यतेंत एक प्रकारची मोहक व प्रेमळ आकर्षकता आहे.

गोपाळराव चेष्टेखोर आहेत, पण कुचेष्टेखोर नाहींत. चिकित्सक आहेत, कुत्सित नाहींत. पांख मोजणारे आहेत वासे मोजणारे नाहींत. थट्टा-मस्करीनें रेवडी उडविणारे असले तरी सहाय्य व सल्लामसलत देण्याच्या योग्यतेचे व वृत्तीचे आहेत. मस्खीबाज असले तरी सत्प्रवृत्त आहेत, हें त्यांचें वैशिष्टय. भोंड्याचा स्वभाव कांहींसा प्रवाहपतितासारखा आहे. अंगावर आलें तर शिंगावर घेतील. आपण होऊन कांहीं करायला धांवायचे नाहींत. पण ओघानें आलेलें कर्तव्य करायला चुकायचे नाहींत. आचारनिष्ठ नसले तरी ईश्वरनिष्ठ आहेत.

अशा परस्परविरुद्ध गुणावगुणांनीं मंडित असा हा अष्टपैलू गृहस्थ आहे. व्यावहारिक बाबतींत तर तो एक मुरलेला मुरंबा आहे. अनुभवाचें जणुं सहस्रपुटी भस्म तयार झालें आहे. ते उत्तम नागरिक व आदर्श मित्र आहेत. समाजाचें भूषण आहेत. त्यांनीं जीवनाविषयीं कधीं भीति बाळगली नाहीं; तसेंच मृत्यूचें भय त्याना वाटत नाहीं. आपलें शेवटचें दुखणें कसें असेल, मरण कसें येईल व त्यानंतर कसकसें होईल, हा थट्टेचा विषय करण्याइतकी त्यांची विनोदबुद्धि प्रखर आहे. यांत त्यांचा विवेकी व निर्भय दृष्टिकोन दिसून येतो. त्यामुळेंच उतारवयांतहि त्यांची वृत्ति आनंदी आहे. पाण्यातल्या माशाप्रमाणें जीवनांत गोपाळराव स्वच्छंदानें, निःसंकोचपणानें आणि लीलेनें विहार करीत आले आहेत.

वृद्धांची संगति चित्ताला ग्लानि आणणारी असते, असें म्हणतात. परंतु गोपाळरावांची भेट हें एक इंजेक्शन आहे. त्यांचें संभाषण हें एक गोल्ड टॉनिक आहे : उत्तेजक, भार हलका करणारें, तरतरी आणणारें. ' आपणांसारखे करिती तात्काळ ' असा गुण त्यांच्या सहवासांत आहे.

## कलावंतांच्या दृष्टिकोनांतून

कस्तुरीमृगाप्रमाणें गोपाळरावांजवळ कलेचा एक सुगंध जबरदस्त आहे. त्याच्या सुवासिक व मादक वातावरणांत ते गुंग व तृप्त असतात. इतर पंचाइती त्या त्या वेळेपुरत्या. जो मरायला भीत नाहीं, तो जगायला काय भिणार ? मृत्युलोकची वस्ती क्षणभंगुर. माणूस म्हणजे चार दिवस आलेला पाहुणा. गुंजारव करणाऱ्या भ्रमराप्रमाणें जीवनांतला रसास्वाद शक्य तों घेत असावा. आहे तोंवर मिळेल तो आनंद चाखीत चुंफीत बसावें, कोय टाकून द्यावी. नाहीं त्या दिवशीं चालायला लागावें. अशीच जणुं गोपाळरावांची जीवनविषयक दृष्टि आहे.

* * *

: ३ :

# कलादर्शन

## न येणारे भाऊसाहेब कसे आले?

रात्रीं आठ वाजण्याचा सुमार. पुण्यांतल्या फौजदारी वकिलांचें स्नेह-भोजन होतें. चाळीस-पन्नास मंडळी जमून गप्पागोष्टी करीत बसली होती. पण त्यांच्यांतली एक नेहमींची प्रसिद्ध व्यक्ति मात्र हजर नव्हती. भालाकार भाऊसाहेब भोपटकरांनीं निक्षून सांगितलें होतें, मी येणार नाहीं म्हणून कांहीं कारणामुळें त्यांची या समारंभांत भाग घेण्याची इच्छा नव्हती. भाऊसाहेबांच्या वाणींत रसवंती होती. त्यामुळें ते हजर असतील त्या बैठकींत ते आपल्या विशिष्ट विनोदी संभाषणपद्धतीनें असा कांहीं रंग भरीत आणि हास्यरसाच्या उकळ्या फोडीत कीं, सांगतां सोय नाहीं. परिचितांना व नित्याच्या बैठकींतल्यांनाच त्याची कल्पना येऊं शकेल. या कारणामुळें जमलेल्या मंडळींना भाऊसाहेबांची अनुपस्थिति जाणवत होती. आज भाऊसाहेब पाहिजे होते, असें सगळे जण म्हणत होते. परंतु ती गोष्ट शक्य नव्हती. कारण भाऊसाहेबांचा करारी स्वभाव सर्वांना माहीत होता. पण मौज अशी झाली कीं, इतक्यांत शेजारच्या खोलींतून भाऊसाहेब भोपटकर आपल्या 'नेहमींच्या वाकड्या मानेनें' हळूहळू आंत आले आणि बैठकीवर येऊन बसले. भाऊसाहेब अनपेक्षितपणें आल्यामुळें सर्वांनाच आनंदाचा आणि आश्चर्याचा धक्का बसला होता. कोणी कुजबुजूं लागले, कोणी सामोरे गेले, कोणीं त्यांना बसायला जागा करून देऊं लागलें. पण थोड्या वेळानें मात्र सर्वांचाच भ्रमनिरास झाला! आपण सर्वच जण किती फसलों, याचा गोड अचंबा वाटून सर्व मंडळींत एकच हंशा पिकला.

कारण ते भाऊसाहेब नव्हते—ते भोंडे होते! भोंडयांनीं या प्रसंगीं सोंग तर खूप आणलें होतें भाऊसाहेबांची ती पेटंट काळी व तिरकी बसविलेली गोल टोपी, चष्मा, रेशीमकांठी उपरणें, वाकडी मान, पुढें आलेला खालचा बाबर ओठ—सर्व कांहीं जिथल्या तिथें होतें. भोंडे हे भाऊसाहेबांसारखे, नव्हे

भाऊसाहेब भासले, हें त्यांतलें वैशिष्ट्य होतें. त्यानंतर त्याच ठिकाणीं भालाकारांची समग्र नक्कल झाली. त्या वेळीं किती मौज व हास्यविनोदाची चंगळ उडाली असेल, याची मार्मिक वाचकांना कल्पना येईल. सदर प्रसंगीं ही नक्कल चालू असतांना मंडळी मधेंच कांहीं गमतीचे प्रश्न विचारीत होती. त्यांची उत्तरें देखील भोंडे भाऊसाहेबांच्या घाटाचीं व थाटाचीं आणि तशाच नोकझोकानें देत होते. त्यामुळें त्यांच्या कलेचें तेज, खुमारी व जिवंतपणा हा ऐकणाऱ्यांना अधिकच प्रतीत होत होता. आदर्श नक्कल म्हणजे नुसती बाह्यांगसदृशता नव्हे तर त्यांत त्या व्यक्तीच्या अंतरंगाचा, अभ्यंतरानुकरणाचाहि अंतर्भाव असावा लागतो, हें त्या वेळीं मनाला पटलें. त्या वेळचें वेषसादृश्य पाहून 'ऊपरसे तो बहोत बनी' असें तर वाटलेंच वाटलें; पण 'अंदरकी बात' देखील भोंडे चांगली जाणतात, असें श्रोत्यांना खचित वाटलें असेल यांत शंका नाहीं.

येथेंच भाऊसाहेब भोपटकरांबद्दलची आणखी एक घडलेली गमतीदार हकीगत देणें अप्रस्तुत ठरणार नाहीं. एकदां असें झालें कीं, टिळक स्मारक मंदिरांत भोंडे भालाकार भोपटकरांची नक्कल करीत असतांना भोपटकरांची मुलगी त्या वाटेनें गेली. तिनें घरीं गेल्यावर बापाला विचारलें, "हें काय? तुम्ही घरीं कसे हो? आतां पांच मिनिटांपूर्वीं टिळक स्मारक मंदिरांत तुमचं व्याख्यान चाललेलं मीं ऐकलं कीं!" भोपटकर चकित झाले व म्हणाले, "भोंडे असेल तो!"

येथें एक गोष्ट मात्र अवश्य सांगितली पाहिजे. भाऊसाहेबांची मुलगी नुसती पाहून पुढें न जातां जरी तें नकली व्याख्यान ऐकायला थांबली असती तरी देखील हे आपले भाऊसाहेब नसून भोंडे आहेत, याचा उलगडा तिला झाला नसता!

## १९५२ सालांत टिळकांचें व्याख्यान

साल १९५२ असेल पुण्यांतल्या शिवाजी मंदिरांत लोकमान्य टिळकांचें व्याख्यान चाललें होतें. गर्दी चिकार होती. मधून मधून टाळ्या पडत होत्या. टिळकांचें भाषण रंगांत येऊन परिणामकारक होत होतें. १९५२ सालांत टिळकांचें भाषण? हें कसें शक्य आहे? बरोबर आहे ते टिळक नव्हते, ते भोंडे

होते. पण केसरीचे माजी संपादक श्री. दा. वि. ऊर्फ बाबुराव गोखले यांना कांहीं काळ तसा भास झाला खरा. मानपत्रसमर्पणाच्या ऐतिहासिक प्रसंगाची ती नक्कल पहातांना श्री. गोखले इतके समरस झाले कीं, जणुं काय आपण प्रत्यक्ष टिळकांशेजारींच बसलों आहोंत व त्यांचें तें भाषण ऐकत आहोंत असें त्यांना वाटलें. बसल्या जागींच ते मनानें त्या जुन्या काळांत शिरले आणि त्यांनीं तो टिळकांचा प्रसंग व समारंभ अनुभविला.

'स्थानादनुच्चलन्नपि गत्वे व पुनः प्रतिनिवृत्तः।'

'जागचें न हलतांहि त्या ठिकाणीं जाऊन मी पुन्हां परत आलों आहें' या शाकुंतलांतील श्लोकांत कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें दुष्यंतासारखा गोड अनुभव श्री. बाबुराव गोखले यांना आला.

त्याचप्रमाणें टिळकांच्या नकलेविषयींची ही ना. सी. फडक्यांची आठवण पहा—

१९०५ सालीं पुण्यास प्लेगच्या दिवसांत हल्लीं ज्या ठिकाणीं फर्ग्युसन कॉलेजचीं नवीं वसतिगृहें आहेत त्या जागीं आम्ही झोपड्यांत रहात होतों. एके दिवशीं रात्रीं कॅंपांतल्या एका झोपडींत कसली गर्दी आहे म्हणून बघायला मी गेलों तों हुबेहुब टिळकांसारखा बोलणारा माणूस व्याख्यान देतांना मला दिसला.

तो बोलत होता तो अगदीं सही सही टिळकांप्रमाणें. परंतु ते टिळक नव्हते खास. ते कशाला येतील अशा रात्रीच्या वेळेस आमच्या कॅंपांतल्या एका झोपडींत? मी घोटाळ्यांत पडलों. मग मला समजलं कीं, जी ऐकली ती टिळकांची नक्कल होती आणि ती करणाराचें नांव भोंडे होतें.

## साहेबाला वाटलें, मड्डमच आहे

श्री. भोंडे हे पुण्याच्या मिलिटरी अकौंट्स् खात्यांत नोकरीला होते. त्यांच्या खात्याचे वरिष्ठ एक युरोपियन गृहस्थ होते. हे साहेब दररोज सकाळीं कचेरींत येतांना आपल्या बायकोबरोबर येत. ऑफिसांत आल्यावर तिला थेट आपल्या चेंबरमध्यें नेत. थोड्याच वेळांत ती आपल्या विचित्र किंदऱ्या आवाजांत त्यांचा निरोप घेत असे. निरोप घेतांना ती जें वाक्य उच्चारीत असे, त्याची सही नि सही नक्कल करणें म्हणजे भोंड्यांच्या हातचा मळ

होता. एके दिवशीं दुपारच्या वेळीं काम करतां करतां बेसावधपणें त्यांनीं साहेबांच्या बायकोची इतक्या मोठ्या आवाजांत नक्कल आपल्या सहकाऱ्यांना करून दाखविली कीं, खोलींत बसलेले साहेबमजकूर संभ्रमांत पडले. कारण त्या वेळीं त्यांच्या बायकोची कचेरींत येण्याची अजिबात शक्यता नव्हती. त्यांनीं लगेच पट्टेवाल्याला बोलाविलें व विचारलें, "मेमसाब आया है क्या ?" बिचाऱ्या पट्टेवाल्याची अवस्था अत्यंत अनुकंपनीय झाली. त्याला हंसूं आवरेना. मोठ्या प्रयत्नानें हंसें आवरून त्यानें "नहीं साब" असें उत्तर देऊन बाहेर पळ काढला !

साहेबांना हें सारें विचित्र वाटलें. म्हणून त्यांनीं मुख्य कारकुनांना बोलाविलें. मोठ्या कारकुनांच्या चेहऱ्यावरमुद्धां मिस्किल हास्य दिसतांच त्यांच्या रागाचा पारा वर चढला. साहेबांचा रुद्रावतार पाहून मुख्य कारकून घाबरले व त्यांना सत्य प्रकार सांगावा लागला. साहेबांनीं लगेच भोंड्यांना खोलींत बोलाविलें. पहिल्या प्रथम भोंडेहि घाबरले व नीट उत्तर देईनात; म्हणून साहेबांनीं त्यांना विचारलें, "बोल, तूं माझी नक्कल करशील काय ?" एव्हांपर्यंत भोंडयांची भीड बरीच चेपली होती. त्यांनीं लगेच 'होय' म्हणून साहेबांना उत्तर दिलें. साहेब अत्यंत खिलाडू वृत्तीचा होता. ताबडतोब त्यानें आपली खुर्ची खालीं करून तीवर भोंडयांना बसावयास जागा करून दिली. दुसऱ्याच क्षणीं भोंडयांनीं साहेबांच्या नकलेस प्रारंभ केला. नक्कल पूर्ण झाल्यावर साहेब एवढा खूष झाला कीं, त्यानें दरवर्षी भोंडयांना सार्वजनिक गणपतीच्या कार्यक्रमासाठीं दहा दिवस रजा मंजूर केली. तो म्हणाला, "कमाल आहे बुवा ! तुमच्या हिंदुस्थानांत एवढे हुशार कलावंत आहेत, याची प्रचीति आज मला आली. शाब्बास मि. भोंडे !"

## ज्याचें व्याख्यान त्यानेंच ऐकलें

मुंबईच्या ताराबागेंतल्या गणेशोत्सवांत रात्रीं दे. भ. जमनादास मेथा यांचें व्याख्यान ठरून जाहीर झालें होतें. जमनादासांच्या अस्खलित फरड्या व उपरोधगर्भ विनोदी वक्तृत्वाचा आस्वाद घेण्याकारितां चिकार गर्दी लोटली होती. कर्मधर्मसंयोगानें या श्रोतृसमुदायांत भोंडेहि हजर होते. रात्रीं पुण्याला जाणाऱ्या गाडीला अवकाश असल्यामुळें मधल्या फावल्या वेळांत जमनादासांचें

व्याख्यान पदरांत पाडून घ्यावें अशा हिशोबानें भोंडे तिथें आले होते. व्याख्यानाच्या ठरलेल्या वेळेला जमनादास मेथा उपस्थित झाले व ते आपल्या व्याख्यानाला सुरुवात करण्याचा प्रयत्नहि करूं लागले. परंतु दुर्दैवानें त्यांचा घसा साफ बसला होता. तो इतका कीं, त्यांना एकेक वाक्यच काय पण एकेक शब्दसुद्धां उच्चारण्याची पंचाईत पडूं लागली. तेव्हां त्यांचा नाइलाज झाला व ते कष्टी होऊन खालीं बसले. व्याख्यान रद्द करण्याची पाळी आली ! हजारों उत्सुक श्रोत्यांचा मनोभंग होण्याचा रंग दिसूं लागला. कांहींजण तर निराश होऊन सभास्थान सोडून जाऊंहि लागले. इतक्यांत भोंड्यांना पाहून कोणींतरी कल्पना काढली कीं, आतां भोंडयांनाच व्यासपीठावर चढवा. थोडयाच वेळांत ‘ झटपट रंगारी ’ भोंडयांनीं वेषभूषा बदलून जमनादासांचें सोंग आणलें व त्यांच्यासारखे डुलत-चालतच ते व्यासपीठावर आले. त्याबरोबर टाळ्यांचा कडकडाट झाला. या टाळ्या वाजविणाऱ्यांत खुद्द जमनादासहि होते ! थोड्याच वेळांत बंद पडलेलें जमनादासांचें भाषण पुढें चालू झालें ! हंशा व टाळ्या सारख्या चालू होत्या. जमनादासांची नक्कल तर चांगली वठत होतीच, परंतु हा गमतीचा योग जुळून आल्यामुळें श्रोतृवर्ग अधिक उचंबळला होता. या बहारीच्या प्रसंगीं भोंड्यांच्या कलेचा हरहुन्नरीपणा व हुकमीपणा कसोटीला उतरला. जमनादासांच्यानंतर इतरहि सावरकर प्रभृति पुढाऱ्यांच्या अनेक नकला झाल्या.

हा अकल्पित व अद्‌भुत प्रयोग पाहून हजरजबाबी जमनादासांच्यानें राहवेना. त्यांनीं आपल्या बसलेल्या आवाजांत श्रोत्यांना सांगितलें—

“ आज केवळ माझेंच व्याख्यान तुम्हांला ऐकावयाला सांपडलें असतें. तुमचें भाग्य असें कीं, भोंड्यांसारख्या कलावंताच्या करामतीनें तुम्हांला आज माझ्याप्रमाणें इतरहि पुढाऱ्यांचीं भाषणें ऐकण्याची सुसंधि लाभली.

परंतु खुद्द जमनादासांना तोंड न उघडतां आपलें व्याख्यान आपणच ऐकण्याची संधि या प्रसंगामुळें आली ही त्यांतली खरी मौज होय, असें म्हटलें पाहिजे. वक्ता तोच श्रोता, हा योग कसा जमणार ? पण प्रसंगावधानी भोंड्यांनीं हा योग लीलेनें सहज साधून दिला. ज्याचें व्याख्यान त्यानें ऐकलें !

प्रारंभींच भोंडयांच्या नकलांचे घडलेले कांहीं प्रसंग मुद्दाम दिले आहेत. सबंध ग्रंथ लिहूनहि जी या कलेची मौज व उपयुक्तता सांगतां येणार नाहीं, ती प्रत्यक्ष लहानशा उदाहरणांनीं मनावर सहज बिंबते. वर वर्णन केलेले

प्रसंग निवडक, नैपुण्यदर्शक आणि नमुनेदार आहेत, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. हे मासलेवाईक प्रसंग अत्यंत बहारीचे आणि भोंडयांच्या कलापटुत्वावर झगझगीत प्रकाश टाकणारे आहेत, यांत शंका नाहीं. त्यांत भोंडयांचें व त्यांच्या अनुकरणकलेचें सारें वैशिष्टय व उपयुक्तता प्रतिबिंबित झालेली आहे. उपस्थित नसलेल्या किंवा दिवंगत व्यक्तीचें दुर्लभ असें पुनर्दर्शन व त्यापासून होणारा सात्त्विक आनंद आणि उच्च दर्जाचें मनोरंजन करण्याचें सामर्थ्य हे त्यांच्या कलेचे प्रमुख गुण व फायदे वरील हकीगतींत ठळकपणें दिसून येतात.

## हलत्या-बोलत्या चित्रांचें प्रदर्शन

दोन चित्रकारांची एक गोष्ट आहे. एकानें द्राक्षांचा वेल चितारला होता. दुसऱ्यानें दाराचें चित्र रंगविलें होतें राजा पहायला आला तेव्हां पहिल्या चित्रांतल्या फळांवर चिमण्या चोंचा मारीत होत्या. परंतु दुसऱ्या चित्रांतलें दार खरेंच समजून राजा स्वतःच फसला! सुबुद्ध माणसें फसतात आणि त्यांना प्रत्यक्षवत् भास उत्पन्न होतो, तें चित्र अधिक श्रेष्ठ ठरवून राजानें दुसऱ्या चित्रकारालाच पहिलें बक्षीस दिलें.

भोंडयाच्या कलेला देखील हीच कसोटी लागू पडण्यासारखी आहे. ते सुद्धां व्यक्तीचें चित्र असें उभें करतात कीं, माणसांनींहि फसावें! खरोखर तीच व्यक्ति आपण पहात आहोंत कीं काय अशी भ्रांति कांहीं काळ उत्पन्न करण्याइतकें साद्दश्य व साधर्म्य भोंडे हुकमीपणानें निर्माण करूं शकतात, ही करामत काय लहानसहान आहे? हा प्रकार आपल्याला पहिल्या प्रसंगांत भालाकार भोपटकरांच्या बाबतींत प्रत्ययाला येतो. तीच गोष्ट लोकमान्यांसारख्या थोर विभूतीची. दिवंगतांचें पुनर्दर्शन आपल्याला घडतें तिसरा प्रसंग जमनादास मेथांचा. वस्तुतः लो. टिळक आणि जमनादास मेथा यांच्यामध्यें आकृति, आविर्भाव व आवाजाचें काडीइतकें देखील साम्य नाहीं. पण भोंडयांची टिळकांची नक्कल जितकी तंतोतंत, तितकीच त्यांची जमनादासांची नक्कल हुबेहूब! महाराष्ट्रांतील प्रसिद्ध राजकीय पुढाऱ्यांपैकीं पंधरावीस जणांची नक्कल भोंडे करतात. वास्तविक हे सर्व पुढारी भिन्न मतांचे, भिन्न पंथांचे. त्यांची विचारसरणी, मनोरचना, शैली वेगवेगळी. स्वभावभेद व मतभेद तर

अतिशय तीव्र. त्यांतले कांहीं तर एकमेकांचीं तोंडें पहात नसतील. तथापि हे सर्व पुढारी भोंडयांच्या ठिकाणीं व त्यांच्या नकलेच्या कार्यक्रमांत मात्र एकत्र येतात, हें पाहून मौज व चमत्कार वाटल्याखेरीज रहात नाहीं! एखादी नक्कल एखाद्याला साधेल. नाहीं असें नाहीं. परंतु सर्वांची नक्कल सारख्याच सफाईनें एकच इसम करूं लागतो, त्या ठिकाणीं चमत्कृति उत्पन्न होते असा चमत्कार दाखविण्याचें अद्भुत कसब भोंडयांच्या ठिकाणीं आहे, म्हणूनच त्यांना नकलाकारांमध्यें अग्रेसरत्व प्राप्त झालें आहे. भोंडयांचा कार्यक्रम म्हणजे जिवंत हलत्याबोलत्या व्यक्तिचित्रांचें प्रदर्शनच म्हटलें तरी चालेल. आतां या प्रदर्शनांतील कांहीं गमतीदार देखावे पाहूं त्यांतलें भोंडयांच्या कलेचें चातुर्य व चमत्कृतिजनकत्व बघून कौतुक व आनंद वाटल्याखेरीज रहात नाहीं. नकलांचे आणखी कांहीं मनोरंजक प्रसंग खालीं देण्यांत येत आहेत.

## प्रत्यक्ष वडील फसले!

गोपाळरावांच्या वडील बंधूंचे साठी उलटलेले आजेसासरे शाळिग्राम भिक्षुक होते व ते दोन फूट व्यासाचें चक्री पागोटें वापरीत होते. त्या वृद्ध गृहस्थांची नक्कल भोंडे हुबेहुब करीत असत. त्या वळीं त्यांचें वय १० वर्षांचें असेल-नसेल तरी सदर वृद्ध गृहस्थाचा म्हातारपणचा घोगरा आवाज भोंडे हुबेहुब काढीत असत. त्यांच्या वडिलांना ही गोष्ट माहीत नव्हती एके दिवशीं वडील बाहेर गेले असतांना भोंडे हे घरांतील इतर मंडळीसमोर सदर वृद्ध गृहस्थांची नक्कल दारें लावून करीत बसले होते. दाराबाहेरून वडील आले. ते वृद्ध गृहस्थ घरांत आले आहेत असें त्यांना वाटलें व दार उघडण्यास सांगितलें. दार उघडून पहातात तों त्यांना ते वृद्ध गृहस्थ दिसेनात. "कोठें गेले इतक्यांत?" असें वडिलांनीं विचारतांच सर्व मंडळी हंसूं लागली व ते गृहस्थ आले नसून त्यांची नक्कल गोपाळ (म्हणजे नकलाकार भोंडे) यानें केली, असें वडिलांस सांगितलें तेव्हां त्यांनाहि आश्चर्य वाटलें.

## न हंसलेल्याला हंसविलें

एकदां डेक्कन कॉलेजमध्यें नकला झाल्या त्या वेळीं श्री. नूलकर हे हजर होते. नकला संपल्यानंतर श्री. नूलकर हे उठून म्हणाले कीं, "ही एक अद्वितीय

करमणूक आहे व माणूस देहभान विसरून जातों.'' पुढे ते म्हणाले, '' माझी पत्नी निवर्तल्यामुळें माझें मन फार अस्थिर झालें होतें. मीं पत्नीचा विसर पाडण्यासाठीं नाटकें पाहिलीं, तमाशे पाहिले, कथा-पुराणें ऐकलीं पण पत्नीची आठवण नाहींशी होईना. परंतु आज भोंडे ह्यांच्या नकला पाहून मला फार आनंद झाला. मी कित्येक दिवसांत हंसलों नव्हतों, तो आज भरपूर हंसलों व मला पत्नीबद्दल विस्मरण झालें.'' आणि ह्या समाधाना-प्रीत्यर्थ नूलकर यांनीं आपल्या हातांतील रिस्टवॉच भोंडे यांना बक्षीस दिलें.

उदास मनाला उल्हास देणाऱ्या कलेचें मोल कोण करील ?

## मातोश्रींना जीवदान

भोंडे यांच्या मातोश्री १९०६ सालीं आजारी पडून मृत्युशय्येवर होत्या. त्यांना न्यू इं. स्कूलचे शिक्षक व होमिओपॅथीचे डॉक्टर वझे यांचें औषध चालू होतें ते रात्रीं ९ च्या सुमारास रुग्णास तपासण्यास घरीं आले व गंभीर अवस्था असल्याचें मत त्यांनीं दिलें. पण मनानें धीर धरला तर रोग्याचा काळ लांबेल असें सांगितलें. मातोश्री अत्यवस्थ पण शुद्धींत होत्या. त्या वेळीं तिचें मनोरंजन व्हावें म्हणून भोंडे यांनीं त्यांचे मामा अनंतराव रेडे यांची, आणखी कांहीं नातेवाइकांची व वाड्यांतील सोनाराची अशा नकला केल्या त्या ऐकून त्यांच्या आईला इतका आनंद झाला व त्यांना प्रसन्नता आली कीं, काळाची वेळ जाऊन त्या संकटांतून निभावल्या व पुढें दोन वर्षपर्यंत हयात होत्या.

## नकलेनें नोकरी टिकविली

१९०७ सालीं त्यांची बदली मिलिटरी खात्यांत कायम नोकरीवर म्हणून झाली. त्या मिलिटरी खात्यांतील बहुतेक लोक त्यांचा हेवा करीत. त्यांच्या-वर खोटेनाटे आरोप उपस्थित करून त्यांना काढून टाकण्याचाहि जोराचा प्रयत्न झाला परंतु १९०८ मध्यें मिलिटरी अकौंट्स् डिपार्टमेंटचें संमेलन झालें त्या वेळीं भोंडे यांच्या अनुकरणप्रयोगाचा मोठा योग कांहीं प्रेमी मित्रांनीं जुळवून आणला. त्या वेळीं मि. फेरहर्स्ट नांवाच्या युरोपियन साहेबाची नक्कल हुबेहुब केल्यामुळें सर्व युरोपियन अधिकारी वर्ग आश्चर्यचकित व खूष झाला आणि खुद्द कंट्रोलर असें म्हणाला कीं, '' इतका गुणी मनुष्य आपण

कां गमवावा? हा आपल्याच खात्यांत राहिला पाहिजे." त्यानंतर भोंडे यांस खात्यांतून कमी करण्याचें प्रकरण फाडून टाकण्यांत आलें.

## प्रि. राजवाड्यांचें गांभीर्य ढळलें

भोंडे यांच्या नकला पाहून व ऐकून ज्याला आनंद झाला नाहीं असा मनुष्य विरळा. 'स वै मुक्तोऽथवा पशुः' अशा कोटींतच त्याची गणना करावी लागेल. इंग्लंडचा राजा वुइल्यम याचा मुलगा मृत्यु पावला तेव्हां-पासून तो जन्मभर हंसला नाहीं, असें सांगतात. फर्ग्युसन कॉलेजचे माजी विद्वान् प्रिन्सिपॉल वै. का. राजवाडे हे असेच अतिशय गंभीर वृत्तीचे होते. ते कधीं हंसतांना म्हणून दिसावयाचे नाहींत. कॉलेजांत शिकवितांना लेखकाचा एखादा विनोदी उतारा आला कीं, प्रो. वामनराव पटवर्धन हे मनापासून हंसत. परंतु अशा वेळीं राजवाडे विद्यार्थ्यांना 'ह्या ठिकाणीं तुम्हीं हंसलें पाहिजे!' असे कांहींसे रुक्ष उद्‌गार काढीत आणि स्वतः साधें स्मितहि करीत नसत. 'राजवाडे हंसले तर आपण पाच रुपयांचे पेढे वांटूं' अशी एका विद्यार्थ्यानें पैज मारली अखेर एकदां फर्ग्युसन कॉलेजच्या अध्यापकांच्या मेळाव्यांत भोंडे यांना नकला करण्याचा योग आला, त्या वेळीं त्यांनीं प्रोफेसर गोविंद चिमणाजी भाटे यांची नक्कल केली. सदर प्रसंगीं डोक्यास रुमाल बांधण्याची तऱ्हा, कपाळाला आठ्या, आरशीची ठेवण व पहाण्याची लकब, आवाजाचा चढउतार आणि as it were हा अनावश्यकपणें वारंवार उच्चा-रला जाणारा त्यांचा शब्दप्रयोग इत्यादि भाट्यांच्या वैशिष्ट्यांचें अनुकरण इतकें बेमालूम व त्यामुळें गमतीदार वठलें कीं, राजवाड्यांना हंसूं आवरेना. त्यांचें गांभीर्य पार ढळलें. खुद्द भाटे या प्रसंगीं हजर होते, त्यामुळें अधिकच मौज उत्पन्न झाली होती.

## ख्रिश्चन लोक खूष झाले

भोंडे हे नसराबाद येथें १९२२ सालीं नोकरीवर असतांना नसराबाद येथील युरोपियन लोकांचें संमेलन होतें त्या वेळीं मिलिटरी खात्यांतील भोंडे यांच्या स्नेह्यांनीं भोंडे यांचा नकलांचा कार्यक्रम ठरविला. तो कार्यक्रम केवळ करमणुकीच्या दृष्टीनें सर्वांस आवडला. कार्यक्रमाच्या शेवटीं भोंडे यांनीं ख्रिश्चन मिशनरी रेव्हरंड मॅक्निकॉल याची नक्कल गमतीनें सहजगत्या केली. ती नक्कल

चालू असतांना त्या सर्व ख्रिश्चन लोकांस जो आनंद झाला, त्याचें वर्णन करतां येत नाहीं ते लोक भोंडे यांस मिठी मारून असें म्हणाले कीं, “ नक्कल ही काय चीज आहे हें आम्हांस आतां कळलें ! ”

### अनुकरण म्हणजे नैसर्गिक भिन्नत्वावर मात

मानवजात असंख्य आहे. पण एकासारखीं एक अशीं दोन माणसें क्वचितच भेटतात प्रत्येक माणसांत कांहींतरी वेगळेपणा, वैशिष्ट्य निसर्गानें पेरून ठेवलेलें असतें. एका व्यक्तीसारखी हुबहूब दुसरी व्यक्ति असत नाहीं, दिसत नाहीं. माणसांच्या बहिरंगांत व अंतरंगांत इतकी विविधता आणि वैचित्र्य भरलेलें आहे. निसर्गाच्या या विविधतेवर व भिन्नत्वावर मात करण्याचा मानवी प्रयत्न म्हणजेच अनुकरणकला होय. विसदृश असलेल्या व्यक्तीनें सादृश्य दाखविणें म्हणजेच नक्कल आणि म्हणूनच ती अवघड. हा प्रयत्न ज्या मानानें साध्य होईल, त्यावर या कलेचें यशापयश अवलंबून असतें. सुप्रसिद्ध नकलाकार श्री. गोपाळराव भोंडे हें या अनुकरणकलेचें वसतिस्थान होय. भोंडयांच्या कलेची करामत पाहिली म्हणजे माणसामध्यें किती सुप्त शक्ति व गुण दडलेले असूं शकतात, त्याची प्रचीति येते. एक इंग्रज लेखक लिहितो—‘ The human frame is replete with wonders. ’ खरो-खरच मानव हा एक अजबखाना आहे !

### नक्कल हा प्रकार भोंड्यांनीं सुरू केला

भोंडे हे महाराष्ट्राचे नांवाजलेले नकलाकार व कलाकार आहेत अभिनव अशा या अनुकरणकलेच्या प्रांतांतील त्यांचा विक्रम पाहिला तर त्यांना ‘ आद्य व श्रेष्ठ नकलाकार ’ असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. भोंडयांची कला, तिचें स्वरूप व तंत्र केवळ अपूर्वच नव्हे तर अद्वितीय असें आहे. भोंडयांच्या पूर्वीच्या काळांत ‘ नकला ’ ही वस्तु बाल्यावस्थेंतच नव्हे, तर अस्तित्वांतहि नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. पूर्वी फार तर बहुरूपी लोक किंवा हरदास-पुराणिक आपल्या कथा-पुराणां-तून कांहीं चुटपुटत्या नकला करीत असतील तेवढ्याच. यालाच आपल्याकडे ‘ हरदासी नकला ’ असें नांव पडलें आहे. त्यांतहि थोडी मौज व तथ्य असलें तरी तें अगदींच तोकडें व तात्पुरतें. त्यांत भरदारपणा, हुबेहुबपणा, कला-

कुसर, बारकावा किंवा शास्त्रशुद्धता नव्हती. किंबहुना एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या हुबेहुब अनुकरणाचा तो प्रयत्न नव्हताच मुळीं. थोडासा हंशा पिकविल्यानंतर नकलीपणाचें आडवळण सोडून पुन्हा हरदासाची कथा मूळपदावर यावयाची, अशांतला तो प्रकार होता

## भोंड्याचें नवीन तंत्र

भोंडयांच्या नकला अशा गांवढळ किंवा ओबडधोबड स्वरूपाच्या नाहींत. त्यांची कला कोरीव-कांतीव, विकसित. परिपुष्ट व परिणत स्वरूपाची आहे. त्यांत शास्त्रशुद्धता आहे. भोंडयांनीं आपल्या दैवी देणगीला सतत अभ्यासाची जोड देऊन आपल्या कलेचें एक स्वतंत्र तंत्र निर्माण केलें आहे आणि त्यांत जिवंतपणा व प्रत्यक्षाचा भास उत्पन्न करणारा मंत्रहि त्यांचा स्वतःचा आहे. त्यांनीं मनोरंजनाचें एक नवीन दालन उघडलें आहे. भोंडयांच्या उदयानंतर लोकाना नकलाची चटक लागल्यामुळें समाजात नकलाची व नकला करणाऱ्याची गरज भासूं लागली व 'मागणी तसा पुरवठा' या न्यायानें अलीकडे नकलाकाराचा एक वर्गच अस्तित्वात आला आहे. परंतु इतर नकलाकार भोंड्याच्या सफाईदार कलेपुढें फारच फिके वाटतात. भाडयांनीं या कलेचा आदर्श उभा केला आहे. या त्याच्या आदर्शात (आरशात) खऱ्याखुऱ्या व्यक्तींचीं प्रतिबिंबें ते आपल्याला दाखवितात. सत्यसृष्टीला प्रतिसृष्टि उभारण्याची करामत त्याच्याजवळ आहे. नकलेच्या क्षुद्र व कांहींशा हास्यास्पद वाटणाऱ्या प्रकाराला कलेचा दर्जा प्राप्त करून देण्याचें श्रेय केवळ भोंडयाचें आहे यात शंका नाहीं. स्थलकालाच्या बंधनांना झुगारून भोंडे कलासिद्धीच्या जोरावर आपल्याला दोन-तीन तासपर्यंत हव्या त्या काळात व हव्या त्या स्थळीं नेतात आणि इष्ट व्यक्तीचें दर्शन व भेट करवून देतात. भोंडे हे फसवेगिरी करणारे अजब जादूगार नाहींत काय?

## नवव्या वर्षापासून नकलांचा नाद

लहानपणापासून नकला करण्याचा मला नाद होता, असें भोंडे सांगतात. पण ही कला साध्य कशी झाली, हें त्याचें त्यान च सांगतां येत नाहीं. किंबहुना त्याचा प्रारंभ कसा झाला, हेंहि त्याना उमगत नाहीं. नाहीं म्हणायला त्यांच्या

मातोश्रींना थोडयाशा प्रमाणांत अनुकरण करण्याची लकब होती. अर्थात् ती अगदीच चुटपुटती होती. कदाचित् आईच्या सहवासांत हा छंद गोपाळच्या नकळत अंगवळणीं पडला असेल, असा तर्क संभवतो. या सूक्ष्म बीजाचा पुढें वृक्ष कसा बनला, हेंहि भोंड्यांना स्वतःला सांगतां येत नाहीं. "अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी। धरितांहि परी आवरेना ॥" असेंच त्यांच्या बाबतींत म्हणावें लागतें. कारण त्यासाठीं अभ्यास तर नाहींच, परंतु आरसा पुढें ठेवून त्यांनीं कधीं तालीमहि केलेली नाहीं 'तुमचा आवाज व चेहरे कसे बदलतात' असें विचारलें तर या प्रश्नाचें उत्तर त्यांना देतां येत नाहीं. तें आपोआप होतें, असें ते सांगतात. या बाबतींत श्रम किंवा खटपट कांहींच करावी लागत नाहीं फक्त नकलांच्या भाषणांतील मजकूर सुव्यवस्थित असला कीं भागलें त्यांचें काम.

प्रथम प्रथम गोपाळराव घरीं आल्यागेल्या नातलग मंडळींच्या नकला करूं लागले. त्याबद्दल त्यांना आईवडिलांचीं बोलणीं खावीं लागत. प्रसादहि मिळत असे. 'ही वाईट खोड आहे', 'अशी कुचेष्टा करणें चांगलें नाहीं.' असे उपदेशाचे डोस त्यांना मिळत परंतु अशी 'कुचेष्टा' करूनच त्यांची प्रतिष्ठा पुढें वाढावयाची होती म्हणूनच कीं काय गोपाळरावांनीं या दटावणीस फारशी दाद दिली नाहीं. बाल्यावस्थेंतले त्याचे हे नकलांचे प्रयोग चालूच राहिले पुढें त्यांना शाळकरी दोस्तांतून चाहती मंडळी भेटूं लागली. त्यांत हल्लींचे सुप्रसिद्ध नटवर्य गणपतराव बोडस हे होते. मित्रांच्या सकौतुक प्रोत्साहनानें भोंडयांची कला वाढीस लागली पुढें शाळेंतले मास्तर हें त्यांच्या कलेचें भक्ष्य बनलें. त्यानंतर हळूहळू त्यांच्या कलेचा प्रपंच वाढत जाऊन सर्वव्यापक बनला आहे. मित्रांनीं फुंकर घातलेला आणि स्वतः भोंडयांनीं चालवीत ठेवलेला कलेचा अग्नि आतां किती प्रज्वलित आणि तेजस्वी झाला आहे, हें आपल्याला प्रत्यक्षच दिसत आहे.

### खटपटींवांचून कला साधली

सहज स्फुरणावर भोंडयांच्या कलेची प्रक्रिया अवलंबून आहे. ते कांहीं कोणाकडे शिकायला गेले नाहींत. त्यांच्या अंगीं ती एक प्रकारची प्रतिभाच आहे, असें म्हटलें पाहिजे.

करितों कवित्व म्हणाल हे कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥
माझीया युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवीतो ॥

हे तुकारामाचे उद्गार भोंड्यांना तंतोतंत लागू पडतात. ना. सी. फडक्यांनीं जें त्यांचें वर्णन केलें आहे, तें वस्तुस्थितीला अगदीं धरून आहे.

केवळ मनोमय तादात्म्याच्या बळावर भोंड्यांच्या नकलांची उभारणी होत असल्यामुळें एरवीं जिचें फार आश्चर्य वाटलें असतें अशी एक चमत्कारिक गोष्ट आढळून येते. ती अशी कीं, कोणाचा जर असा समज असेल कीं, नक्कल बसवितांना भोंडे स्वतःला एखाद्या खोलींत कोंडून घेत असतील, आरशापुढें उभे रहात असतील, त्यांत बघून अंगविक्षेप, मुद्राभिनय इत्यादींची मेहनत करीत असतील, तर तो समज निखालस खोटा ठरेल. कारण खरी गोष्ट अशी आहे कीं, अशा प्रकारच्या कोणत्याहि खटाटोपाची गरज भोंड्यांना वाटत नाहीं. ते फक्त मनानें ठरवितात कीं, अमक्या व्यक्तीची नक्कल करायची! बस्! एवढीच त्यांची तयारी! ही मनाची तयारी झाली कीं ते त्या व्यक्तीसारखें हुबेहूब बोलूं लागतात, अंगविक्षेप करूं लागतात, आणि दिसूं देखील लागतात! टिळकांचें, सावरकरांचें किंवा रँग्लर परांजप्यांचें सोंग सजवितांना ते एक छोटासा आरसा वापरतात, परंतु त्यांत ते धड बघत देखील नाहींत. केवळ स्फूर्तीनें ते टिळकांसारखी पगडी घालतात, पांगारकरांसारखा रुमाल डोक्याला गुंडाळतात, सावरकरांसारखी टोपी घालतात, भोपटकरांसारखें उपरणें खांद्यावर टाकतात! केवळ स्फूर्तीनें आणि मनाच्या तन्मयतेनें ते चालूं लागतात. हातवारे करूं लागतात, बोलूं लागतात!

कुणाची कल्पना असेल कीं, टिळकांचीं खूप व्याख्यानें भोंड्यांनीं ऐकलीं असतील व त्यांच्या उच्चारांचा व लकबीचा भोंड्यांनीं प्रदीर्घ अभ्यास केला असेल, तर ती देतील खरी म्हणतां येणार नाहीं. १९०० सालीं–म्हणजे भोंडे अवघे अठरा वर्षांचे होते तेव्हा त्यांनीं गणपति-उत्सवांतलीं टिळकांचीं कांहीं व्याख्यानें ऐकलीं. त्यांतलें ‘सैतानाचें साम्राज्य’ या विषयावरचें टिळकांचें जें व्याख्यान झालें तेंच भोंडे आपल्या नकलेंत देऊं लागले. नंतरच्या काळांत टिळकांचीं पुण्यांत शेंकडों व्याख्यानें झालीं असतील. परंतु तीं भोंड्यांनीं ऐकलीं नाहींत. १९१८ सालीं टिळक मंडालेच्या तुरुंगांतून परत आले व

आतां ज्याला 'फुले मार्केट' म्हणतात त्या वेळच्या मोकळ्या पटांगणांत टिळकांच्या सत्काराची मोठी जाहीर सभा झाली, त्या वेळचें टिळकांचें व्याख्यान भोंडयांनीं ऐकलें. म्हणजे टिळकांचीं पुरतीं पांचदेखील व्याख्यानें भोंडयांनीं ऐकलीं नाहींत! ज्या इतर व्यक्तींच्या नकला भोंडे करतात त्यांच्या बाबतींतहि भोंडयांचा अभ्यासाचा प्रयत्न याच मासल्याचा!

## भोंड्यांना गुरु नाहीं व शिष्यहि नाहीं

या कलेच्या बाबतींत त्यांनीं जाणतेपणानें अमुक खटपट केली असें सांगतां येणार नाहीं. तुम्ही जर त्यांना विचाराल, "आवाज कसा कमाविलात, मुद्रेचा अभिनय कसा बसविलात, हातवारे कसे पक्के केलेत तें सांगा" तर ते म्हणतील, "काय सांगूं कपाळ? त्यापैकीं कांहीं देखील मीं केलें नाहीं! अमक्याची नक्कल करायची ठरविली आणि ती मी करूं लागलों इतकेंच!"

त्यांच्या कलेंत प्रयत्नाचा भाग फार थोडा आहे. सारा विलास आहे तो निसर्गदत्त देणगीचा. तिला तुम्ही प्रतिभा म्हणा, काय वाटेल तें म्हणा, परंतु ती सर्वांशीं स्वयंप्रकाशी आहे खचित. यामुळेंच कोणत्याहि गुरूची गरज भोंडयांना लागली नाहीं! आणि यामुळेंच कोणाचा गुरु भोंडे होतील अशीहि शक्यता नाहीं. आपण काय करतों, कसें करतों, हें भोंडयांना स्वतःलाच कळलेलें नाहीं तर ते दुसऱ्याला काय सांगणार? 'आम्हांला नकलांची कला शिकवा' म्हणणारे लोक भोंडयांकडे पुष्कळ आले. पण "आज अमावास्या आहे, आज नको", "आठ दिवसांनीं मुहूर्त चांगला आहे तेव्हां बघूं" अशा थापा मारून भोंडयांनीं शिष्य होऊं पहाणाऱ्या साऱ्या लोकांना परत धाडलें आहे आतां त्यांच्या नादीं कुणी लागत नाहीं. 'दुसरा भोंडे' तयार होण्याची शक्यता अगदीं देखील नाहीं. गोपाळ विनायक भोंडे हे एकच 'भोंडे' महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांत नमूद केले जातील.

भोंडयांना ती एक दैवी देणगी किंवा नैसर्गिक प्रेरणा आहे हेंच खरें. कोकिळ सुस्वर कसा गातो किंवा मोर सुंदर कसा नाचतो, याचें उत्तर कोण देणार? तीच गत भोंडयांची आहे.

जैसा वाजविणार फुंकितो वारें।
तैसीं वाजंत्रें वाजतीं॥

हेंच महीपतीचें उत्तर भोंडे देणार. झरा लागल्यावर माणूस विहीर बांधून उपसा करील. पण मूळचें पाणी कुठून कसें आलें, हें कोण सांगणार ?

## कलेचा बेहोश आनंद

भोंड्यांचें त्यांच्या कलेवर एकनिष्ठ प्रेम आहे. म्हणूनच इतकें वय झालें तरी त्याचा त्यांना शीण वाटत नाहीं. ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे : शीण वाटला तर आवड कसली आणि लाज वाटली तर व्यसन कसलें ? गोपाळरावांची तब्बेत बरी नसली तरी ते आमंत्रण नाकारीत नाहींत. ते म्हणतात, मला यानेंच बरें वाटतें. कांहीं होत असलें तर तें यानें बरें होतें. गोपाळरावजी म्हातारे झाले आहेत, पण त्यांची हौस म्हातारी झालेली नाहीं. कार्यक्रमाच्या वेळीं उलट त्यांना उत्साहाचें भरतें येतें इंजेक्शन दिल्याप्रमाणें नवचैतन्य संचारतें. त्यांतली मौज अशी कीं, एरवीं गोपाळरावांना अलीकडे पाय अधू झाल्यामुळें दोन मिनिटें सुद्धा उभें रहाण्याला मुश्कील पडतें. काठीचा आधार घ्यावा लागतो; तरीहि गुढघ्याचीं हाडें कडाकडा वाजूं लागतात. शरीर कुरकुर करूं लागतें. पण ते नकला करायला स्टेजवर उभे राहिले म्हणजे मात्र बिनधोक, कांहीं त्रास न होतां अर्धा अर्धा तास ते सहज उभे राहूं शकतात. मनाच्या उभारीपुढें शरीर नमतें हेंच खरें ! नकला ऐकून ऐकून कंटाळा आला असेल अशी भीति भोंड्यांना वाटते; पण नकला करण्याचा कंटाळा त्यांना स्वतःला कधींच वाटत नाहीं. आस्वाद घेणारे भेटले कीं त्यांची कळी खुललीच म्हणून खुशाल समजावें. रसिकांच्या टाळ्या हा कलावंताचा खुराक होय, यांत शंका नाहीं.

यामुळेंच नकला करण्याच्या प्रसंगीं भोंडे बेहोशपणांत किंवा धुंदींत असतात. ती एक प्रकारची सात्त्विक नशा आहे—कलेचा कैफ आहे. त्या वेळीं जो संचार किंवा स्फुरण चढतें, जो आवेश किंवा अवसान येतें, त्यांतली भरारीची धडक आणि बेछूट आनंद कलावंतालाच कळूं शकेल कलानंदाला ब्रह्मास्वादसहोदर म्हटलें आहे तें उगीच नव्हे. कलावंताचा नवनिर्मितीचा आनंद ( creative delight ) हा कांहीं औरच असतो या कलेंतल्या तादात्म्याची व आनंदाची मीमांसा भोंड्यांना कळत नसेल.

पण या समाधितुल्य बेहोश आनंदाचा अनुभव ते प्रत्यहीं घेत असतात, हें निःसंशय.

या कलेचा उद्गम व विकास भोंड्यांच्या ठिकाणीं कसा झाला, ही मनोरंजक व बोधप्रद हकीगत मागील पानांतून दिली आहे. आतां भोंड्यांच्या कलेंतली मौज, माधुर्य व मार्मिकता यांची मीमांसा करावयाची आहे. त्याकरितां प्रारंभीं कला व कलेचा उद्देश यासंबंधींची थोडीशी तात्त्विक चर्चा करणें आवश्यक आहे. पुष्टीकरणार्थ मधून मधून भोंड्यांच्या नकलांचे नमुने उदाहरणादाखल पुढें मांडले पाहिजेत. म्हणून आतां त्याच मार्गाला लागूं या.

**कलेचा महिमा व मोहिनी**

कलेचा हेतु नीतिबोध कीं मनोविनोदन, या प्रश्नावर रणें माजलीं आहेत. हे दोन्ही पक्ष आपापल्या परीनें बरोबर आहेत खरे; पण ते अर्धसत्यात्मक आहेत या दोन्ही पक्षांतला सत्यांश एकत्र केला तरच पूर्ण सत्य हातीं लागेल. नीतिशास्त्राचा जो अंतिम उद्देश तोच कलेनेंहि आपल्या निशाणावर लिहिला पाहिजे. पण दोघांची चाल निराळी; स्वभाव भिन्न. दोघांनाहि जावयाचें आहे एकाच मुक्कामावर. पण ते हातांत हात घालून जाणार नाहींत त्यांचे रस्ते निरनिराळे; पिंडच वेगवेगळा. शास्त्राचा अथवा नीतिशास्त्राचा चेहरा रुक्ष, गंभीर, किंचित् त्रस्त आणि चिंताग्रस्तहि त्याची प्रकृति तर्ककर्कश आणि ज्ञानजड. कलेचें हंसतमुख गोंडस, बाळसेदार, मोहक. तिची चाल नखरेल, ऐटबाज आणि स्वभाव आनंदी व खेळकर सहज एखादा कटाक्ष टाकील तर मन जिंकून घेईल. शास्त्राच्या सभामंडपांत दहापांच वृद्ध जमतील तेवढेच. कलेच्या प्रांगणांत हजारोंची गर्दी उसळेल. शास्त्राचें म्हणणें ऐकून घ्यायला फक्त मूठभर पंडितच तयार होतात. कला सर्वांना भेटून आपला संदेश कळवितें आणि सौंदर्य प्रकट करते. कलेच्या कक्षेंत व मोहिनींत सर्वजण सांपडतात. कलेच्या सौंदर्यानें मोहित न होणारा आणि कलेच्या प्रभावानें परिणाम न होणारा विरळा. एक सुभाषितकार म्हणतो—

सुवाङ्मयेन गीतेन युवतीनां च लीलया।
यस्य न द्रवते चित्तं स वै मुक्तोऽथवा पशुः॥

यांतील रहस्य तेंच आहे. म्हणून प्रचाराच्या बाबतींत कलेचा मान व महिमा मोठा आहे.

## कलेचें साफल्य समाजसेवेंत

कला ही समाजाची सावली आहे तशीच माउली पण आहे. 'समाज तशी कला' याप्रमाणेंच 'कला तसा समाज' असेंहि समीकरण मांडतां येईल. दोघेहि एकमेकांवर छाप पाडीत असतात. पोटांत शिरून लीलेनें मन वळविण्याची हातोटी आणि हिम्मत कलेच्या अंगीं आहे. चतुर कांतेप्रमाणें कलासुंदरी हंसत-खेळत, कळत-नकळत मांडीवर बसून, गळ्यांत हात टाकून रसिकवृंदाचें मन काबीज करते, त्याला वश करून घेते. असें विलक्षण सामर्थ्य कलेच्या ठिकाणीं असल्यामुळें कलेचा उपयोग जाणतेपणानें आणि जबाबदारीनें केला पाहिजे. कारण कलेचें हत्यार दुधारी आहे. त्याचा वापर स्वैरतेनें वा ध्येयशून्यतेनें केल्यास समाजाच्या भात्यांतला एक चांगला बाण निष्फळ ठरेल. केवळ रंजन करणाऱ्या कलेपेक्षां बोधगर्भ कला ही दुधांत साखर होय. कलेच्या सुईत नीतिबोधाचा दोरा ओवलेला असला पाहिजे. रंजन करतां करतां तत्त्वांचा व सद्विचारांचा ठसा चित्तावर उमटविणें हें कलेचें कर्तव्य असलें पाहिजे. समाजहिताच्या दृष्टीनें यांतच कलेचें साफल्य आहे. जेथें नीतिशास्त्रानें हात टेकले, तेथें कलेनें पुढें सरसावलें पाहिजे. नीतिशास्त्राच्या हातांतून गळलेली तलवार कलेनें उचलली पाहिजे. कला म्हणजे मनोरंजन आणि मनोबोध यांचें मधुर मिश्रण. हा मिलाफ जितका बेमालूम आणि एकजीव होईल, त्या मानानें ती कला अधिक सतेज, सुंदर, सफल ठरते. भोंडयांचें वैशिष्ट्य हें कीं, त्यांची अनुकरण-कला या मिश्रणावर आधारलेली आहे. ती दोन्ही पायांवर चालते. लोकरंजन हें त्यांच्या कलेचें शरीर आहे, तर लोकशिक्षण हा तिचा आत्मा आहे.

## हंसत खेळत व्यवहारज्ञान

वरवर पाहणारा उथळ प्रेक्षक भोंडयांच्या नकला पाहून पोट धरधरून हंसतो. खूष होतो आणि कार्यक्रम संपल्यावर निघून जातो. त्याच्या पदरांत पडलेल्या भरपूर करमणुकीवरच तो शंभर टक्के संतुष्ट असतो. परंतु ज्या लोकांना भोंडयांच्या कार्यक्रमांत करमणुकीखेरीज दुसरें कांहींच दिसत नाहीं,

त्यांना भोंडयांच्या नकलांचा अर्धा भाग समजलेलाच नाहीं, असें म्हणावें लागेल. ज्या व्यक्तीची भोंडे नक्कल करतात तो एक मनुष्यस्वभावाचा नमुना आहे, तो समाजदर्शनाचा एक भाग आहे, हें मनाला प्रतीत झाल्या-शिवाय भोंडयाच्या नकलांचें रसग्रहण पूर्णपणें झालें असें म्हणतां येणार नाहीं. किंबहुना तीच तर त्यांतली खरी मौज आहे. भोंडयांची भूमिका पुष्कळशी पूर्वींच्या संस्कृत नाटकांतल्या विदूषकासारखी आहे. वरून दिसण्याला विदूषक भोळाभाबडा बुद्धिमंद दिसतो. तो हंसवितो, किंबहुना हंसविण्याकरितांच त्याचा अवतार आहे. पण लवकरच प्रेक्षकांच्या लक्षांत येतें कीं, हा दिसतो तसा नाहीं. विदूषक बुद्धिमंद नसून बुद्धिमान् असतो. भोळा नसून धूर्त, चाणाक्ष असतो. त्याचे चतुर मार्मिक बोल थक्क करून सोडतात. तो मुद्दाम वेड पांघरून पेडगांवला जाणारा असतो. पण त्या वेडाच्या आंत मोठें शहाणपण लपलेलें असतें आणि बाहेरच्या विनोदी सोंगाच्या आंत मोठा गंभीर अर्थ भरलेला असतो. भोंडयांची व त्यांच्या नकलांची स्थिति अशीच आहे. त्यांच्या विनोदी नकला हास्यकारक खऱ्या, पण त्यांत व्यवहारज्ञान आणि स्वभावदर्शन ठेचून भरलेलें असतें. याची मार्मिक रसज्ञ श्रोत्यांना प्रतीति आल्यामुळें त्यांना भोंडयांची कला अधिक आस्वादनीय होते. नाट्यकलेंतहि हेंच तत्त्व आहे 'मृच्छकटिकां' तला राजशालक शकार, 'मानापमानां' तला लक्ष्मीधर किंवा 'एकच प्याल्यां' तला तळीराम हीं पात्रें काय केवळ विनोद-निर्मितीसाठींच निर्माण केलीं असतील काय? 'एकच प्याल्यां' तल्या तळीरामानें व आर्यमदिरामंडळांतील सभासदांनीं प्रेक्षकांना हंसविलें म्हणजे त्यांचें काम झालें काय? या पात्रांच्या द्वारा समाजांतल्या विविध स्वभावांचे मासले आपल्यापुढें मांडलेले आहेत, हें मर्म लक्षांत आणलें पाहिजे. करमणुकीच्या ताकांतला हा तात्त्विक लोण्याचा गोळा आपल्या हातांतून निसटतां कामा नये. पुष्कळ वेळां हंसविणारी कला शिकविणारीहि असते. कलेचें हें द्विविध कार्य व भूमिका उमगल्याशिवाय कलेच्या आनंदाचें व सार्थकतेचें पुरें माप आस्वादकाच्या पदरांत पडण्याचा संभव कमी. कलेच्या साफल्याच्या व रसग्रहणाच्या दृष्टीनें कलेचे प्रधान व दुय्यम, तात्कालिक व चिरकालिक, स्थूल व सूक्ष्म, आणि सहज वर दिसणारे व पोटांत दडलेले हेतु स्पष्टपणें समजणें आवश्यक आहे. भोंडयांच्या अनुकरणकलेलाहि हेंच

तत्त्व लागू पडतें. भोंड्यांच्या नकलांतील वाच्यार्थ व व्यंग्यार्थ नीट समजला पाहिजे. तेव्हांच त्यांच्या कलेंतील औचित्य आणि आनंद आस्वादकाला प्रतीत होईल.

### नकलांच्या आरशांत समाजाचें प्रतिबिंब

बाह्यतः भरपूर करमणूक करणाऱ्या कलेच्या पोटांत बोध कसा शिरून बसलेला असतो, याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे भोंडे यांची कला हें होय. याचें प्रत्यंतर पहावयाचें असेल तर भोंड्यांच्या नकला पहाव्या भोंड्यांच्या नकलांचा कार्यक्रम पहात असतांना प्रेक्षक श्रोता मनसोक्त हंसेल. पण हंसतां हंसतां त्याला व्यवहारज्ञान झाल्याखेरीज रहाणार नाहीं. करमणुकीच्या द्वारां त्याला नवीन गोष्टी कळतात. ज्ञानांत भर पडते. तो अधिक शहाणा होतो. त्याला मनुष्यस्वभावांतली मख्खी कळते, निरनिराळ्या माणसांचे नमुने पहावयाला मिळाल्यामुळें मानवी स्वभावांतलें वैचित्र्य व मानवी व्यवहाराची गुंतागुंत यांचा त्याला सहजासहजीं उलगडा होतो. सखोल ज्ञान, सूक्ष्म निरीक्षणशक्ति आणि अनुकरणाचें सामर्थ्य या तीन गुणांच्या सहाय्यानें व त्यांच्या एकत्रीकरणानें श्री. भोंडे हे विविध तऱ्हेच्या व्यक्तींचें आणि विविध तऱ्हेच्या प्रसंगांचें चित्र डोळ्यापुढें उभें करूं शकतात हें चित्र केवळ काल्पनिक किंवा विनोदनिर्मितीकरितां तयार केलेलें नसून तें खऱ्याखुऱ्या समाजव्यवहाराचें दर्शन असतें, हें त्यांतलें वैशिष्ट्य विसरतां कामा नये. भोंड्यांच्या नकला म्हणजे कलेच्या आरशांत पडलेलें समाजाचें प्रतिबिंब होय. यांतच त्यांच्या कलेचें सौंदर्य आणि साफल्य सामावलेलें आहे. सुज्ञांना आणि रसिकांना भोंड्यांच्या नकला आकर्षक, प्रभावी आणि कलापूर्ण वाटतात त्याचें कारण हेंच.

### कलेचें दुहेरी कार्य

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून कलेचे दुहेरी कार्य स्पष्ट होईल. कलाविलासाचा तात्कालिक परिणाम व फळ म्हटलें म्हणजे निर्भेळ आनंद देणें हें होय, यांत शंका नाहीं. उच्च प्रकारची बौद्धिक, सात्त्विक आनंदनिर्मिति, आल्हादक्षमता, समरसता, प्रसन्नता उत्पन्न करणें आणि आस्वादकाला क्षणभर स्वतःला विसरायला लावून त्याला कलानंदांत निमग्न करून सोडणें हीं कलेचीं

लक्षणें आहेत. आल्हाद हें मनाचें आरोग्य वाढविणारें मोठें रसायन होय. या दृष्टीनें ज्या ज्या कृतींत उत्कटतेनें आल्हाददायकत्व आणि चमत्कृतिजनकत्व आहे, ती कृति कला या संज्ञेला पात्र होते. परंतु एवढ्यावर कलेनें संतुष्ट राहतां कामा नये. कलेनें जातां जातां पण शक्य तितकें लक्ष ठेवून समाजप्रगतिपोषक सद्‌भावना व विचारसरणी यांची पेरणी केली पाहिजे. हें कलेचें दुसरें पण महत्त्वाचें कार्य होय. कलेनें निर्माण होणारा आनंद रसिकाच्या पदरांत टाकून शिवाय त्याच्या सद्‌भावना उद्दीपित करण्याचें, जीवनांतील विविध अनुभवांचा प्रत्यय आणून देण्याचें व जीवनाला वळण लावणाऱ्या विचारसंपदेचाहि लाभ करून देण्याचें ब्रीद पत्करलें तर त्या त्या मानानें त्या कलेचा दर्जा व उपयुक्तता अधिकाधिक श्रेष्ठ ठरेल, असें म्हणण्याला आक्षेप असण्याचें कारण नाहीं.

### कलावंत निरंकुश नाहीं

प्रत्येक कलावंतानें 'Man is a social being' या वचनांतलें तत्त्व सदैव लक्षांत बाळगलें पाहिजे. आपल्या कलाविलासामुळें स्वतः कलावंताला आपल्यापुरती कितीहि आनंदप्राप्ति होत असली, तरी अखेर कला ही लोकसमुदायाकरितां, समाजाकरितां आहे, हें निर्विवाद आहे.

प्रत्येक व्यक्ति हा समाजाचा एक घटक आहे, आणि कलावंत तर समाजाचा अधिक महत्त्वाचा घटक मानावा लागेल. कारण त्याच्या कलेच्या प्रभावानें सबंध समाजावर परिणाम घडत असतो. या बाबतींत आपल्या नाट्य-वाङ्मय-निर्मितीच्या उद्देशांवर प्रकाश पाडणारे बर्नार्ड शॉचे खालील उद्‌गार चिंतनीय आहेत :

"For Art's sake alone I would not face the toil of writing a single sentence." ( Man and Superman )

म्हणूनच प्रत्येक कलावंतानें आपल्या कलेचा विकास व विलास समाजहिताच्या चौकटींत बसविण्याची दक्षता व जबाबदारी घेतली पाहिजे. या दृष्टीनें पहातां कलावंत कवीप्रमाणेंच जितका निरंकुश तितकाच बांधलेलाहि असतो. गाणाऱ्यानें कितीहि तानांच्या भराऱ्या मारल्या किंवा स्वैर आलाप काढले, तरी त्याला तबल्याचा ताल सांभाळावा लागतोच. त्याचा एक कान

स्वतःच्या स्वरविस्ताराकडे असला तरी त्याचा दुसरा कान तबलजीच्या ठेक्यानें घट्ट पकडलेला असतो. तबलजी हा गायकाचा दुय्यम, सहाय्यक, साथीदार खरा; पण त्याचें गायकाला होणारें सहाय्य व सहकार्य सुनेसारखें नसून सासूसारखें असतें. कोणत्याहि कलेंतल्या कलावंतानें समाजाच्या तालावर आपल्या कलेचा प्रपंच थाटला पाहिजे.

## भोंडयांच्या नकलांची विविधता व लोकप्रियता

भोंडयांच्या संग्रहांत एकंदर सुमारें दीडशेंपासून दोनशेंपर्यंत नकलांचा भरणा आहे. या सगळ्या नकला एका वेळीं करावयाच्या म्हटल्या तर निदान शंभर तास लागतील ! सामान्यतः त्यांच्या दोन-अडीच तासांच्या कार्यक्रमांत फार तर ते १५।२० नकला दाखवूं शकतात. एकदां रात्रीं त्यांचा मोठ्यांत मोठा कार्यक्रम चार तास चालू होता. 'रात्र थोडी आणि सोंगें फार' ही म्हण त्यांच्या बाबतींत निराळ्या अर्थानें अनुभवाला येते. लोक कंटाळतील पण भोंडे कंटाळत नाहींत इतका उत्साह व भरणा त्यांच्यापाशीं आहे. द्रौपदीच्या थाळीप्रमाणें कलेचा कणगा सदा भरलेला. कधीं कमी पडायचा नाहीं किंवा दगा द्यायचा नाहीं ! अखिल महाराष्ट्रभर जिथें जिथें मराठी भाषा बोलली जाते, तिथें तिथें-मुंबईपासून नागपूर-वऱ्हाडापर्यंत आणि कोंकणापासून हैद्राबाद-मराठवाड्यापर्यंत सर्वत्र भोंडयांच्या कलेला आमंत्रण असतें. भोंडे कोठेंहि गेले तरीं तिथल्या श्रोतृवृंदावर ते आपल्या कलेची छाप पाडतात. अपरिचित ठिकाणां ते प्रथमच गेले तरी देखील त्यांचे कार्यक्रम अत्यंत यशस्वी होतात. कारण त्यांची कीर्ति त्याच्याआधींच तेथें जाऊन पोंचलेली असते आणि शिवाय भोंडे आपल्या अंगच्या अद्वितीय कलेनें रसिकांचीं अंतःकरणें लीलेनें काबीज करूं शकतात. त्याचे कार्यक्रम बघण्याकरितां प्रचंड गर्दी उसळते. कांहीं प्रसंगां तर अतोनात गर्दी झाल्यामुळें त्यांचे कार्यक्रम रद्द करावे लागले आहेत! जिथें भोंडे जातील तिथें तिथें त्यांचा आणि त्यांच्या गुणांचा सत्कार होतो. त्या त्या गांवीं भोंडयांच्या नकला हा एकच विषय लोकांच्या तोंडीं होऊन बसतो. अपरिचित शहरांत अपरिचित श्रोतृवृंदाचीं मनें जिंकणाऱ्या या अद्भुत कलावंताच्या कलेची करामत किती विलक्षण आहे याची कल्पना येते. भोंडयांच्या अंगचें हें सामर्थ्य पाहून I went, I saw and I conquered

या सीझरच्या वाक्याची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं. भोंड्यांना आपली फारशी जाहिरात करावी लागली नाहीं. त्यांच्या कलेचा सुगंध प्रसिद्धीच्या वाऱ्यानें लोकांत आपोआपच पसरूं लागला. " मुंगियांच्या घरां कोण धाडी मूळ । देखूनियां गूळ धांव घेती ॥ " असा प्रकार झाला.

वर दिलेल्या माहितीवरून भोंड्यांच्या नकलांची विविधता, वैचित्र्य आणि विस्तार ध्यानांत येईल तथापि जवळ दोनशें नकलांची सामग्री असली तरी भोंड्यांना एका बैठकींत निवडून चाळूनपाळून पंचरावीसच नकला करणें शक्य असतें. समोरचा श्रोतृवंद जसा असेल त्या मानानें भोंडे त्या त्या बैठकींत आपल्या नकलांची निवड करतात. ' यथा यक्षस्तथा बलिः । ' इच्छा भोजन घालणाऱ्या हौशी यजमानाप्रमाणें भोंडे कोणत्याहि प्रकारच्या श्रोतृवर्गाचें मनोरंजन करून त्याची तृप्तता करूं शकतात. यांत त्यांचें चातुर्य आणि त्यांच्या कलेची श्रीमंती दिसून येते. नाटकांत ज्याप्रमाणें गंभीर आणि विनोदी प्रवेश आलटून पालटून योजलेले असतात, त्याप्रमाणेंच भोंडे आपल्या नकलांचा क्रम ठरवितात. त्यामुळें प्रेक्षक कंटाळत नाहींत. त्यांचा उत्साह आणि उत्सुकता कायम रहाते.

## न चुकणारी लोकमान्यांची नक्कल

भोंड्यांपाशीं विविध नकलांचा भरपूर भरणा असल्यामुळें एखाद्यानें त्यांचे दहापंधरा कार्यक्रम पाहिले तरी दरवेळेस त्याला दोनतीन तरी नवीन नकलांचा लाभ झाल्याखेरीज रहात नाहीं. येथें एक गोष्ट मात्र विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. भोंडे इतर सर्व नकला आलटून-पालटून करीत असले तरी टिळकांची नक्कल मात्र प्रत्येक कार्यक्रमांत असावयाचीच. भोंड्यांचा प्रत्येक कार्यक्रम टिळकांच्या नकलेनंतर समाप्त होतो. अनंतचतुर्दशीच्या गणपतिविसर्जनाच्या मिरवणुकींत अखेरीस ज्याप्रमाणें मंडईचा भव्य गणपति असतो त्याप्रमाणें भोंड्यांच्या नकलेमध्यें शेवटीं लोकमान्यांची मूर्ति असते. लोकमान्य टिळकांची नक्कल हें जणुं भोंड्यांच्या कार्यक्रमाचें भरतवाक्य आहे. ही गोष्ट त्यांच्या टिळकभक्तीची निदर्शक आहे. प्रत्येक वेळीं न चुकतां लोकांपुढें भोंडे टिळकांची नक्कल करतात आणि लोकाग्रहास्तव ती करावीहि लागते, यावरून टिळकांची ' लोकमान्य ' ही पदवी किती सार्थ व योग्य

होती हेंहि सहज लक्षांत येतें. भोंडे करीत असलेली लोकमान्यांची नक्कल लोकांना मान्य झालेली आहे, यांत शंका नाहीं. किंबहुना ' महाराष्ट्राचा आद्य व श्रेष्ठ अनुकरणपटु ' या पदवीवर भोंड्यांचा हक्क प्रस्थापित होण्याला व त्यांचा लौकिक सगळीकडे पसरण्याला ही टिळकांची नक्कल पुष्कळ अंशीं कारणीभूत झालेली आहे.

## टिळकांचें पुनर्दर्शन

भोंड्यांच्या प्रत्येक कार्यक्रमांत त्या थोर देशभक्ताचें पुण्यस्मरण व पुनर्दर्शन प्रेक्षकांना घडतें. हा लाभ सामान्य नाहीं. टिळकांची सगुणमूर्ति प्रेक्षकांपुढें अवतरते. टिळकांचें व्याख्यानहि त्यांना ऐकावयाला मिळतें. बाजूच्या पडद्यांतून लोकमान्य टिळक व्यासपीठावर आल्याबरोबर टाळ्यांचा गजर होतो. ती मूर्ति दिसतांच प्रेक्षकांना हर्षभरानें टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त केल्याशिवाय राहवतच नाहीं. समरस आणि उचंबळलेल्या प्रेक्षकसमुदायाच्या टाळ्या जितक्या खुद्द टिळकांविषयींच्या आदरभावनेनें तितक्याच त्या भोंड्यांच्या कुशल कलेविषयीं वाटणाऱ्या कौतुकानें प्रेरित झालेल्या असतात. निम्म्या टाळ्या टिळकांच्या व निम्म्या टाळ्या भोंड्यांच्या, असा हिशेब मांडावा लागेल. टिळकांच्या नकलच्या वेळीं उत्साहानें आणि उत्स्फूर्ततेनें मिळणाऱ्या टाळ्यांच्या प्राप्तींतला अर्धा वांटा मर्मज्ञ निरीक्षक उदार बुद्धीनें खासच भोंड्यांच्या पदरांत टाकील. याचें कारण उघड उघड आहे. भोंडे टिळकांचें सोंग इतकें हुबेहूब आणतात आणि चालण्या-बोलण्यासकट त्यांची नक्कल इतकी अस्सलबरहुकूम वठवितात कीं, सांगतां पुरवत नाहीं. मूर्तिमंत बाळ गंगाधर टिळकच आपण पहात आहोंत, असा प्रेक्षकांना भास होतो. एखाद्या चित्रकारानें कागदावर किंवा कॅन्व्हसवर काढलेलें निर्जीव चित्र पाहून देखील त्यांतील सादृश्यामुळें आपण ती व्यक्तिच पहात आहोंत, असा आभास क्षणभर उत्पन्न होतो. मग हें हलतेंबोलतें जिवंत चित्र किती प्रत्यक्षवत् दिसेल किंवा दिसतें, हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. टिळकांची ती काळीसांवळी ठेंगणी मूर्ति, ती ठराविक आंगरखा-पगडी, सिंहासारख्या मोठाल्या पिंजारलेल्या मिशा, त्यांची ती उग्र मुद्रा, बारीक पण चमकणारे डोळे व भेदक दृष्टि, वार्धक्यानें व तुरुंगवासानें

थकलेले असले तरी त्यांच्यामध्यें प्रसंगविशेषीं संचारणारा तो आवेश आणि व्याख्यानांतून छोटींछोटीं पण परिणामकारक खंजीरवजा वाक्यें वापरण्याची त्यांची भाषणपद्धति व ठसठशीत आणि जोर देऊन उच्चार करण्याची त्यांची धाटणी इत्यादि टिळकांचीं सर्व वैशिष्ट्यें भोंड्यांच्या नकलांत यथा-योग्य उमटलेलीं आढळतात. असो. टिळकांच्या नकलेचें अधिक विस्तृत वर्णन पुढें ‘ निवडक नकलांचा परिचय ’ या भागांत द्यावयाचें आहे. म्हणून येथें त्याचा अधिक विस्तार नको. श्री. भोंडे एका गेंगाण्याची – नाकांत बोलणाऱ्याची-नक्कल करीत असतात. त्यांत तो गेंगाणा गृहस्थ भोंडे करीत असलेल्या टिळकांच्या नकलेचें वर्णन करतांना म्हणतो—

“ टिळकांची नक्कल – जश्शीच्या तश्शी ! ”

गेंगाण्याची नक्कल अत्यंत विनोदी आहे खरी. पण त्याचे हे उद्गार किती सार्थ आणि ततोतंत बरोबर आहेत, हें मार्मिक प्रेक्षकांना पटल्याखेरीज रहाणार नाहीं

**धन्य ते भोंडे आणि धन्य ते प्रेक्षक !**

पूर्वीच्या पिढींतले जुने लोक नेहमीं म्हणतात : “ ज्यांनीं टिळक, शिवरामपंत किंवा नटवर्य गणपतराव जोशी, भाऊराव कोल्हटकर यांना पाहिलें नाहीं, ते कमनशिबी. आम्ही भाग्यवान् म्हणून आम्हीं टिळकांना पाहिलें, त्यांचीं व्याख्यानें ऐकलीं ” ज्यांनीं टिळकांना पाहिलें, ते खरोखरच सुदैवी. जो पुरुषसिंह केवळ पूर्वपुण्याईनें महाराष्ट्राला व भारताला लाभला आणि जें नररत्न शतकांतून एखाद्या वेळेसच वांट्यास येतें, त्याच्या दर्शना-परतें भाग्य दुसरें कोणतें असेल ? परंतु हल्लींच्या पिढीचें भाग्य हें आहे कीं, निदान त्यांना भोंडयांची नक्कल तरी पहावयास मिळत आहे. टिळकांची तहान त्यांना भोंडयांच्या नकलेनें भागवितां येते. पण यापुढच्या पिढ्या मात्र खचित अधिक अभागी. कारण भोंडयांच्यानंतर टिळकहि नाहींत आणि त्यांची नक्कलहि नाहीं.

ज्यांनीं लोकमान्य टिळकांना पाहिलेलें आहे, त्यांना भोंडयांच्या नकलेंत टिळकांच्या पुनर्दर्शनाच्या अनुभवाचा आनंद अनुभवितां येतो. त्यांना मनानें पुन्हां एकदां त्या जुन्या काळांत प्रवेश करतां येतो आणि कांहीं काळ क

होईना, ते त्या पूर्वीच्या प्रिय व परिचित प्रसंगांचा प्रत्यय मोठ्या आनंदानें आणि समरसतेनें घेतात. दिवंगत झालेल्या—काळानें आपल्यांतून हिरावून नेलेल्या—व्यक्तींचें ‘पुनरागमन’ घडवून आणण्याचें भोंडयांच्या अनुकरण-कलेंतील हें सामर्थ्य अद्‌भुत नाहीं, असें कोण म्हणेल? अशा रीतीनें भोंडे आपल्या कलेच्या जादूनें लोकमान्यांना न पाहिलेल्यांना दर्शन व पाहिलेल्यांना पुनर्दर्शन करून देत असतात. हे त्यांच्या कलेचे समाजावर उपकार आहेत, यांत शंका नाहीं. धन्य ते टिळकांचें दर्शन घडविणारे नकलाकार भोंडे! आणि धन्य ती टिळकांची नक्कल पहाणारे रसिक भाविक प्रेक्षक!

## समाजांतील सर्व थरांचें प्रतिबिंब

टिळकांच्या नकलेचें वर्णन उदाहरणादाखल केवळ भोंडयांच्या कलेचा एक नमुना दाखविण्याकरितां केलें आहे. भोंडे घडवीत असलेल्या समाज-दर्शनाचा तो एक भाग आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईल. या कलावंताच्या कलेच्या खाणींत अशीं कित्येक रत्नें आहेत. भोंडयांच्या नकलांतील विविधता थक्क करून सोडणारी आहे. समाजाच्या खालच्या थरापासून अगदीं वरच्या थरापर्यंत सर्व प्रकारच्या व्यक्तींच्या नकला त्यांच्या संग्रहांत आहेत लहान-मोठ्या, तरुण-म्हाताऱ्या, गरीब-श्रीमंत, स्त्री-पुरुष अशा सर्वांच्या स्वभावांतील खाचाखोचा त्यांच्या नकलांत प्रतिबिंबित होतात. भोंड्यांच्या कलाभांडारां-तील हरएक चीज ही मनुष्यस्वभावाचा एकेक नमुना आहे. त्यांच्या संग्रहांत नाहीं कोण? शिक्षक, विद्यार्थी, प्रोफेसर, नर्स, ऑफिसर्स, नट, हरिभक्ति-परायण, विद्वान् वक्ते, प्रवचनकार, भटजी, ज्योतिषी, म्हातारी विधवा सासू, थोर देशभक्त, पुढारी अशा कित्येक प्रकारच्या नकला ते करतात. आतां सांगितलेलें वर्गीकरण मोघम स्थूलमानानें दिलें आहे. या नकलांचा तपशील दिला तर त्यांत पुष्कळच वैचित्र्य आणि विविध छटा सांपडतील. नुसते शिक्षक म्हटले तरी त्यांत सोळा शिक्षकांच्या नकला आहेत. हे सर्वजण नूतन मराठी विद्यालयांतील माजी शिक्षक होत स्वतः भोंडे हे नू. म. वि. चे माजी विद्यार्थी असल्यामुळें ते शाळेंत शिकत असल्यापासून या शिक्षकांच्या नकला करीत आले आहेत. त्या किती अचूक आणि तंतोतंत होतात, हें नू. म. विद्यालयांत शिक्षण झालेल्या मंडळींना चांगलें पटतें. आपल्या जुन्या

मास्तरांच्या नकला पाहून व जुन्या आठवणी जागृत होऊन त्यांना फार आनंद होतो व ते त्याबद्दल भोंडयांना मनापासून धन्यवाद देतात. एखाद्यानें फक्त एवढ्या सोळा शिक्षकांच्या नकला ऐकल्या तरी तेवढ्यांतहि त्याला भोंडयांच्या अनुकरणपटुत्वाची प्रचीति आल्याखेरीज राहणार नाहीं. प्रत्येकाचा आवाज वेगळा, शिकवण्याची पद्धति भिन्न, शब्दयोजना निराळी, मुद्रा व आविर्भाव वेगवेगळा. विशेषतः आबा मास्तरांची नक्कल पहातांना परिचितांना फारच मौज वाटते. आबा मास्तरांचे ग्राम्य शब्दप्रयोग, आवाज व ओरडून सांगण्याची पद्धत आठवल्यामुळें व पटल्यामुळें प्रेक्षकांत फार हंशा पिकतो. असो. त्याचप्रमाणें वर लिहिलेल्या यादींतले पुढारी, देशभक्त, ऑफिसर, भटजी इत्यादिकांपैकीं प्रत्येक वर्गांत मोडणाऱ्या अनेक व्यक्तींचीं अनुकरणें आहेत.

## इतर नकलाकार व भोंडे

नकलांच्या बाबतींतलें भोंडयांचें एक सर्वांत महत्त्वाचें वैशिष्ट्य येथें नमूद करणें आवश्यक आहे तें असें कीं, भोंडे करतात त्यांपैकीं एकहि नक्कल काल्पनिक किंवा रचलेली नसते. इतर नकलाकार अलीकडे पुष्कळ झाले आहेत. ते आणि भोंडे यांच्यांतला हा मोठा फरक आहे इतर नकलाकार ज्या नकला म्हणून करतात त्या 'नक्कल' या संज्ञेस पात्रच नसतात. कारण अस्सलबरहुकूम वठविलेली ती नक्कल होय. इतर नकलाकार या नांवानें मिरवणारे लोक बहुधा अशा तऱ्हेची नक्कल करीतच नाहींत. एक तर अशा मंडळीपैकीं बहुतेक लोक नकलांचा कार्यक्रम गणेशोत्सवासारख्या प्रसंगीं केवळ चार पैसे मिळविण्याचा धंदा म्हणून करीत असतात. दुसरी गोष्ट अशी कीं, त्यांची नक्कल म्हणजे एखाद्या विशिष्ट व्यक्तीची अनुकृति नसून चार ठिकाणच्या चार चिंध्या गोळा करून त्यांची शिवलेली एक विचित्र गोधडी असते. केवळ कांहींतरी आवाज काढून आणि अंगविक्षेप करून लोकांना हंसविणें एवढाच त्यांचा हेतु असतो. भरमसाट व भडक आतिशयोक्ति हेंच काय तें त्यांचें भांडवल. तेवढ्यावर ते विनोदाचा किफायतशीर व्यापार करूं इच्छितात. परंतु हा बाजारी प्रकार कला नसून कलेचें विडंबन होय. अशा तऱ्हेचे कार्यक्रम अनुकरणकला या सदरांत

मोडणार नाहींत. फार तर अशिक्षित प्रेक्षक वर्गाचें मनरंजन ते करूं शकतील. परंतु सुसंस्कृत व उच्च अभिरुचीच्या समाजाला अशा कलाहीन कार्यक्रमानें तृप्तता व समाधान मिळणें अशक्य आहे.

## नकला खऱ्या-काल्पनिक नाहींत.

उलटपक्षीं भोंडे सुमारें अडीशें नकला करतात त्यांपैकीं प्रत्येक नक्कल खरी म्हणजे विशिष्ट व्यक्तीची असते. उदाहरणार्थ तीन भटजींची, ज्योतिषीबुवांची, सासूची, मिलटिरी अकौंट्स् खात्यांतील अधिकारीवर्गाची किंवा एक शिक्षक व दोन विद्यार्थी यांच्या नकला पहा. यांतील प्रत्येक व्यक्ति खरीखुरी, प्रत्यक्षांत होऊन गेलेली आहे-काल्पनिक नव्हे. काव्यशास्त्रांत जें महत्त्व स्वभावोक्ति अलंकाराला आहे तेंच महत्त्व या कलेत यथातथ्यदर्शनाला आहे. प्रत्यक्षांत असलेल्या व्यक्तीचें चित्र व भास हुबेहूब उत्पन्न करणें हें अनुकरणकलेंतलें कौशल्य व मर्म आहे. यांचें नांव अनुकरणकला. भोंडे या कलेमध्यें अत्यंत निष्णात आहेत एवढेंच नव्हे तर या क्षेत्रांत त्यांचा हात धरणारा कोणी नाहीं, असाच रसिकांचा अभिप्राय पडेल, याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं.

भोंडे जशा एकेका व्यक्तीच्या एकेरी नकला करतात त्याचप्रमाणें ते कांहीं संवाद व प्रसंग यांच्याहि नकला करून दाखवितात. अशा संवादातून एकेका नकलेंत पांचपांच सहासहा वेगवेगळ्या व्यक्तींचे आवाज काढणें व त्या त्या व्यक्तीचें आविर्भाव आणणें असें अवघड कसब भोंडयांच्या ठिकाणीं असलेलें दृष्टीस पडतें. हा त्यांचा विक्रम मात्र आश्चर्यकारक आहे यांत शंका नाहीं. तथापि त्याचें या ठिकाणीं विस्तृत वर्णन न देतां व्यक्तींच्या किंवा संवादांच्या नकलांतून श्रोत्याला मनोरंजनाबरोबर बोध कसा मिळतो व समाजदर्शन कसें होतें, याचें थोडक्यांत दिग्दर्शन करून हा विषय संपवूं.

## संवादांतून स्वभावदर्शन

अशा संवादांतून कोणत्या तरी प्रसंगाच्या अनुषंगानें अनेक व्यक्तींचा संघर्ष किंवा खटका दाखविलेला असतो. त्यांत निरनिराळ्या माणसाच्या मनःप्रवृत्ति, स्वभाव, वागण्याच्या पद्धति परस्परविरोधामुळें मनात चागल्या

भरतात. मनुष्य-स्वभावाचे भिन्न भिन्न पैलू व छटा ध्यानांत येतात. याचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सुप्रसिद्ध किर्लोस्कर नाटक मंडळीचे मालक व मॅनेजर कै० शंकरराव मुजूमदार, त्याच कंपनींत पूर्वी गाजलेले, ' हीरो 'चें काम करणारे नामवंत नट व गायक कै० जोगळेकर, नटसम्राट बालगंधर्व ( त्या वेळचा नुसता नारायण ) आणि खुद्द श्री. भोंडे या तिघांचा संवाद-प्रसंग नाटक कंपनीचा मॅनेजर आपल्या हिताला व उत्पन्नाला कसा जपत असतो हें त्यांत दिसतें. मुजूमदारांचें खोल मुत्सद्दीपण व चाणाक्षपणा यांची कल्पना येते. कै० जोगळेकरांचा सरळ, नाकासमोर चालण्याचा व ' एक घाव दोन तुकडे ' स्वभाव लक्षांत येतो. बालगंधर्व त्या वेळीं वयानें तरुण असले तरी तेव्हांपासूनचा त्यांचा गोडबोल्या स्वभाव आणि सहसा कोणालाहि न दुखवितां दुसऱ्याच्या पोटांत शिरून त्याचें मन मोहून आपल्याला पाहिजे तें साधावयाचें व तेंहि शक्य तितकें परस्पर दुसऱ्याकरवीं जमवून आणावयाचें ही या नकलेंत दिसणारी बालगंधर्वांच्या स्वभावांतली मिठ्ठास धूर्तता मनाला पटल्याखेरीज रहात नाहीं. भोंडयांच्या नकलांतून स्वभावाचें ज्ञान व व्यव-हाराचा बोध कलेच्या द्वारां रंजक पद्धतीनें कसा विनासायास पदरांत पडतो, याची या उदाहरणावरून वाचकांना कल्पना येईल.

## सोंगें पुष्कळ, पण सामग्री थोडी

जो प्रसंग डोळ्यांपुढें उभा करण्याला नटसंच लागेल तोच प्रसंग भोंडे एकटेच आपल्या कलाचातुर्याच्या जोरावर चित्रित करूं शकतात. त्यामुळें नाटककंपनीला आवश्यक असा लवाजमा, लटांबर त्यांना लागत नाहीं. त्यांचा एक खांबी तंबू आहे. विंचवाचें बिऱ्हाड जसें त्याच्या पाठीवर त्या-प्रमाणें भोंडयांचें आहे. त्यांचें काम अगदीं सुटसुटीत. प्रेक्षकांपैकींच कोणाची टोपी मागतील, कुणाची काठी मागतील, कुणाचा लाँग कोट मागून घेतील. ( अर्थात् तात्पुरता ! ) थोडयाशा उसनवारीवर ते सहज काम भागवून नेतात. अल्प भांडवलावर ते अनुकरणाचा आपला मोठा व्यापार चालवितात यथार्थ अभिनय हा अनुकरणकलेचा आत्मा आहे, सोंग-सजावट हें केवळ शरीर आहे, हें रहस्य भोंडे उत्तम जाणतात.

' क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे । '

हाच न्याय भोंडयांच्या कलेच्या यशःसिद्धीला लागू पडतो.

**कलेंतलें मर्म : व्यक्तित्वाचा उलगडा**

व्यक्तींच्या बहिरंगापेक्षां अंतरंगाच्या अनुकरणांत खरी कला आहे. बाह्यवेष चट्‌कन् साम्याचा भास उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचा असला तरी तो दुय्यम होय. व्यक्तीचें व्यक्तित्व पोषाखांत नसतें. व्यक्तित्व आंत लपलेलें असतें. **भोंडे व्यक्तीची नक्कल करतात असें म्हणण्यापेक्षां ते व्यक्तित्वाची नक्कल करतात.** असें म्हणणें अधिक यथार्थ ठरेल. आंत बसलेलें व्यक्तित्व माणसाच्या मुद्रा, डोळे व त्याच्या हस्तपादादि अवयवांच्या क्रियाव्यापारांनीं बाहेर येत असतें. व्यक्तित्व प्रकट होण्याचीं हीं साधनें होत. विशेषतः मुद्रा व त्यांतल्या त्यांत डोळे हे तर माणसांतले दडून बसलेलें व्यक्तित्व बाहेर फोडण्याच्या कामांत मोठे तरबेज आहेत! इंद्रियांच्या बाह्यव्यापाराची नक्कल करावयाची याचें कारण तो बाह्यव्यापार व्यक्तित्वाचा निदर्शक असतो म्हणून. चित्र उभें करावयाचें आहे माणसाचें–म्हणजे त्याच्या स्वभावाचें, मनोरचनेचें, हें मर्म नीट लक्षांत आणलें पाहिजे. केवळ बाह्यस्वरूपाचें अनुकरण केलें तर ती यांत्रिक निर्जीव नक्कल होईल. त्यांत शरीराचें साम्य येईल, पण आत्म्याचें सादृश्य प्रतीत होणार नाहीं. हें यांतील इंगित जाणून भोंडे नेमकें व्यक्तित्व प्रकट होईल अशा गोष्टींवर झाप घालतात, त्या आत्मसात् करतात आणि त्याच अनुकरणात्मक क्रिया लोकांना दाखवितात. त्यामुळें ती 'व्यक्ति' आपल्याला दिसते—म्हणजे तिच्यांतलें नेमकें व्यक्तित्व आपल्याला उलगडतें. ही भोंडयांची खरी थोरवी होय. आणि हीच त्यांच्या कलेंतली गुरुकिल्ली आणि यशाचें रहस्य आहे. व्यक्तित्वचित्रणाचें हें प्राणभूत रहस्य ओळखून व ते यशस्वीपणानें अमलांत आणून श्री. भोंडे यांनीं नकला करण्याला कलेचा दर्जा प्राप्त करून दिला आहे.

काव्यादिकांचे टीकाकार मूळ ग्रंथावर टीका लिहून मुळांतला अर्थ सुबोध व स्पष्ट करतात; अधिक प्रकाश टाकतात. तीच कामगिरी मूळ व्यक्तीच्या नकलेनें साध्य होऊं शकते. नकला म्हणजे हुबेहूब काढलेलीं व्यंगाचित्रें असेंहि म्हणतां येईल.

## अनुकरणकलेचें मूलभूत तत्त्व

या मुद्द्याची थोडी आणखी फोड करणें इष्ट होईल. कारण हा मुद्दाच प्रस्तुत कलेच्या मीमांसेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा व या कलेच्या स्वरूपावर प्रकाश पाडणारा असा आहे. कलेच्या शरीरापेक्षां आत्मा अधिक महत्त्वाचा आणि म्हणून तोच हस्तगत व्हावयाला हवा. वेदान्तांत देखील व्यक्ति ही बाहेर नसून आंत असते हेंच मुख्य व मूल तत्त्व आहे. "मी अमुक आहें, मी तमुक आहें" अशा तऱ्हेचे प्रथमपुरुषी प्रयोग आपण नेहमीं करीत असतों. पण मी म्हणजे कोण, असा महत्त्वाचा प्रश्न वेदान्तशास्त्रानें उपस्थित केला आहे. शंकराचार्य म्हणतात—

मनोबुद्ध्यहंकारचित्तानि नाऽहं ।
न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे ॥

'मी म्हणजे हातपाय नव्हेत, अगर शरीर नव्हे किंवा मी म्हणजे माझें मन अथवा बुद्धिहि नव्हे. तर आंत असलेला जो आत्मा किंवा आत्मतत्त्व आहे तो मी आहें.' अध्यात्मशास्त्रांतलें हें तत्त्वच नाट्यकलेच्या किंवा अनुकरण-कलेच्या मुळाशीं आहे, हें मार्मिक वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

## टिळकांचें टिळकत्व कशांत ?

उदाहरणार्थ लो. टिळकांची नक्कल घेऊं या. टिळकांचें टिळकत्व कशांत आहे ? सुपारी खाण्यांत कीं अंगरखा-पगडींत ? त्यांच्या रागीट उग्र मुद्रेंत कीं तांबूस-पिंगट चमकणाऱ्या डोळ्यांत कीं ओरडून संतापल्यासारखें बोलण्यांत ? यापैकीं कशांतच टिळक नाहींत ! हीं सर्व बाह्य लक्षणें टिळकांचीं आहेत हें खरें. आणि नक्कल करतांना तीं सर्व ध्यानांत घेऊन वठवावयाला पाहिजेत हेंहि खरें. पण तेवढ्यानें टिळकांची नक्कल सोळा आणे होणार नाहीं. प्रत्यक्ष राजकारणांत देखील टिळकांसारखे वागणारे किंवा वागूं पहाणारे पुढारी होते. पण ते टिळक झाले नाहींत. संन्याशाचा वेष घेतल्यानें संन्यासी होत नाहीं किंवा दिसतहि नाहीं, त्याचप्रमाणें टिळकांचें सोंग आणून टिळक होणार नाहीं.

"ऊपरसे तो बहोत बनी, लेकिन अंदरकी बात राम जाने !"

# हे कोण ?





भालाकार भोपटकर ?



बॅ. जमनादास मेहेता ?



रँ. परांजपे ?

# हे कोण ?






लो. टिळक ?



ह. भ. प. पांगारकर ?



लोकनायक अणे ?

( श्री. भोंडे यांचें विविध व्यक्तिदर्शन )

या म्हणींतलें रहस्य हेंच आहे. टिळक डोळ्यापुढें उभे करावयाचे तर टिळकत्व म्हणजे टिळकांचें अंतरंग ध्यानांत घेतलें पाहिजे. टिळकांच्या भावना, त्यांची अंतःस्फूर्ति, त्यांचा स्वभाव, त्यांची इच्छा, महत्त्वाकांक्षा व ध्येय इत्यादि गोष्टींनीं बनलेल्या त्यांच्या मनोभूमिकेचा आराखडा प्रथम नकलाकाराला नीट कळावयाला हवा; तरच त्याला टिळकांची आकृति, आवेश व आविर्भाव यथार्थतेनें वठवितां येईल. चित्रकलेंत किंवा शिल्पकलेंत हीच गोम आहे. माणूस कळल्याशिवाय त्या माणसाचें चित्र कसें वठणार ? बाह्य सादृश्य कितीहि साधलें तरी मुद्रा (expression) साधली नाहीं तर तें चित्र वायां गेलें. कारण मुद्रा व डोळे हें माणूस कळण्याचें मुख्य स्थान व साधन होय. या दृष्टीनें नाट्यकलेंत व विशेषतः अनुकरणकलेंत मुद्राभिनयाला फार महत्त्व आहे.

## परचित्तप्रवेश ही गुरुकिल्ली

सारांश, कोणाचीहि नक्कल करतांना त्याची मनोभूमिका किंवा मनोरचना त्यांत प्रतिबिंबित झालेली असली पाहिजे हें त्यांतलें तात्पर्य. हें भोंडे करूं शकतात, हें त्यांच्या कलेंतलें वैशिष्ट्य होय. म्हणूनच त्यांच्या कलेंत सादृश्याचा भास आणि सौंदर्याचा वास आहे. एकदां सुप्रसिद्ध नाटककार कै. राम गणेश गडकरी यांनीं भोंड्याच्या नकला पाहिल्या व ते निहायत खूष झाले. भोंड्यांचा सर्व कार्यक्रम अगदीं जवळून, बारकाईनें व तन्मयतेनें पाहिल्यानंतर त्या मार्मिक प्रतिभावंतानें खालील उद्गार काढले :

" भोंडे यांची नक्कल केवळ वरकांती नसून ते त्या व्यक्तीच्या आत्म्याची नक्कल करतात. "

कै. गडकऱ्यांच्या या समर्पक अभिप्रायांत अनुकरण-कलेंतलें व भोंड्यांच्या करामतींतलें मर्म उत्कृष्ट रीतीनें सूचित झालेलें आहे. अभिजात नटाप्रमाणें भोंडे नकलेच्या प्रसंगीं स्वतःला सहजपणेंच विसरतात आणि अनुकृत व्यक्तीशीं तन्मयता पावतात. केवळ सरूपता नव्हे, तर तदात्मता संपादन करण्यांत त्यांचा हातखंडा आहे. स्वतःचें सत्त्व गमावून भोंडे तात्पुरतें दुसऱ्याचें सबंध व्यक्तित्वच उसनें घेतात. हें दुसऱ्याचें आणलेलें अवसान व उसनवारी औट घटकेची असली तरी बेमालूम असते. जणूं ती व्यक्तीच त्यांच्या अंगांत आपण होऊन संचारते !

सारांश, परचित्तप्रवेश किंवा परभूमिकारोहण हें या कलेचें रहस्य किंवा गुरुकिल्ली होय. हें प्रधान व प्राणभूत अंग श्री. भोंडे यांनीं चांगलें आत्मसात् केलें आहे.

## अनेक रसांची निर्मिति

भोंड्यांच्या नकला पाहून रसिक प्रेक्षकाचा हृदयसागर उचंबळतो हें आपण पहातों. याचें कारण त्यांत रस असतो हें होय. मूळच्या अस्सलांत हास्य करुण, वीर किंवा जो रस असतो तो तो नकलेंतहि उतरतो. नकला हें नाटकाप्रमाणेंच दृश्य व श्राव्य काव्य आहे, असें म्हणावें लागतें. संस्कृत शास्त्रकारांनीं रस हा नाटकाचा किंवा नाट्याचा आत्मा मानला आहे. रस म्हणजे काय? भरतमुनींनीं आपल्या नाट्यशास्त्रांत सांगितलें आहे :

रसः इति कः पदार्थ उच्यते । आस्वाद्यत्वात् ।

रसाची कसोटी रस या शब्दांतच आहे. रस म्हणजे आस्वाद, अर्थात् रसाचें मुख्य लक्षण म्हणजे आस्वाद्यता हें होय. ही आस्वाद्यता भरपूर असल्यामुळेंच भोंडयांच्या नकला रसभरित, चटकदार व आकर्षक होतात. त्यांच्या कार्यक्रमांत विविध रसांचा परिपोष कसा होतो पहा. शिवाय मनुष्यस्वभावाचें ज्ञान एकीकडे पदरांत पडतेंच. तीन भटजींच्या किंवा ज्योतिष्याच्या विनोदी नकलेंत हास्यरसाची लयलूट आहे. पण त्याबरोबरच या वर्गांतील मंडळींची धनलोभी वृत्ति, दुतोंडेपणा आणि दोन्ही डगरींवर हात ठेवण्याचा स्वभाव आपल्या नजरेंत भरतो. जांवयाचें प्रमाणाबाहेर कोडकौतुक करणाऱ्या वृद्ध सासूबाईची नक्कल तर फारच विनोदपूर्ण, समर्पक व बहारीची आहे. बडोद्याच्या महाराणी श्रीमंत चिमणाबाईसाहेब गायकवाड यांनीं एकदां मुद्दाम भोंडयांना बोलावून त्यांचा खास कार्यक्रम करविला होता. त्या वेळीं त्यांना सर्वांत ही नक्कल आवडली, असें त्यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरीकडून कळलें. यावरून सासूचें हें स्वभावचित्र गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वांना कसें पटतें हें दिसून येतें. या नकलेंत हास्यरसाची चंगळ आहे. बॅ. सावरकरांच्या नकलेंत वीररस उत्पन्न होतो. ती नक्कल ऐकून देखील सावरकरांच्या विचारसरणीची छाप श्रोत्यावर पडल्याखेरीज रहात नाहीं. लोकमान्यांच्या नकलेंत वीर आणि करुण या रसांचें मिश्रण आहे. मानपत्रसमर्पण-प्रसंगीं त्यांना आलेला गहिंवर

व त्यांची स्वराज्यप्राप्तीची तळमळ या दोन्ही भावना त्यांत आहेत. लोकमान्यांच्या तोंडचीं हीं गहिंवरलेलीं वाक्यें पहा :—

" म्हणून माझी परमेश्वरापाशीं हीच...प्रार्थना आहे कीं, हिंदुस्थानांतील विशेषतः महाराष्ट्रांतलि लोकांना अशा प्रकारची बुद्धि दे कीं, त्यांच्या बुद्धीनें, त्यांच्या परिश्रमानें त्यांना स्वराज्यसुखाचा लाभ घडो आणि तें माझा आत्मा पाहो. मी म्हातारा झालों आहें. मरण हें शेवटचें साध्य आहें पण माझ्यासारखीं कितीहि माणसं म्हातारीं... झालीं किंवा गेलीं तथापि स्वराज्य-प्राप्तीची इच्छा म्हणून जी कांहीं आहे ती कधीं म्हातारी होत नसते किंवा मरत नसते. ती एका देहांतून दुसऱ्या देहांत जाते, दुसऱ्या देहांतून तिसऱ्या देहांत जाते, आणि आपली इच्छा परिपूर्ण करून घेत असते. "

हे तळमळीचे उद्‌गार ऐकून श्रोत्यांचें अंतःकरण करुणरसानें ओथंबतें व त्यांच्या मनांत कार्याची स्फूर्तीहि संचारते. ह. भ. प. पांगारकरांची नक्कल हैं भक्तिरसनिर्मितीचें उदाहरण म्हणून सांगतां येईल

**नकलांचा हुबेहूबपणा**

सारांश, रसिकांच्या ठिकाणीं तो तो रस आणि तदनुरूप चित्तवृत्ति निर्माण करण्याचें सामर्थ्य भोंड्यांच्या कलेंत कसें ओतप्रोत व हुकमी भरलेलें आहे, हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आल्याखेरीज रहाणार नाहीं.

ती ती नक्कल आणि त्यांतील तो तो रस जसाच्या तसा वठविण्यांत भोंडे वाकबगार आहेत. भोंड्यांची ' अस्सलबरहुकूम ' नक्कल पाहिली म्हणजे ज्ञानेश्वरांनीं स्वतःच्या ग्रंथाचें वर्णन केलें आहे त्याची आठवण होते.

मूळ ग्रंथींचिया संस्कृता - । वरी मराठी नीट पाहतां ।
अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमी हें न चोजवे ॥

– ज्ञानेश्वरी १-४३

' गीतेच्या संस्कृत श्लोकांशीं माझ्या मराठी ओव्या नीट ताडून पहाल व दोहींचा अभिप्राय ध्यानात आणाल तर येथें भूमि म्हणजे मूळ ग्रंथ कोणता व टीकाग्रंथ कोणता हें समजणारहि नाहीं,' अशी ज्ञानेश्वरांनीं ग्वाही दिली आहे.

अधिकउणें कांहींएक न करतां गीतेचा भावार्थ मीं माझ्या ज्ञानेश्वरींत हुबेहूब उतरविला आहे, हा त्यांच्या सांगण्यांतला मतलब. हीच गोष्ट भोंडयांची आहे. ज्ञानेश्वरीचा वरील दृष्टान्त भोंडयांच्या नकलांना अधिकच समर्पकतेनें लागू पडतो. मात्र प्रेक्षकाला नकलेंतील मूळ व्यक्ति माहीत असली पाहिजे. असा जाणता प्रेक्षक जर भोंडयांची 'नक्कल' मुळाशीं ताडून पाहूं लागला तर अस्सल कोणतें आणि नक्कल कोणती, अशा संभ्रमांत पाडण्यातकें सामर्थ्य भोंडयांच्या कलेंत आहे; याची प्रचीति त्याला आल्याखेरीज रहाणार नाहीं! एकदां डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल बेन यांनीं भोंडयांच्या नकला पाहिल्या त्या वेळीं रँग्लर परांजपे यांची नक्कल पाहून ते म्हणाले, " Mr Bhonde, you are second Paranjpe ! संस्कृत काव्यशास्त्रांत भ्रांतिमान् नामक एक बहारीचा अलंकार आहे. कोणत्या तरी कारणानें दोन वस्तूंत सादृश्य उत्पन्न झाल्यामुळें माणसाला भ्रांति उत्पन्न होते आणि तो फसतो याची मौजेचीं उदाहरणें वर्णन केलीं, म्हणजे हा चटकदार अलंकार सिद्ध होतो भोंडयांच्या नकला पाहतांना भ्रांतिमान् अलंकाराची पदोपदीं आठवण होते व प्रत्यय येतो आणि प्रेक्षकांचा आनंद द्विगुणित होतो.

### भोंड्यांच्या भिन्न भिन्न भूमिका

सर्वसामान्यपणें नट किंवा नकलाकार एकांगी किंवा एकेरी असतो. प्रायः विनोदी भूमिका करणाराला गंभीर भूमिका वठवितां येत नाहींत. भिन्न भिन्न सोंगें सजविणें हा गुण अतिशय कठिण आणि म्हणूनच दुर्मिळ होय. नटांमध्यें एखादाच गणपतराव जोशी असा निघूं शकतो. 'नटवर्य' ही सार्थ पदवी मिळालेले गणपतराव जितकी हॅम्लेटची तितकीच तुकारामाची भूमिका हुबेहूब करीत असत. हॅम्लेटमधील गांभीर्यपूर्ण वाक्यांनीं प्रेक्षकांना थरारून सोडणारा आणि तुकारामाच्या कामानें चित्तवृत्ति उचंबळून व तल्लीन करून सोडणारा हा नामांकित नट 'झोपीं गेलेला जागा झाला' या विनोदी प्रहसनांतील आपल्या अभिनयानें प्रेक्षकवर्गाची हंसून हंसून मुरकुंडी वळवून सोडीत असे! याला म्हणावें अभिनयकौशल्य! त्याचप्रमाणें मागल्या पिढींतले सुप्रसिद्ध नट कै. भाऊराव कोल्हाटकर. भाऊराव स्त्री-भूमिकांप्रमाणेंच पुरुष-भूमिकादेखील तितक्याच कुशलतेनें व लीलेनें करीत असत, असें सांगतात. नायक आणि

नायिका यांच्या भूमिका सारख्याच उठावदारपणानें करणाऱ्या या नटाच्या अष्टावधानी अभिनयपटुत्वाची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे. सर्व तऱ्हेच्या, भिन्न भिन्न, किंबहुना परस्परविरोधी भूमिका समजून त्यांच्याशीं समरस होऊन तदनुरूप असे आविर्भाव करतां येणें हे गुण अशा तऱ्हेच्या अष्टपैलू अभिनयाला आवश्यक असतात. या गुणांची सामग्री भोंड्यांच्या ठिकाणीं आहे. म्हणूनच 'बहुरूपी' भोंडे वाटेल त्याची नक्कल सहजपणें करूं शकतात. त्यांच्यापाशीं विनोदी नकलांचा भरणा भरपूर असला तरी त्यांच्या-जवळ गांभीर्ययुक्त नकलांची वाण आहे, असें नाहीं. बहुजनसमाजाकरितां किंवा गर्दीकरितां भोंड्यांचे बहुतेक कार्यक्रम होत असल्यामुळें ते आपल्या पोतडींतून बहुधा विनोदी नगच बाहेर काढतात, ही गोष्ट खरी आहे. उघडच आहे, जसें गिऱ्हाईक तसा माल. 'मागणी तसा पुरवठा' हा अर्थशास्त्रांतील सिद्धान्त सुप्रसिद्धच आहे. 'भोग्या भेटेल तशी रात्र काढावयाची' या किंचित् ग्राम्य पण मार्मिक म्हणींत हेंच व्यावहारिक सत्य भरलेलें आहे. पुष्कळदां जी गत कलावंतिणीची तीच कलावंताची होत असते. समोर ठाकलेल्या श्रोतृ-समाजाकडे पाहून त्यांना आपला कलेचा नाच करावयाचा असतो. भोंडे स्वभावानें व अनुभवानें श्रोत्यांची आवडनिवड हेरण्याच्या कामांत मोठे तल्लख बनलेले आहेत. त्यांच्या स्वभावांत उपजत असलेला चाणाक्षपणा व व्यवहारचातुर्य आणि अनुभवानें आलेलें प्रसंगावधान या कामीं त्यांच्या चांगलें उपयोगी पडतें. कोणत्या नकला कुठें कराव्या, याचा अंदाज ते जलद बांधूं शकतात. हा त्यांचा निर्णय औचित्यपूर्ण व अचूक ठरतो.

## रसिकापुढें कलेची कळी खुलते

भोंडयांचे जे निवडक किंवा खास कार्यक्रम होतात, त्यांवरून वरील गोष्ट स्पष्टपणें लक्षांत येते. सुशिक्षित, सुसंस्कृत व उच्च अभिरुचीच्या श्रोतृवृंदापुढें भोंडयांचें खरें कसब कसोटीला लागतें. अशा समाजासमोर आपली करामत दाखवितांना त्यांना खरा आनंद होतो—स्फुरण चढतें. ते रंगांत येतात. त्यांच्या कलेची कळी खुलते. गुणज्ञांपुढें आपले गुण मांडण्याचा मोह आणि मौज कोणत्या गुणी माणसाला वाटणार नाहीं? गुणीजन आणि गुणज्ञ असा अन्योन्यप्रियसंगम झाल्याशिवाय कलानंदाचें आत्यंतिक समाधान लाभूं

शकत नाहीं. अशा प्रकारच्या कार्यक्रमांतून भोंड्यांच्या गंभीर व इतर नकला पाहिल्या म्हणजे हा कलावंत केवळ हंसविण्याकरितां किंवा करमणूक करण्याकरितां जन्मलेला नाहीं, याची प्रचीति येते. भोंड्यांचें सव्यसाचित्व किंवा अष्टपैलूपणा त्यांच्या सर्व प्रकारच्या नकला पाहिल्यानंतर प्रेक्षकांच्या नंजरेंत भरतो.

भोंड्यांच्या गुणांचें महाराष्ट्रानें भरपूर चीज केलें, ही गोष्ट मात्र येथें अवश्य नमूद केली पाहिजे. इतर प्रांतीयांपेक्षां महाराष्ट्रीय लोक स्वजनांचा गुणगौरव करण्याच्या कामांत किंचित् कंजूष आणि खळखळ करणारे आहेत, असा एक प्रवाद आहे. तथापि गुणांचें खणखणीत नाणें एकदां पारखून पाहिल्यानंतर त्याचें योग्य कौतुक करण्यांत महाराष्ट्र खास मागें राहणार नाहीं. वस्तुतः भोंड्यांची अनुकरणकला ही मानवी स्वभावावर आधारलेली आहे. त्यामुळें त्यांच्या कलेचें नाणें जगांत कोणत्याहि देशांत कोणत्याहि समाजांत चालण्यासारखें व आदरणीय ठरण्यासारखें आहे. कांहीं अंशीं भाषेच्या व इतर अडचणींमुळें भोंड्यांची कला महाराष्ट्राच्या बाहेर फारशी जाऊं शकली नाहीं. प्रिन्सिपॉल बेन भोंड्यांना म्हणाले होते, 'भोंडे, तूं इंग्लंडांत जन्माला आला असतास, तर तुझीं अधिक कोडकौतुकें झालीं असतीं. लोक तुला डोक्यावर घेऊन नाचले असते.' वॉटरवर्क्सचा अधिकारी कॉलेट साहेब तर त्यांना म्हणाला, 'भोंडे, तूं इंग्लंडला गेलास तर द्रव्याची रास घेऊन परत येशील!'

भोंड्यांना इंग्लंडांत न जन्मल्याचा खेद होत असेल असें वाटत नाहीं. इतका त्यांना आपल्या संस्कृतीचा अभिमान व प्रेम आहे. शिवाय ती गोष्ट त्यांच्या हातचीहि नाहीं परंतु विशेषतः स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपल्या सरकारनें मनांत आणलें असतें तर या कलावंताला देशांतरीं पाठविणें कांहीं अशक्य नव्हतें. परदेशांतल्या लोकांना ही कला दाखविण्यांत भारताचीच प्रतिष्ठा वाढली असती. हल्लीं पुष्कळ कलावंतांना एकमेकांच्या देशांत सांस्कृतिक देवाण-घेवाणीकरितां परदेशीं धाडण्यांत येतें. जग जणुं लहान व एक झालें आहे. मग भोंड्यांना ही संधि कां मिळूं नये? कै. गणपतराव जोशी, बालगंधर्व किंवा भोंडे यांच्यासारख्या अव्वल दर्जाच्या प्रतिभावान् कलावंतांच्या कलेचा व कीर्तीचा प्रकाश केवळ भारतांतच नव्हे तर साऱ्या जगभर

पसरावा व त्यांना महाराष्ट्राच्या गुणवत्तेची चमक कळावी, असें कोणत्या महाराष्ट्रीयास वाटत नसेल ?

### नट व नकलाकार

वस्तुतः नट व नकलाकार हे एकाच जातींतले. त्यांचें मूळ गोत्र व घराणें एकच. नकला ही नाट्यवृक्षालाच फुटलेली एक शाखा असें म्हणतां येईल. कारण समाजदर्शन हाच दोघांचाहि पाया आहे आणि यथार्थ अभिनय हाच या दोनहि कलांचा आत्मा आहे. ज्यामुळें नाट्यप्रकार लोकांना प्रिय झालेला आहे त्याच कारणामुळें नकलाहि लोकांच्या आवडत्या होऊन बसल्या आहेत.

त्रगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाऽप्येकं समाराधनम् ॥

नाटक प्रिय कां ? त्यांत समाजाचें प्रतिबिंब पहायला मिळतें. स्वभाववैचित्र्य दृष्टीस पडतें. मन रंगतें. विविध रसांच्या निर्मितीमुळें हृदय उचंबळतें. बहुरंगी लोकचरित कळून येतें. रंजनाबरोबर प्रबोधनहि होतें. कालिदासानें वर्णिलेले हे नाट्याचे सर्व गुण नकलांमध्येंहि आहेत. आणि हेंच भोंड्यांच्या नकला बहुतेकांना आवडतात याचें कारण होय.

मात्र नटापेक्षां नकलाकाराचें काम व भूमिका अधिक अवघड आहे. नकलकार एक वेळ नट होऊं शकेल—किंबहुना तो नट असतोच. पण नटाला मात्र नकलाकाराचें सोंग साधावयाचें नाहीं. एक तर नटाचें काम केवळ मूळ भूमिका असेल तशी वठविण्याचें—म्हणजे कांहींसें यांत्रिक स्वरूपाचें असतें. परंतु भोंवतालच्या व्यक्तींतील अथवा प्रसंगांतील मर्म व वैशिष्ट्य टपून बसून टिपून घेण्याइतकी भेदक निरीक्षणशक्ति आणि मानवी स्वभावाचें मार्मिक अवलोकन व चित्रण करण्याच्या बाबतींतले अव्वल दर्जाच्या नाटककाराचे गुण नकलाकारामध्यें अवश्य असावे लागतात. हे गुण भोंड्यांमध्यें प्रकर्षानें आहेत.

दुसरी गोम अशी कीं, नटापेक्षां नकलकाराचा अभिनय अधिक रेखीव व हुबेहूब असावा लागतो. नट विशिष्ट प्रकारच्या व्यक्तीची ( Type ) भूमिका करतो, पण नकलाकाराला विशिष्ट व्यक्तीचीच भूमिका वठवावयाची असते. निसर्गाचे देखावे ( Landscape painting ) रंगविणारा चितारी आणि

व्यक्तींचीं चित्रें ( Portrait painting ) काढणारा चित्रकार यांच्यामधें जो फरक आहे तोच नट व नकलाकार यांच्या बाबतींत आहे. पहिल्या चितार्‍याच्या कुंचल्याचे फराटे कांहीं कमी जास्त झाले तरी तेवढ्यानें देखावा बिघडेल किंवा वेगळा दिसेल असें नाहीं. पण व्यक्तीची प्रतिमा काढणार्‍या चित्रकाराच्या प्रत्येक रेषेरेषेला महत्त्व आहे. जरा चुकलें कीं सादृश्याला धक्का पोंचतो. त्याचप्रमाणें नटाचा अभिनय थोडा कमीजास्त झाला तरी तो खपून जाण्या-सारखा आहे. नकलाकाराला चुकायला अवसर नाहीं. त्याचा आविर्भाव हुबे-हूबच पाहिजे. त्यांत फरक झाला कीं रसभंग ठेवलेला. नटाची चूक मुसळा-एवढी ढोबळ असल्याशिवाय कळणारहि नाहीं नकलाकाराची कुसळाएवढी चूकहि प्रेक्षकाला मोठी दिसते. नकलाकारामध्यें जी अधिक दक्षता, कौशल्य व निरीक्षणशक्ति लागते ती सर्व भोंडयांच्यांत दिसून येते.

## अभिनयाचीं अंगोपांगें

अभिनय हें नाट्यकलेप्रमाणें अनुकरणाचेंहि एक प्रधान अंग आहे. पण अभिनय हा मोघम शब्द वापरून त्याच्या अंगोपांगांचा साकल्यानें बोध होत नाहीं. त्यांत अनेक छटा, भेद व प्रकार आहेत. त्यांचें एक कोष्टक बनवून खालीं देण्यांत येत आहे.



भोंड्यांच्या अनुकरणकलेंत या सर्व लहान-मोठ्या अंगोपांगांकडे बारकाईनें लक्ष पुरविलेलें असतें, हें सहज ध्यानांत येईल.

तथापि एकदां भोंड्यांनीं प्रत्यक्ष गंधर्व कंपनीच्या नाटकांत काम केलें होतें, त्याची मौजेची हकीगत पुढें देण्यांत येत आहे.

## गंधर्वांच्या रंगभूमीवर

सन १९२८ च्या सुमारास पुण्याच्या सुप्रसिद्ध किर्लोस्कर थिएटरमध्यें 'एकच प्याला' या सुप्रसिद्ध नाटकाचा एक सुप्रसिद्ध प्रयोग झाला. तसा पूर्वीं कधीं झाला नाहीं आणि पुढें होणार नाहीं. त्या वेळीं गंधर्व नाटक मंडळीचा मुक्काम पुण्यास होता. नारायणराव ऊर्फ बालगंधर्व यांचा आणि गोपाळरावांचा फार जुना स्नेह, हें पूर्वीं सांगितलेलेंच आहे. नारायणराव नुसतेच बाल होते आणि 'गंधर्व' नव्हते तेव्हांपासूनचा त्यांचा लोभ

गोपाळरावजींना गमतीनें एकदां स्टेजवर आणण्याचा आपला बेत नारायणरावांनीं या मुक्कामांत सिद्धीस नेण्याचें ठरविलें. त्या वेळीं नारायणराव वैभवाच्या व लोकप्रियतेच्या शिखरावर होते 'झक मारतो संस्थानिक' असा त्यांचा थाट आणि ऐश्वर्य होतें. त्या सुमारास नारायणराव भर ज्वानींत नसले तरी त्यांच्या सुंदर सोंगाला अजून अतिप्रौढत्वाचा विसंगत व बेडौल धक्का लागलेला नव्हता. या रंगभूमीच्या राजहंसाची नाट्यक्षेत्रांतील लीला व डौल जनतेच्या कौतुकाचा विषय झालेला होता. गोड गळ्यामुळें ते गानलोलुपांच्या गळ्यांतले ताईत बनले होतें, आणि स्त्रीचा अभिनय समाजांतलि स्त्रिया त्यांच्यापासून शिकत होत्या. पस्तिशींतल्या नारायणरावांनीं अजूनहि आपलें कौशल्य व कोमलता राखली होती. चापल्य व चमकदारपणा टिकविला होता. त्यांच्या पहिल्या 'एंट्री'ला अजूनहि कडकडून टाळ्या पडत होत्या. एक स्त्री वेषधारी नारायणराव उभे असले कीं स्टेज शोभून दिसे–भरलेलें दिसे. स्टेजमुळें नारायणरावांना उठाव कीं नारायणरावांच्या निर्दोष कृतीनें व आकृतीनें स्टेजला शोभा, हें सांगणें कठीण आहे.

तेथ अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥

असें तें न सुटणारें नाटकी कोडें होतें. नारायणरावांना किंचित् प्रौढता येऊं लागली होती; पण ती खपून जाण्यासारखी होती. त्यानें बेरंग होत नव्हता.

स्वयंवरांतली रुक्मिणी आतां सिंहकटि आणि लावण्यलतिका दिसत नसली, तरी अजून ती तिच्या आईसारखी केली-सवरलेली बाई खासच दिसत नव्हती. शेवाळलेल्या शरीरामुळें ‘मानापमानां’तील भामिनी चवळीच्या शेंगे-प्रमाणें सडपातळ व नवयौवना न दिसो, तथापि तिचें मोहकत्व बरेंचसें कायम असल्यामुळें धैर्यधराला भुरळ पाडण्याची हिंमत तिनें बाळगायला हरकत नव्हती. या नाट्यगाननिपुणानें महाराष्ट्रांतील रसिकवृंद आपल्या कलेवर झुलवीत ठेवला होता, यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. रसिकांना जितकी त्यांच्या गळ्याची गोडी लागलेली होती तितकीच त्यांच्यावर त्यांच्या स्त्री-रूपाची मोहिनी होती. कोणतेसे एक गायनाचार्य खांसाहेब नारायणरावांना ‘स्वराचा बादशहा’ म्हणत तें उगीच नव्हे बालगंधर्वांनीं जनमनावर अशी कांहीं छाप पाडून ठेवली आहे कीं, आतां त्यावर इतर कलावंतांचा ठसा उमटूंच नये. कोणाचेंहि काम रसिकानें पाहिलें कीं लगेच त्याच्या मनांत तुलना उभी रहाते आणि तो तिथेंच मनाशीं पुटपुटतो ‘छेः! बालगंधर्व ते बालगंधर्व!’

**एकाच नाट्यप्रयोगांत तीन भूमिका**

या पुण्याच्या मुक्कामांत बालगंधर्वांनीं गोपाळरावांना वेठीला धरलें. ‘एकच प्याल्यां’तल्या छोट्या छोट्या तीन भूमिका गोपाळरावांनीं करण्याचें ठरलें. सदर नाटकांत तळीरामाच्या मृत्युशय्येपाशीं डॉक्टर व वैद्य यांच्या परस्पर विरोधाचा एक बहारीचा विनोदी प्रवेश आहे. त्यांतलें वैद्याचें काम गोपाळ-रावांकडे होतें. तें त्यांनीं इतक्या जोरदार व विनोदी पद्धतीनें वठविलें कीं, सांगतां सोय नाहीं. नाटकांत नसलेलीं पदरचीं वाक्यें पुष्कळशीं दडपलीं. (अर्थात् तशी मालकांची आगाऊ परवानगी होती.) ‘एकच प्याल्यां’तला डॉक्टर वैद्यापुढें थोडासा नांगी टाकतो हें खरें आहे. तथापि त्या दिवशीं म्हणजे रात्रीं तो डॉक्टर या नव्या वैद्यांच्या अननुभूत वाक्यांनीं आणि माऱ्यानें जास्तच घाबरा झाला. या ताज्या दमाच्या वैद्याचा कचका कांहीं न्याराच होता. अशी वैद्यकीय मात्रा त्या डॉक्टरला तोंपर्यंत कधींच मिळा-लेली नव्हती! या प्रवेशाला केवळ प्रेक्षकच खदखदून हंसत होते असें नाहीं. विंगमध्यें कुतूहलानें गोळा झालेल्या बोडसप्रभृति नटसंचाचीहि तीच अवस्था झालेली होती. मरणाच्या दारीं बसलेला बिचारा तळीराम (कै. भांडारकर) देखील कष्टानें हंसूं आवरीत होता!

त्यानंतर पांचव्या अंकांत दुर्दशा झालेल्या सुधाकराचा बंडगार्डनवरील जो प्रवेश आहे, त्यांत दुसरा गृहस्थ व तिसरा गृहस्थ यांचीं कामें गोपाळरावांनींच केलीं. एकाच माणसानें हीं दोन्ही कामें केलीं आहेत हें न कळण्याइतकी सफाई त्यांत होती. गोपाळरावांनीं आवाज, ढब, चालणें सगळेंच बदलून टाकलें होतें. पहिल्या कामाला आबा कुलकर्णी (नूतन मराठींतले जुने मास्तर) यांचा टोन व सोंग वापरलें होतें. दुसऱ्या कामांत कै. लेलेशास्त्री यांची नक्कल होती. तें भाषण त्यांनीं काव्यांत बसविलें होतें. 'एकच प्याल्या'च्या प्रेक्षकांना वेगळेपणामुळें या कामाची फार मौज वाटली. भोंड्यांच्या अभिनयामुळें प्रचंड हंशा होत होता. स्त्रीवेषांतले नारायणराव याहि वेळेला विंगमधून उत्सुकतेनें पहात होते व मौज वाटून हंसत होते नारायणरावांची एका हातानें ओंचे आवरीत व दुसऱ्या हातानें पदर सांवरीत हंसतां हसतां इतकी धांदल उडाली कीं विचारूं नका. जी सिंधु आणखी पांचच मिनिटांनंतर स्टेजवर येऊन आपल्या रडण्यानें प्रेक्षकांना रडविणार होती ती सिंधु पडद्याच्या आंत मनसोक्त हंसत होती! गोपाळराव काम संपवून आंत येतांच नारायणरावांनीं त्यांना प्रेमभरानें मिठी मारून त्यांना शाबासकी दिली. उलट गोपाळरावांनीं लटक्या रागानें सोंग आणून " काय तुम्ही आम्हांला निष्कारण संकटांत घालतां " असें रागावून लीनतेनें उत्तर केलें. सगळेंच नाटक!

दुसऱ्या दिवशींच्या दैनिक 'ज्ञानप्रकाश'नें जाहीर केलें कीं, " कालच्या 'एकच प्याल्यां'त भोंड्यांनीं तीन भूमिका यशस्वीपणाणें वठविल्या. " तेव्हां भोंड्यांचा हा प्रयोग लोकांना कळला.

## निरीक्षणाला अभिनयाची जोड

समाजांत वावरणाऱ्या सर्व तऱ्हेच्या व स्वभावाच्या व्यक्तींच्या नकला ते करूं शकतात, हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. लहान-मोठा, स्त्री-पुरुष, तरुण-वृद्ध, प्रसिद्ध-अप्रसिद्ध कोणीहि त्यांच्या अनुकरणकलेच्या कचाटींतून आणि काकदृष्टींतून सुटत नाहीं! समोर आलेल्या माणसाच्या चालण्याबोलण्यावागण्यांतील गोम, खुबी, लकब, दोष, व्यंग, त्याच्या उच्चाराची ढब, घाटणी, पद्धत इत्यादि वैशिष्ट्यें त्यांच्या सूक्ष्म निरीक्षक दृष्टीला सहज व जलद हेरतां येतात. आणि तितक्याच सहजगतेनें व समर्पकतेनें त्यांना तीं वैशिष्ट्यें आपल्या

नकलांतून वठवितां येतात. बुद्धि अनुकरणीय भाग कोणता हें शोधून काढण्याला तत्पर, तर शरीर प्रत्यक्षांत अनुकरण करण्यांत तरबेज. या दोन्ही गोष्टी जमल्याशिवाय अनुकरण हें कला या पदवीला पोंचावयाचें नाहीं. समजा, एखाद्या व्यक्तीचीं वैशिष्ट्यें लक्षांत आलीं तरी तीं प्रत्यक्ष वठवितां आलीं नाहींत तर त्यांचें प्रकटीकरण कसें होणार ? उलटपक्षीं वैशिष्ट्यें वठाविण्याची कुशलता अंगीं असली तरी वैशिष्ट्यें कोणतीं आहेत आणि कोणतीं वैशिष्ट्यें अनुकरणीय आहेत, हें कळलें पाहिजे. सारांश, निरीक्षणाची सूक्ष्मबुद्धि आणि शरीर व आवाज हवा तसा वळणें या दोहोंची जोड जमली पाहिजे. बुद्धीची ग्रहणशक्ति व शरीरचापल्य यांच्या संयोगानें भोंडयांची कला सिद्ध झालेली आहे.

## कांहीं चहाते, कांहीं चिडणारे

भोंडयांच्या कलेची वाहवा करणारे लोक पुष्कळ असले तरी खुद्द स्वतःवरच बाजू आली तेव्हां चिडणारे लोक भोंडयांना भेटलेच. स्वतःची नक्कल स्वतः पाहून हंसणारे व खिलाड्र वृत्ति प्रकट करणारे कांहींजण होतेच. पहिलें उदाहरणार्थ रँग्लर परांजपे यांचें. नक्कल करण्याकरितां स्वतःचा काळा कोट, उपरणें आणि पगडी काढून देण्याचीहि त्यांची तयारी असे. दे. भ काळकर्ते शिवरामपंत परांजपे यांनींहि स्वतःची नक्कल कित्येक वेळां भोंडयांकडून करवून घेतली व त्याबाबत ते प्रशंशोद्गार काढीत असत. प्रखर विनोदबुद्धि असलेले जमनादास मेथा तर या बाबतींत चांगलेच खिलाड्र होते. उलटपक्षीं चिडणाऱ्या लोकांत पर्वते भटजी, भालाकार भोपटकर, लेलेशास्त्री, ह. भ. प. पांगारकर इत्यादि मंडळी होती. ‘ परदुःख शीतळ ’ या न्यायाला अनुसरून पोलिस अकौंटंट खरे हे परस्पर दुसऱ्यांच्या नकलांवर खूष असत भोंडयांचा हा गुण म्हणजे ईश्वरी अंश आहे असें ते म्हणत. पण जेव्हां आपलीच नक्कल केल्याचें त्यांना कळलें तेव्हां त्यांनीं भोंडयांना गांठून त्यांची चांगलीच हजेरी घेतली. तणतणून शिव्याशापहि दिले. पण भोंडे असे खमंग आणि खवचट कीं, त्यांनीं पहिल्याबरोबर याहि प्रसंगाची नक्कल तंतोतंत वठवली. त्यामुळें तो बिचारा गृहस्थ अधिकच हास्यास्पद झाला ! कुटून या भोंडयाला आणखी खाद्य पुरविलें असें ,त्याला झालें असेल. त्याचप्रमाणें प्रभाकरपंत पर्वते भटजींची अवस्था झाली. ती नक्कल

उत्कृष्ट विनोदाचा एक नमुना म्हणून प्रसिद्ध आहे. कै. गणेशशास्त्री लेले यांनाहि नक्कल केलेली सहन होत नसे. भालाकार भोपटकरांनीं तर भोंड्यांना जाहीर नोटीसच दिली होती !

## हेतूकडे पहा

या चिडणाऱ्या मंडळींनीं नकलांचें प्रयोजन व भोंड्यांचा हेतु समजून घेतला असता तर अधिक बरें झालें असतें. कोणतेंहि कृत्य रास्त किंवा गैर ठरवितांना हेतु तपासावा लागतो. हेतूचें महत्त्व सागताना योगवासिष्ठांत एक सरस दृष्टान्त दिला आहे.

येनैवाऽलिंगिता कांता तेनैवाऽलिंगिता सुता ।

एखादा गृहस्थ आपल्या कांतेला आलिंगन देतो आणि कन्येलाहि देतो. दोन्ही आलिंगनेंच. पण दोहोंत किती फरक! कारण दोहोंतली मनोभूमिका भिन्न, हेतु भिन्न. भोंड्यांचा उद्देश टवाळी करण्याचा किंवा उपहास करण्याचा नसतो. व्यंगचित्रांमधून जी खुमारी व खोच आढळते, तशा प्रकारची लज्जत त्यांच्या कांहीं नकलात दिसते. एवढेंच फार तर म्हणतां येईल. ज्या प्रसिद्ध लोकाच्या किंवा राजकीय पुढाऱ्यांच्या नकला ते करतात, त्यांच्याबद्दल त्यांच्या मनांत निरतिशय पूज्यभाव आहे, ही गोष्ट त्यांच्या परिचितांना चांगली ठाऊक आहे. त्याशिवाय देखील ज्या इतरांना ते आपल्या कलेची 'शिकार' बनवितात, त्यांची कुचाळी अगर निंदा करावी, असें त्यांच्या मनांतहि नसेल. उलटपक्षीं आपल्याला कला म्हणून हीं सोंगें करावीं लागतात, याचा कुणाला राग तर येणार नाहीं ना किंवा कुणाचें मन तर दुखावलें जाणार नाहीं ना, अशी धास्ती त्याच्या मनांत सदैव वागत असते. आपल्या हातून कुणाचें मन मोडूं नये, ही त्याची चिंता असते. अशा विनीत वृत्तीनें ते वागतात. आणि नेहमीं लीनतेनें आपल्याकडे कमीपणा घेऊन मऊ व मिष्ठास बोलतात. थोडीशी चेष्टा किंवा गंमत उडविण्याइतका मिस्किलपणा त्यांच्यांत नाहीं, असें नाहीं. पण भोंडे हा टवाळखोर गृहस्थ आहे आणि सरसकट कुचेष्टा करणें हाच त्यांच्या नकलांचा उद्देश आहे असें म्हणणें म्हणजे अत्यंत चुकीचा विपर्यास होय.

या ठिकाणीं अनुकरण आणि विडंबन यांतील फरक ध्यानांत आणला पाहिजे. भोंडे अनुकरण करतात, विडंबन करीत नाहींत. विडंबन खालच्या

पायरीवरचें, अनुकरण वरच्या दर्जाचें. विडंबनाला निंदेची बैठक असते. अनुकरण कलेच्या सिंहासनावर बसलेलें आहे. विडंबनाचा हेतु कुत्सित, टर उडविण्याचा. अनुकरणाचा उद्देश शुद्ध, सात्त्विक, कलाजन्य आनंद देण्याचा. विडंबनकाराचें साध्य अनादर उत्पन्न करण्याचें. उलट अनुकरण करणारा प्रेमादर बाळगूनहि त्या व्यक्तीची नक्कल करूं शकतो. हा दोहोंतला फरक न समजल्यामुळें पुष्कळदां भोंडयांबद्दल गैरसमज उत्पन्न होतो. या कारणामुळें भोंडयांची नालस्ती व अवहेलना पुष्कळ झाली. पण त्यामुळें खेद न मानतां अथवा खचून न जातां भोंडयांनीं आपला 'धंदा' चालू ठेवला म्हणून अखेर त्यांचा जय झाला.

### कुचराई नाहीं

भोंडे कलाकार या दृष्टीनें जितके निरलस, तितके निगर्वी आहेत. मी कोणी बडा बलावंत आहें, असा मिजाशीचा अथवा अहंमन्यतेचा विचार त्यांच्या मनाला कधीं स्पर्शहि करून गेला नसेल. लीनता, आपली कला लखलखीत व अद्ययावत् राखण्याची दक्षता, नवीन नवीन गोष्टी शिकण्याची लालसा आणि प्रयत्नांची पराकाष्ठा हें श्रेष्ठ कलावंताला अत्यावश्यक असें गुण-चतुष्टय भोंडयांच्या ठिकाणीं उत्कटत्वानें वास करीत आहे कार्यक्रम कसाहि व कोठेंहि असला तरी नकला करतांना ते काडीइतकीहि कसूर करीत नाहींत. भले मग मोबदला मिळालेला असो वा नसो. हा त्यांचा गुणधर्म व कर्तव्यबुद्धि आदर्श म्हणून डोळ्यांपुढें ठेवण्यासारखी आहे. ते आपला कार्यक्रम नेहमींच मन लावून करतात. कांहींतरी करून वेळ मारून न्यावयाची किंवा सदर भरावयाचें हें त्यांच्या स्वभावांतच नाहीं. भोंडयांनीं आतांपर्यंत कधींच कुचराई केलेली नाहीं ते पान्हा चोरणाऱ्या कलावंतांच्या जातींतले नाहींत. ते कलेशीं इमान राखलेले कलेचे आजीव एकनिष्ठ व सच्चे उपासक आहेत. रंगदेवता त्यांना प्रसन्न असते याचें हें एक प्रमुख कारण होय.

'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।'

हें त्यांच्या कलाजीवनांतल्या कर्मयोगाचें सूत्र आहे. आपल्याजवळ आहे तेवढें कलेचें कसब पुढें मांडून प्रेक्षकांना शक्य तेवढा कलानंद अर्पण करणें हें भोंडयांचें ब्रीद आहे. या बाबतींत भोंडयांची तुलना बालगंधर्वांशीं करतां

येईल. प्रेक्षकांना संतुष्ट व तृप्त करण्याकरितांच या दोघांची तळमळ असते. रसिकांच्या पदरांत पुरें माप टाकण्याचा भोंडयांचा आटोकाट प्रयत्न असतो.

## बुद्धीला गुदगुल्या

भोंडयांच्या नकला पाहण्याकारितां माणूस प्रथम येतो तो अर्थात् मनोरंजनाकरितां. पण पहातांना तो जसजसा रंगत जातो तसतसा त्याला विविध प्रकारच्या ज्ञानाचा व अनुभतीचा लाभ होत जातो, त्याचें विचाराचें व अनुभवाचें क्षेत्र व्यापक होतें व त्याला जीवनाचे विविध पैलू आपोआप दिसूं लागतात. शरीराचें व मनाचें आरोग्य वाढविणारें हें कलेचें रसायन अद्‌भुत आहे, असें कोण म्हणणार नाहीं? बौद्धिक आनंद हा सर्वांत सात्त्विक व श्रेष्ठ मानतात गीतेंत इंद्रियजन्य सुखा-पेक्षां अतींद्रिय व 'आत्मबुद्धिप्रसादज' अशा तऱ्हेच्या सुखाचा महिमा गाइला आहे, तो उगीच नव्हे. अशा तऱ्हेचा बौद्धिक आनंद आणि तोहि हुकुमी निर्माण करणाऱ्या भोंडयांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच होणार आहे. वेडेवांकडे अंगविक्षेप करून किंवा माकडचेष्टांनीं हंसविणें सोपें आहे. भोंडे बुद्धीला खाद्य पुरवितात. मार्मिक कोट्या व भेदक अनुकरण हें त्यांचें भांडवल आहे. फाजील अभिनय नव्हे, तर उलट माफक व समर्पक अभिनय हा त्यांच्या कलेचा व विनोदनिर्मितीचा आत्मा आहे. त्यांच्या नकला बघतांना गंभीर व कष्टी माणसांच्या चेहऱ्यावर देखील हास्य फुलतें व प्रसन्नता येते, हें त्यांच्या कलेचें मोठ्यांतलें मोठें शिफारसपत्र होय.

येथवर भोंडयांच्या कलेचे पैलू व पापुद्रे शक्य तोंवर उलगडले. त्यामुळें लोकरंजन व लोकप्रबोधन हीं दोन्ही कार्यें कशीं लीलेनें साधतात हें सहज कळून येईल. 'जांवई न्हाला, मळाहि शिंपला' या म्हणीप्रमाणें भोंडयांच्या कलेचा दुहेरी फायदा पदरांत पडतो. नीतीचे कंटाळवाणे वस्तुपाठ न देतां तोच आशय हृद्य व हृदयस्पर्शी पद्धतीनें गळीं उतरविणें, हें भोंडयांच्या नकलांचें वैशिष्ट्य. रंजन व बोध या दोन महान् तत्त्वांचें मधुर मिश्रण असलेलें भोंडयांच्या कलेचें रसायन समाजप्रकृतीला अत्यंत हितावह व कल्याणप्रद आहे, याविषयीं दुमत होण्याचें कारण नाहीं.

* * *

# निवडक नकलांचा परिचय

एकेरी नकला व संवादात्मक किंवा ‘ बहुभूमिक ’ नकला असे भोंड्यांच्या नकलांचे दोन मुख्य भाग पडतील. नकलेकरितां म्हणून भोंडे जो मजकूर निवडतात तोहि त्या त्या व्यक्तीच्या स्वभावावर व वैशिष्ट्यांवर प्रकाश पाडणारा असतो. याकरितां पुढें त्यांतील एखाददुसरें निवडक वाक्य नमुना म्हणून उद्धृत केलें आहे. रसिकांनीं या शितावरून भाताची परीक्षा करावी.

**लो. टिळक**

वेष हुबेहुब. अंगरखा, पगडी व उपरणें घेण्याची तऱ्हा तशीच. कांठी टेकीत चालणें. वार्धक्यामुळें किंचित् शरीरकंप. रागीट व उग्र मुद्रा. दृष्टि अधू झालेली असूनहि चष्मा न वापरण्याच्या आग्रहामुळें डोळे मधून मधून बारीक करण्याची जडलेली लकब. यामुळें भोंडे आंतून बाहेर चालत येतांनाच टिळकांचा भास होऊं लागतो. भाषणांतील निर्भयता व खडखडीत-पणा. खंजीरवजा छोटीं छोटीं व ठसठशीत वाक्यें. स्पष्ट उच्चार व अर्थानुसार शब्दावर जोर देण्याची लकब. सोपे अर्थगर्भ शब्द. सहज पटतील अशा समर्पक उपमा व दृष्टान्त. स्वमतसमर्थनार्थ मधून मधून बरोबर लागू पडतील अशा संस्कृत श्लोकांचा उपयोग करण्याची टिळकांची सुप्रसिद्ध हातोटी.

> उद्यमेन हि सिद्ध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
> न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥

व्याख्यानांतील स्फूर्तिदायकत्व व परिणामकारकता.

“...घातलेला हार कदाचित् कोमेजून जाईल, मानपत्र आज ना उद्यां फाटून जाईल, परंतु स्वराज्यप्राप्तीची इच्छा जर का नष्ट होईल तर राष्ट्रावर महान् संकट आलं असं मी समजेन...मी म्हातारा झालों आहें, मरण हें शेवटचें साध्य आहे परंतु स्वराज्यप्राप्तीची इच्छा म्हणून जी कांहीं आहे ती म्हातारी होत नसते—कधीं मरत नसते.”

**भालाकार भोपटकर**

सोंग अगदीं जसेंच्या तसें. वांकडी गोल टोपी. तिरकी मान. रेशीमकांठी उपरणें व तें घेण्याची व सांवरण्याची पद्धत. उलटी छत्री घेऊन मान खालीं

झुकवून चालणें. भाषण करतांना मधून मधून पाणी पिणें. विनोदी कोटी केल्यानंतर प्रेक्षकांकडे विशिष्ट तऱ्हेनें पहाण्याची पद्धत. प्रक्षुब्ध झाल्यावर खालचा जाड ओठ बाहेर काढून तो चाळविण्याची लकब.

" हिंदु-मुसलमानांची एकी व्हायची कशी? मला कांहीं समजत नाहीं! त्यांना पाहिजे कोंबडी, आम्हांला पाहिजे काकडी. त्यांना पाहिजेत होले, तर आम्हांला पाहिजेत सोले!......... चरखा फिरवण्यापेक्षां खारका कां खात नाहीं?"..........इ.

## शिवरामपंत परांजपे

धीरगंभीरता. मुद्रा गंभीर. व्याख्यानाला थंडपणानें व आत्मविश्वासानें प्रारंभ. शुद्ध, स्पष्ट व सावकाश उच्चार करण्याची लकब. मधूनच प्रश्न विचारण्याची पद्धत. माफक अभिनय. उजवा बाहु उभारणें व तर्जनीवर तर्जनी ठेवून मुद्द्यावरचा भर व्यक्त करणें.

" मंगलमूर्ति काय सांगत आहे? आपला उजवा हात करून तो तुम्हांला काय इशारा देत आहे?... हा मैलाचा दगड आहे. येथें दोन रस्ते फुटलेले आहेत... एक रस्ता म. गांधींच्या असहकारितेच्या धर्मशाळेकडे जात आहे, तर दुसरा कौन्सिल हॉलकडे जात आहे... दोन्ही रस्ते पुढेंमागें स्वराज्याच्या मंदिराकडेच जाणारे आहेत. तथापि म. गांधींचा रस्ता जवळचा, खात्रीचा पण कष्टाचा आहे, अवघड आहे. कौन्सिलचा रस्ता ऐषआरामाचा आहे, परंतु लांबचा आहे– बिनखात्रीचा आहे!........."

## रँ. परांजपे

ठराविक वेषभूषा—काळा कोट, पगडी, गळ्याभोंवतीं उपरणें. डाव्या हातानें उपरण्याचें टोक मागें उडवीत लगबगीनें चालणें. बोलतांना भुवया उडविणें. कपाळाच्या आंठ्या. रेंकत उच्चार व आवाजांतील चढउतार. वाक्याचा शेवट पाण्याचा प्रवाह एखाद्या कड्यावरून कोसळल्याप्रमाणें.

To the Secretary of the Class—

What does this noise mean? Nonsense! Is it a bazaar? Are you not ashamed to take advantage of my mildness in

this way ?..( after some time ) At any rate I am sorry, I am the last man to injure anybody's feelings. I was unable to fathom your sensitive mentality. However let everything be forgotten and forgiven.

**बॅ. सावरकर**

पांढरा कोट, काळी गोल टोपी, कानाच्या खालपर्यंत कट्स्, हातांतली कायमची छत्री. बारीक आवाज व मृदु लवचिक हेल. वारंवार 'च' या अव्ययाचा वापर व त्यावर दिलेला जोर. उदाहरणार्थ-

'हिंदु म्हणूनच जगेन आणि हिंदु म्हणूनच मरेन.'

'आणि' च्या ऐवजीं 'नि' चा वापर. हिंदुत्वाच्या प्रचारावर भर. युक्तिवाद करण्याची शैली, आवेश, गंभीर व करारी मुद्रा.

**ह. भ. प. पांगारकर**

डोकीस कसा तरी गुंडाळलेला रुमाल, अर्धवट स्वच्छ अंगरखा, कांखे-खालून उपरणें, उभ्या गंधाचें बोट ओढलेलें-एकूण गबाळग्रंथी अवतार. बोलतांना खांदे उडविणें, उपरणें सांवरणें, विशेषतः आर्या, अभंग म्हणते-वेळचे हेल, आवाजांतील चढउतार, भक्तिपर वाङ्मयाबद्दल व मोरोपंतां-विषयीं निःसीम प्रेम. भाषणांत मधून सद्गदित होणें, गहिंवर येणें, क्वचित् डोळ्यांत अश्रु उभे रहाणें.

नित्य तुम्हीं प्रभुपाशीं पेढे बर्फी नवा खवा खावा ।
परि म्यां एके दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा ॥

ही मोरोपंतांची आर्या म्हणतांना पांगारकरांचीं वैशिष्टयें चांगलीं ध्यानांत येतात. विनय व लीनतेच्या आत्मप्रौढीची झांक. आत्मगौरवाची हौस.

**जम्नादास मेथा**

पांढरा लांब कोट, तिरकी बसविलेली पांढरी टोपी, चष्मा, हातांतली काठी. शब्दांवर जोर देण्याची लकब. इंग्रजीचे गांवठी उच्चार. भाषणचातुर्य व बोलण्यांतली सफाई. विनोद व गांभीर्य यांचें सुंदर मिश्रण. विनोद केल्यावर प्रेक्षकांकडे अपेक्षेनें पहाण्याची विशिष्ट तऱ्हा. मधून स्तब्ध होऊन स्मितिकल

स्मितहास्य. खालचा ओठ थोडा पुढें काढणें. विशेष विधान केल्यावर किंचित् वाकून दोन्ही हात दोन्ही बाजूंना कंबरेवर ठेवून अर्थपूर्ण मुद्रेनें श्रोतृवर्गाकडे पहाणें. डावा हात वापरून अभिनय. डाव्या हाताची तर्जनी उजव्या हाताच्या तळ्यावर आपटून मुद्द्याची गोष्ट व्यक्त करणें. विनोदी कोटयांनंतर गंभीर भागाकडे वळतांना मुद्रेंतला व आवाजांतला बदल.

Men are divided into two classes—
Congressmen and Gentlemen !

**लोकनायक अणे**

लांब कोट, तांबडी पगडी, गळ्याभोंवतीं उपरणें, आडवें गंध, मिशा, काठी. मागें रेलून बसण्याची व हात कोचावर पसरून बसण्याची लकब. ओबडधोबड पण ठसठशीत बोलण्याची पद्धत. पण भाषणांतील मजकूर मुद्देसूद व मार्मिक. व्याख्यानाच्या वेळीं हातवारे. संस्कृतचा व संस्कृतीचा अभिमान. अस्पष्ट उच्चार व घोगरा आवाज. भांड्यांत खडे भरून वाजविल्या-प्रमाणें बोलण्याचा आवाज.

" मंडनमिश्राचं घर कोणतं? तर ज्या घरांत मैनाकोकिळांचा ब्रह्मज्ञाना-संबंधीं संस्कृतांत वादविवाद चालतो तें. त्याप्रमाणं मला कुणी तात्यासाहेबांच्या ( केळकरांच्या ) घराचा पत्ता विचारला तर मी असं सांगेन कीं, ज्या घरांत वाङ्मयाची चर्चा चालते तें तात्यासाहेबांचें घर."

**वृद्ध सासू**

मागच्या पिढींतल्या जुन्या गं. भा. वृद्ध बायकांप्रमाणें हुबेहूब बसण्याची पद्धत. प्रारंभींच ही बैठक पहातांच हंसूं लोटतें. प्रेक्षक चीत होतो. मुलगा नसलेल्या या वृद्ध बाईचें एकुलत्या एक जांवयाचें नसतें कोडकौतुक सुरू होतें. जांवयाच्या दोषांना गुणांचें स्वरूप देऊन ते आळवितांना कांहींसा भाबडेपणा आणि कांहीं लबाडी यांचें होणारें मिश्रण अत्यंत चटकदार आणि हास्यकारक आहे. मनुष्यस्वभाव चितारण्याची कला या नकलेंत परमावधीला पोंचली आहे. ही नक्कल सर्वांना, विशेषेंकरून स्त्रीवर्गाला अधिक पटते व आवडते. हंसून हंसून मुरकुंडी वळते. दर वाक्याच्या शेवटीं ' भोंडे ' या संबोधनात्मक शब्दाचा वापर, मधेंमधें निक्षून बोलतांना दोन बोटांच्या चिमटीनें जमिनीवर

रेघ ओढल्यासारखें करणें, जांवयाचें नांव न घेणें, नखांशीं चाळा, उसासे टाकणें, मधूनच रडणेंकढणें, पुन्हां मुद्द्यावर येणें इत्यादि अनेक सूक्ष्म छटा फारच मार्मिक व मौजेच्या आहेत. विशेषतः जांवयाला द्यायच्या पगडींतल्या कलाबतूऐवजीं ' कलांबूत ' हा शब्दप्रयोग, इस्टेटच्या ऐवजीं ' विष्टेंट', जांवई नापास कसा झाला यावर सारवासारव करण्याकरितां ' याचा नंबर त्याला अन् त्याचा नंबर त्याला ' ही लढविलेली शक्कल, जांवयाला मिळालेले ' शंभरापैकीं सवाशें-दीडशें-सवाशें-दीडशें मार्क ' इत्यादि स्थळें तर अत्यंत बहारीचीं आहेत– हास्याचा प्रचंड स्फोट करणारीं आहेत.

हुतुस काय अन् खुतुस काय, करूं नये अन् केलं भोंडे, अन् ऐशीं तिथें पंचायशीं भोंडे, तुमचं माझं बोलणं भोंडे.

सासूबाई :— पण भोंडे, नैवेद्याच्या पानावर एक करंजी वाढली. पण शेवटपर्यंत ती तश्शी !

भोंडे :— कां बरं ?

बाई :— गोड आवडत नाहीं ना ! ऐकतां काय मग ?

काय सांगूं भोंडे ? नाहीं त्याला घटकाभर आई भोंडे, नाहीं घटकाभर त्याला बाप भोंडे, अन् त्या जर लेकराचं कौतुक आपण केलं नाहीं, तर दुसरं कोण करणार आहे बरं भोंडे ? खरं सांगा भोंडे.

### आबा कुलकर्णी मास्तर

मोठ्या आवाजांत हेल काढून ठसक्यांनीं बोलण्याची पद्धत. ऐटदार पोषाख-ग्राम्य व अपशब्द बोलणें अंगवळणीं पडलेलें. शिव्या देण्यांत पटाईत.

" अरे कारट्यांनो ! तुम्ही बोलून चालून चवथींतलीं पोरं अन् मी तर यःकश्चित् तिसरींतला मास्तर !...... माझ्या वर्गातलं वाटेल तें कारटं घेऊन या अन् त्या गद्ध्यानं जर उत्तर बरोबर नाहीं दिलं, तर ××× नो, फार तर काय माझी अर्धी मिशी कापून देईन ! "

### संवादात्मक नकला

आतां बहुभूमिक नकलांतील संवादांचा अल्प परिचय देऊन हा विषय संपवूं. या संवादात्मक नकलांमध्यें एक छोटेंसें कथानक किंवा प्रसंग असतो. एवढेंच नव्हे तर नाटकाप्रमाणें किंवा लघुकथेप्रमाणें त्यांतले आरंभ, मध्य व

शेवट हेहि चमत्कृतिपूर्ण व कलात्मक असतात. त्यांत वेगवेगळ्या पांचसहा व्यक्तींचें एकमेकांशीं संभाषण किंवा संघर्ष चित्रित केलेला असतो. नकले-बरोबरच त्यांतील कथासूत्राचा विकास होत जातो व त्या त्या व्यक्तींचे स्वभाव साम्य-विरोधांच्या छायाप्रकाशानें ठसठशीतपणानें दिसूं लागतात. नाटक पहाण्यांतली सर्व मौज व आनंद या प्रकारच्या नकलांतून अनुभवायला मिळतो. कारण घडलेला खरा प्रसंग अथवा घटना निवडून तिच्याभोंवतीं संवादाची गुंफण केलेली असते.

## भोंडे व युरोपिअन नर्स

जुन्या काळांतील गोष्ट.

एकदां भोंडे प्लेग-रोग्याबाबत चौकशी करण्याकरितां पुण्यांतील प्लेग-हॉस्पिटलमध्यें गेले होते. तिथें युरोपिअन नर्स होती. तिच्याशीं गांठ पडली व बोलणें झालें. पण मौज अशी कीं, तिचें इंग्रजी भोंड्यांना समजेना आणि भोंड्यांचें इंग्रजी तिला समजेना ! अशा रीतीनें हें दोघांचें संभाषण पंधरा मिनिटें चाललें होतें ! कुणाचा कुणाला मेळ नाहीं म्हणतात तें हें असें. हा संवाद—अथवा खरें पाहिलें असतां संवादाचा अभाव—भोंडे आपल्या नकलेंत फारच उत्कृष्टपणें वठावितात. यांतील प्रसंगनिष्ठ विनोद ( Humour of the situation ) फार बहारीचा आहे. युरोपिअन नर्सच्या आवाजाचें व टोनचें अनुकरण फार अवघड आहे. त्यामुळें भोंडयांच्या घशाला त्रास होतो—ताण पडतो. या नकलेंतील संवादाला विसंवाद म्हणणें अधिक योग्य ठरेल !

## एक शिक्षक व दोन विद्यार्थी

ही कै. लेलेशास्त्री व भिडे आणि वैशंपायन या दोन विद्यार्थ्यांमधील संभाषण-प्रसंगाची नक्कल आहे. या तिघांचे खालील स्वभावविशेष दिसून येतात.

[ लेलेशास्त्री :—संस्कृतज्ञ व संस्कृतप्रेमी, काव्यरसिक, स्वभाव कडक, चोख व सरळ.

भिडे :—कमालीचा बावळट, गबाळा, लाजाळू.

वैशंपायन :—खमंग व नाठाळ विद्यार्थी. पक्का बेरड व अतिशय डांबरट.]

लेलेशास्त्री :—वर्गांत नखं खायचीं नाहींत.

वैशंपायन :—राहिलं. पण माझं म्हणणं एवढंच आहे कीं, नखं आहेत तीं माझींच आहेत...

लेलेशास्त्री :— Hold up your hand ( छडी मारतात. )

वैशंपायन :—( छडी खाऊन ) असंगाशीं संग अन् प्राणाशीं गांठ !

लेलेशास्त्री :—कायहो वैशंपायन ! कुणाला उद्देशून बोललां तुम्ही हें ?

वैशंपायन :—बोलतांना मी बोललों भिड्याला. पण चोराच्या मनांत चांदणं, खाई त्याला खवखवे, त्याला मी काय करणार ?

* * *

लेलेशास्त्री :—अहो भिडे, तुम्ही सारखी जीभ काय बाहेर काढतां ? मला वेडावून दाखवतां का काय ?—जीभ बाहेर काढूं नका.

भिडे :—ती माझी संवय आहे सर ! डॉक्टरला लहानपणींच दाखवली होती डॉक्टर म्हणाला कीं, जीभ जरी कापली तरी बाहेर ही यायचीच !

## ऑफिसांतील संवाद

यांत मिलटिरी अकौंट्स्मधील एकूण सहा व्यक्ति आहेत.

१ मि. चेंबूरकर :— कारकून. कुरूप व घाबरट. कामांत नालायक. नेहमीं चुका करणारा. पायां पडून कशीबशी नोकरी टिकविण्याची धडपड करणारा.

'Voucher was sent by Mr. Athawale, and I come tomorrow' या त्याच्या वाक्यानें हंशा पिकतो.

२ मि. पटवर्धन :—सुपरिंटेंडेंट. करडा ऑफिसर. कुणाची गय न करणारा. हाताखालच्या लोकांवर दरारा व हुकमत गाजवणारा कडक शिस्तीचा.

( To Chemburkar ) Once you say credit, again you say debit. But that is a turning point between life and death !

३ मुर्गेशम् पिल्ले :—मद्रासी सुपरव्हायझर. पक्का बनेल व रगेल. टरेंबाज व उखडेल.

Today I may die. But tomorrow you must die ! In the kingdom of God there is no distinction between Patwardhan and Pillay...perhaps there I may be a controller and you may be a peon ! Who knows ?..

४ चतर्जी :—बंगाली सुपरव्हायझर. अंतःकरणाचा सरळ व प्रेमळ, पण तिरसट.

Don't go! Supposing you die tomorrow, can Mr. Patwardhan bring you from Heaven ?

५ अंबु शिपाई :—तिरळा, वेंधळा व अर्धवट.

६ मि. आठवले :—कारकून. कामांत लक्ष नसलेला, कामांत बेताचाच, चुकारतट्टू. एकसारखी तपकीर ओढणारा.

'Excuse me this time. Next time I shall be careful.' that was the only writing work, I used to do.

भोंड्यांची कोणती तरी एकच नक्कल पहायची असें असेल तर ही नक्कल निवडतां येईल. यांत त्यांचें सर्व कौशल्य प्रकट होतें. संवाद खटकेबाज, विनोदी व बहारीचा आहे.

## भोंड्यांच्या लोकप्रियतेचें रहस्य

श्रीकृष्णानें अर्जुनाला विश्वाची कल्पना यावी म्हणून आपलें तोंड उघडून एका क्षणांत विश्वरूपदर्शन घडविलें. या 'गोपाळा'चीहि लीला तशाच स्वरूपाची आहे. श्री. भोंडे प्रेक्षकवर्गाला आपलें तोंड उघडून दोन तासांत समाजदर्शन घडवितात. तुमचें-आमचें तुम्हां-आम्हांला न दिसणारें रूप आणि चरित्र भोंडे त्यांच्या आरशांत आपल्याला दाखवितात. त्यामुळें तुम्ही-आम्ही कसे आहोंत, याची आपल्याला जाणीव होते. आणि तीहि हंसत-खेळत कळत-नकळत. हेंच भोंड्यांच्या लोकप्रियतेचें रहस्य होय. त्यांच्या कलेनें मनोरंजकता आणि मनोबोध यांचें लग्न लावलें आहे. या दोन्ही गोष्टी कलाविलासाला आणि समाजहिताला देखील पोषक व आवश्यक अशा आहेत. त्यांचा हृदयंगम संगम या अजब कलावंताच्या कलेंत आपल्याला आढळतो. या संगमांत निमज्जन करणारा कोणता रसिक पुनीत आणि हर्षपुलकित होणार नाहीं ?

## कलापूजन हेंच योग-साधन

योग हें परमसुखाचें साधन असा त्याचा महिमा वर्णिलेला आहे. भर्तृहरीचा एक मार्मिक श्लोक आहे :

यद्यस्त्येवं कुरु भवरसास्वादने लंपटत्वम् ।
नोचेत् चेतः प्रविश सहसा निर्विकल्पे समाधौ ॥

भरगच्च ऐश्वर्य आणि अच्छिद्र वैभव उपभोगायला मिळत असेल तर खुशाल त्यांत रममाण हो. पण तसें नसेल तर कां या दुःखमय संसारांतले हाल भोगत बसतोस ? तडक हिमालयाचा रस्ता धर. ईशचिंतनाच्या, निर्विकल्प समाधीच्या आनंदांत निमग्न हो. परंतु प्रश्न असा आहे कीं, ही योगाभ्यासाची बिकट वाट सामान्य जन कशी वहिवाटणार ? आणि त्यांना त्यांतला परमोच्च आनंद कसा गवसणार ? म्हणूनच कलास्वादाची सरळ व सुंदर सोय सामान्यां-करितां सांगितलेली आहे.

Art is common man's yoga कलास्वादाचा आनंद ब्रह्मास्वाद-सहोदरच आहे. त्याच जातीचा आहे. तोच आनंदाचा साक्षात्कार त्यांतहि आहे. शिवाय त्या एकाग्रतेचें, तल्लीनतेचें सुख जितकें खुद्द कलाकाराच्या तितकेंच रसिकाच्या आटोक्यांतलें आहे. ज्यांना ती भरारी मारतां येत नसेल त्यांनीं मुंगी होऊन ही कलेची साखर खावी. भोंड्यांनीं आपल्या कलेला दैवत मानलें आहे. तिची पूजा-अर्चा ही त्यांची तपश्चर्या आणि तिची आराधना ही त्यांची निर्विकल्प समाधि !

विशेषतः ललित कलेंतली गोडी अवीट व अनुपमेय आहे. त्यांतला आनंद मोठा आहे. भोंडे आपल्या कलेच्या कैफांत दंग असतात. त्यावरच ते जगले आहेत. त्यांच्या जीवनांत कलेचा आनंद भरून राहिला आहे. एरवीं त्यांना कष्टप्रद व कंटाळवाणें जिणें इतक्या उमेदीनें व उल्हासानें कंठणें अशक्य झालें असतें. कलोपासना हाच त्यांचा योग. तोच त्यांच्या जीवनाचा आरंभ आणि शेवट. त्याचा मध्यबिंदुहि पण तोच.

## कलेला पुनर्जन्म नाहीं !

बुद्धिमत्ता आणि ज्ञान यांच्यापेक्षांहि प्रतिभा व कला या वस्तु दुर्मिळ आहेत. बुद्धीला पुनर्जन्म आहे – कलेला नाहीं ! कलावंताची कला त्याच्या-बरोबर गेली कीं गेलीच. तिचें पुनरागमन कठीण. कारण कलेची देणगी खास वैयक्तिक असते. जेनुं काम तेनुं थाय. रानडे, आगरकर, टिळक, कर्वे, रँ. परांजपे पुन्हां होतील. पण गणपतराव जोशी, बालगंधर्व, भास्करबुवा

बखले किंवा गोपाळराव भोंडे पुन्हा दिसावयाचे नाहींत. या चौघांना ज्यांनीं पाहिलें नाहीं, त्यांनीं त्या त्या कलांचा प्रकर्ष पाहिला नाहीं. या प्रासादिक कलावंतांनीं ती ती कला कळसाला चढविली. तें दर्शन ज्यांना झालें ते खचित भाग्यवान्. या चारी कलावंतांनीं आपापल्या काळांत लोकांना वेड लावलें होतें. जनमनाला वश करून घ्यावें कलेनेंच.तें सामर्थ्य बुद्धीच्या आटोक्याबाहेरचें आहे.

भोंड्यांच्या मागून नकला करणारे पुष्कळ निघाले. पण त्यांचा थाट व सफाई कोणाला जमली नाहीं. जेनुं काम तेनुं थाय. भोंड्यांसारखे भोंडेच. तासन् तास गुंगत ठेवणारा जादूगार, हास्य-वीर-करुण इत्यादि अनेक रसांची हुकमी निर्मिति करणारा कलाकार व विविध समाजचित्रें सारख्याच कौशल्यानें रंगविणारा चित्रकार म्हणजे भोंडेच. अशा या अस्सल नकला-काराला ‘ झाले बहु होतिल बहु आहेतहि बहु– परंतु यासम हा ’ असें कां म्हणूं नये ? नकलाकारांच्या मेळाव्यांत ‘ मूर्ध्नि तिष्ठति ’ अशी त्यांची योग्यता आहे. मात्र हें जाणून एक गोष्ट अवश्य व्हावयाला हवी. भोंडयांचीं अद्भुत अनुकरणें ध्वनिमुद्रिका व बोलपटांच्या सहाय्यानें शिल्लक ठेवलीं पाहिजेत. सांठवून ठेवलीं पाहिजेत. भोंडयांच्याबरोबर नाहींशी होणारी त्यांची कला या युक्तीनें पकडून ठेवली पाहिजे. त्यामुळें पूर्वींच्या पिढींतले प्रसिद्ध पुरुष पुढच्या पिढ्यांना पहायला-ऐकायला मिळतील. वसंतऋतु संपला कीं आंबेहि संपतात. पण त्यांचा मुरंबा घालून बरणींत भरून ठेवला, म्हणजे त्यांचा आस्वाद वर्षभर घेतां येत नाहीं काय ?

### कलेच्या परिसानें जीवनाचें सोनें झालें

काळ गुणीजनांना दीर्घायुष्य देण्याच्या कामांत कृपण आहे. त्या बाबतींतली त्याची वक्रता प्रसिद्ध आहे. पण या नियमाला भोंडे अपवाद ठरलेले आहेत. कराल काळालाहि जणूं हें कलेचें कारंजें कायम पहावेंसें वाटतें. त्यालाहि हा हास्यरसाचा धबाधबा चालू ठेवण्याचा मोह आंवरत नाहीं. तथापि उतार-वयाचा परिणाम व्हावयाचा तो झाल्याशिवाय कसा राहील ? भोंड्यांनीं आपल्या जीवनाचीं पंचाहत्तर व कलाजीवनाचीं साठ वर्षें पूर्ण केलीं आहेत.

कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली ।
पुरःसर गदांसवें झगडतां तनु भागली ॥

अशी स्थिति होऊनहि दहापांच वर्षें वर लोटलीं आहेत. शरीर थकलें आहे. अवयव ताब्यांत रहायला कुरकुर करूं लागले आहेत. पण अजूनहि कलास्वादाच्या अमृतसंजीवनीच्या घुटक्यांवर त्यांचा शरीरव्यापार चालूच आहे. त्यांनीं कलेला जगविलें आहे. पण उलट कलाहि त्यांना जगवीत आहे !

शहात्तराव्या वर्षी तृप्तता, कृतकृत्यता वाटावी अशाच रीतीनें भोंड्यांनीं आपलीं पंचाहत्तर वर्षे खर्चीं घातलीं आहेत. आज मागें वळून पाहिलें तर त्यांना धन्यता कां वाटूं नये? स्वतःच्या प्रदीर्घ आयुष्याचा आढावा काढतांना जर त्यांच्या तोंडांतून खालील स्वगत उद्‍गार निघाले तर ते अवास्तव ठरतील काय? "माझ्या जन्माचें सार्थक झालें. मी एक सामान्य बुद्धीचा, अर्धवट शिक्षण मिळालेला यःकश्चित् मनुष्य. पण माझ्यांतल्या दैवी देणगीची मीं आबाळ केली नाहीं. त्या ईश्वरी अंशाला-कलागुणालाच मीं दैवत मानलें. त्याची अखंड पूजा केली. मी त्या कलेला जागलों म्हणूनच जगलों. पण मीं तिलाहि जगविलें आहे. त्या कलेच्या पुण्याईच्या जोरावर मीं शेंकडोंना, हजारोंना आनंद दिला आहे. त्या आनंदांतच मीं आनंद मानला मी चंदना-प्रमाणें झिजलों आहें. हेंच माझें कर्तृत्व, हेंच माझें बक्षीस आणि हेंच माझें स्मारक. कलेच्या परिसानें माझ्या जीवनाचें सोनें झालें आहे. आतां माझें उरलेलें आयुष्य बारा महिने असो नाहीं तर बारा वर्षे असो, मला त्याची फिकीर नाहीं! –"

भोंड्यांच्या कलेची स्मृति व कीर्ति चिरायु आहे. उदबत्ती विझत आली तरी तिचा सुगंध सगळीकडे दरवळलेला रहात नाहीं काय?

* * *

## परिशिष्ट : १

# श्री० नानासाहेब भोंडे

## ( संक्षिप्त जीवन-परिचय )

श्री नारायण विनायक तथा नानासाहेब भोंडे वकील हे सुप्रसिद्ध नकलाकार गोपाळराव भोंडे यांचे सर्वांत कनिष्ठ बंधु. नानासाहेब हे पुण्यांतलि एक नाणावलेले वकील व मुरलेले विधिज्ञ असा त्यांचा लौकिक आहे. एवढेंच नव्हे तर त्यांनीं अनेक सार्वजनिक संस्थांतून विविध स्वरूपाची महत्त्वाची कामगिरी केली आहे. त्यामुळें नानासाहेब महाराष्ट्राच्या व विशेषतः पुण्याच्या सार्वजनिक जीवनांत एक अनुभवी, निष्ठावंत व आघाडीवरचे कार्यकर्ते म्हणून ओळखले जातात.

नानासाहेबांचें शिक्षण नू० म० विद्यालय व फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. तेव्हांपासूनच त्यांचा व्यासंगी स्वभाव व सार्वजनिक कार्याची हौस दृष्टोत्पत्तीस येऊं लागली. कॉलेजांत ते अभ्यास करून डिबेटिंग क्लबमध्येंहि भाग घेत. आर्यक्रीडोद्धारक मंडळाच्या संस्थापकांपैकीं ते एक असून पुढें क्रीडाविषयक चळवळींत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. पी. वाय्. सी. जिमखाना इत्यादि संस्थांमार्फत आट्यापाट्या, खो-खो, हुतुतू व फुटबॉल, हॉकी असे देशी-विदेशी खेळ विद्यार्थ्यांत व तरुण पिढींत लोकप्रिय करण्याचा नानासाहेबांचा प्रयत्न असे. त्या काळापासून इकडील भागांत मैदानी व मर्दानी खेळांकडे जनतेचें लक्ष अधिक वेधलें गेलें. नानासाहेब हे स्वतः खेळण्यापेक्षां सामनाविषयक संघटना करण्यांत कुशल होते.

### विविध संस्थांतील कार्य

पुढें दिलेल्या संस्थांशीं नानासाहेबांचा संबंध आलेला असून त्यांत त्यांनीं महत्त्वाचें व उपयुक्त कार्य केलेलें आहे: अ. भा. पोस्ट व रेल्वेमेल सर्व्हिस यूनियन व नंतर पोस्ट अंड टेलिग्राफ वर्कर्स यूनिअन, डिफेन्स वर्कर्स यूनिअन ( देहूरोड ), मुंबई इलाखा बेलीफ असोसिएशन, पुणें जिल्हा बेलिफ संघ, पुणें म्यु. नोकर संघ, ऑल इंडिया गव्हर्मेंट एंप्लॉईज फेडरेशन, मुंबई विभाग ( सेक्रेटरी ), ऑल इंडिया पोस्टल अँड टे. पेन्शनर्स असोसिएशन

(सेक्रेटरी), पुणें शहर म्युनिसिपॅलिटी व कॉर्पोरेशन (निवडून आलेले सभासद), पुणें सेंट्रल को. बँक (अध्यक्ष), कॉमनवेल्थ अॅशुअरन्स कंपनी (डायरेक्टर), ऑल इंडिया हिंदु लॉ-अँड-रिफॉर्म अॅसोसिएशन (मुख्य चिटणीस), आरोग्य मंडळ, पुणें (उपाध्यक्ष), विद्याप्रसारिणी सभा, पी.वाय्. सी. जिमखाना, आर्यक्रीडोद्धारक मंडळ. "पूना पोस्ट अँड आर्. एम्. एस्." या द्वैमासिकाचे ते अखेरपर्यंत संपादक होते. लोकल सेल्फ गव्हर्नमेंट इन्स्टिटयूट महाराष्ट्र शाखा (चिटणीस व म्यु. व कायदा प्राध्यापक) इ. इ. यावरून नानासाहेबांचें कार्यक्षेत्र किती व्यापक आहे, याची कल्पना येईल. वरील संस्थांतून चिटणिसापासून ते अध्यक्षापर्यंत या ना त्या नात्यानें त्यांनीं मोलाची कामगिरी बजाविलेली आहे.

सहसा कोणाला न दुखावितां कार्य करण्याची त्यांची हातोटी ध्यानांत घेण्याजोगी आहे. संस्थेंत तंटाभांडण अगर वाद उपस्थित झाला तर त्यांत समेट घडवून आणण्याकडे व तडजोडीचा मार्ग शोधून काढण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. कटुता निर्माण होऊं नये आणि आपला मुद्दा तर सोडावयाचा नाहीं, असें नानासाहेबांचें धोरण असतें. त्यामुळें उभय पक्षांनाहि ते अप्रिय होत नाहींत.

Let your words be soft and argument hard. For words, if hard, would all discard.

हें त्यांच्या लिखाणांतील, वक्तव्यांतील व वागण्यांतील धोरण व सूत्र आहे.

विशेषतः विधायक स्वरूपाचें कार्य सतत, चिकाटीनें व परिश्रमपूर्वक करण्यांत नानासाहेबांचा हातखंडा आहे. त्यांनीं एक इंग्रजी द्वैमासिक चालविलें होतें. त्याचप्रमाणें प्रचलित सामाजिक, राजकीय व कायद्यासंबंधींच्या विषयांवर त्यांनीं वेळोवेळीं लेख व जाहीर व्याख्यानें दिलेलीं आहेत. नानासाहेबांना अतिरेकी वृत्तीचें किंवा एकांतिक विचारसरणीचें आकर्षण वाटत नाहीं. साधकबाधक विचार करून मताचा कांटा समतोल राखण्याकडे त्यांच्या मनाचा कल आहे. आचारविचारांतील या समतोलपणाचे सर्व फायदे त्यांना मिळतात, यांत नवल नाहीं. त्यांना शत्रु उत्पन्न होत नाहीं. मतभेद झाले तरी स्नेह्यांशीं व सहकाऱ्यांशीं सलोख्याचे संबंध कायम राहतात. अप्रियता वांट्याला येत नाहीं. गोडव्या स्वभावामुळें कायमची प्रगति होते.

## कामगार संघटना

नानासाहेब यांची पुणें पोस्टल रेल्वे मेल सर्व्हिस संघाचे चिटणीस म्हणून १९२४ मध्यें निवड झाली. त्यानंतर प्रांतिक व मध्यवर्ती संघांत पदाधिकारी म्हणून ते आज सुमारें ३२ वर्षें महत्त्वपूर्ण भाग घेत आहेत. पुणें शाखेच्या द्वैमासिकाचे ते संपादक असतांना त्यांनीं खात्यांतील दोषांवर विदारक प्रकाश पाडला. तसेंच मुंबई इलाखा बेलीफ असोसिएशनचे ते प्रस्थापक होत. संप हें दुधारी शस्त्र; तें कायदेशीर असलें तरी इतर सर्व उपाय निष्फळ ठरल्याशिवाय संपाचा अवलंब करूं नये, असें ते जाहीर सभांतून व खासगी भाषणांतून सांगत. पगारवाढ, महागाई-भत्तावाढ, वैद्यकीय-शैक्षणिक सवलती, कामाचे तास कमी करणें ही जशी संघाची मागणी, तशी कामगारांनीं आपली नैतिक उंची व सेवाविषयक कार्यक्षमता वाढविणें व जनतेची प्रामाणिकपणें सेवा करणें ह्याहि गोष्टींवर भोंडे यांनीं भर दिला आहे. पुणें संघानें तर छोटेखानी वाचनालय, लिमये सहकारी स्टोअर्स, रुग्णोपयोगी साहित्यसंग्रह, स्पर्धायुक्त सांघिक खेळ, इन्स्पेक्टर्स परीक्षेसाठीं वर्ग, बैठे खेळ वगैरे बाबी कार्यान्वित केल्यामुळें तो ' नमुनेदार ' संघ मानला जातो. ह्या सर्व चळवळींत भोंडे यांची प्रेरणा व साहाय्य, किंबहुना धुरीणत्व आहे. त्यांनीं संघातील फुटीर वृत्तीस सक्रिय विरोध केला व स्वॉबेरीच्या मुस्लिम ज्ञातिसंघास आपल्या द्वैमासिकांतून कडवा प्रतिकार केल्यानंतर तो लौकरच नामशेष झाला. तथापि नोकरवर्गातच दोन भाग पडून ती गोष्ट वज्रलेप (Settled fact) झाली तेव्हां त्या शाखांत एकतान सहकार्य घडवून आणणारे विधाते भोंडे असें अनेक सहकारी म्हणूं लागले. १९२८ सालांत पोस्टल व रेल्वेमेल सर्व्हिस असे दोन स्वतंत्र संघ मुंबई विभागांत प्रस्थापित झाले. तेव्हां भोंडे यांस पोस्टानें मुख्य चिटणीस व रेल्वेमेल सर्व्हिसनें अध्यक्ष नेमलें व ही निवड सालोसाल होत गेली तेव्हां आपल्या योग्यतेपेक्षां विभागलेल्या सेवकवर्ग संघांच्या ऐक्याचें व प्रयत्नांच्या समन्वयाचें प्रतीक म्हणून माझी निवड करण्यांत येत आहे असें भोंडे उघडाउघडी म्हणत. पुढें मुंबई, बडोदा, पाटणा, लाहोर, नागपूर, कलकत्ता, मद्रास, रंगून वगैरे सर्कलच्या राजधानीच्या जागीं भरलेल्या कार्यकारिणींत व अधिवेशनांत त्यांनीं उपस्थित राहून प्रामुख्यानें विधायक दृष्टीनें भाग घेतला. ह्या संघास मजूर संघटनेंत महत्त्वपूर्ण स्थान प्राप्त झालें. मुंबई

राज्यांत जेल कामगारांत संघाची स्थापना भोंडे यांच्या धुरीणत्वाखालीं झाली. पण ह्या संघास मान्यता देण्यास मुंबई सरकारनें नकार दिला. म्हणून कांहीं वर्षें काम केल्यानंतर ती चळवळ थंडावली तथापि त्या अवधींतहि नोकरांच्या कांहीं तक्रारी दूर झाल्याच.

## कायदेविषयक कामगिरी

वकिलीच्या व्यवसायांत लौकिक व यश संपादन करण्यांत नानासाहेबांच्या अंगचे वरील गुणच कारणीभूत झालेले आहेत. निरलसता, प्रामाणिकपणा, सांगोपांग अभ्यास, कायद्याच्या भूमिकेची चिकित्सक छाननी, तानमान पाहून वागण्याची व्यवहारज्ञता व विचारांची थोडक्यांत पण मुद्देसूद व रेखीव मांडणी हे नानासाहेबांचे गुणविशेष म्हणून उल्लेखितां येतील. दी बँक ऑफ महाराष्ट्र, पुणें जिल्हा सहकारी बँक, आयुर्वेद रसशाळा लि० पुणें., दी साठे बिस्किट अँड चॉकोलेट कं. लि० पुणें, दी महाराष्ट्र इंडस्ट्रिअल अँड इन्व्हेस्टमेंट्स् लि. पुणें, दी कॉमनवेल्थ इन्शुअरन्स कं. लि० (१९५६ पर्यंत) व सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी इत्यादि मोठमोठ्या व प्रसिद्ध संस्थांचे ते अनेक वर्षांपासूनचे कायदेविषयक सल्लागार आहेत. तसेंच मध्यवर्ती अगर राज्य-विधिमंडळांत विधेयकें प्रविष्ट झाल्यावर बहुतेक बहुजनहितसंबंधी विधेयकांवर व विषयांवर त्यांनीं मार्मिक लेख लिहून उपयुक्त व विधायक सूचना केल्या. सहकारी कायदा, कूळ कायदा, प्रॉव्हिन्शिअल म्युनिसिपल कॉर्पोरेशन, नवीन कंपनी कायदा, अधिकाराचें व हुकमतीचें विकेंद्रीकरण वगैरे विषयां-वरील त्यांचे लेख त्यांच्या सूक्ष्म पण व्यापक दृष्टिकोनाची साक्ष पटवितात.

## हिंदु लॉ अँड रिफॉर्म असोसिएशन

नानासाहेब प्रथमपासून हिंदु कायद्याचें संशोधन व सुधारणा यांत लक्ष घालीत. सन १९२२ मध्येंच हिंदु कायद्याची कलमवार रचना करावी कीं काय, हा प्रश्न त्यांनीं 'चित्रमय जगत्'मध्यें लेख लिहून उपस्थित केला होता. पुढें ऑल इंडिया हिंदु लॉ रिचर्स ॲण्ड रिफॉर्म असोसिएशन स्थापन झाली. त्याचे मुख्य चिटणीस म्हणून नानासाहेबांची निवड झाली. त्यांनीं हिंदु कायद्यांत सुधारणा करणारीं बिलें तयार करून तीं न. चिं. केळकरां-मार्फत मध्यवर्ती कायदेमंडळांत प्रविष्ट केलीं. भोंडे यांनीं सदर संस्थेची

व्यापक घटना केली. मद्रास व कलकत्ता येथील धर्म व कायदा जाणणाऱ्या विद्वानांबरोबर विचारविनिमय केला. अलाहाबादच्या विश्वविद्यालयामध्यें उपकुलगुरु डॉ. गंगानाथ झा यांच्या प्रमुखत्वाखालीं निबंध वाचला. सर तेजबहादूर सप्रू, रमाकांत मालवीय, सी. वाय्. चिंतामणी, इत्यादींबरोबर विचारविनिमय करून अलाहाबाद येथें ॲसोसिएशनची स्थापना केली. या अखिल भारतीय संस्थेचें पहिलें अधिवेशन पुणें येथें झालें. तेव्हां न्यायमूर्ति सर गोविंद माडगांवकर हे अध्यक्ष व भोंडे मुख्य चिटणीस होते. पुढेंहि नानासाहेब भोंडे यांनीं चिटणीस या नात्यानें या सुप्रसिद्ध कायदेपंडिताच्या नेतृत्वाखालीं काम केलें व या कार्याचें महत्त्व, या संस्थेची उपयुक्तता व आवश्यकता वकील वर्गास व समाजधुरीणांस पटवून देण्याची खटपट केली. पुढें भोंडे यांनीं नवीन हिंदु विवाह, घटस्फोट, वारसा हक्क, अन्नवस्त्र विधेयक या हिंदुसमाजाच्या जिव्हाळ्याच्या विषयांवर अनेक विवेचक व मार्मिक लेख वृत्तपत्रांतून लिहिले व विधायक सूचना केल्या. धर्म व कायदा हा परिवर्तनशील आहे आणि म्हणून हिंदुसमाजाची धारणाशक्ति, एकता व सुरक्षितता टिकविण्यासाठीं अथवा वृद्धिंगत करण्यासाठीं सरकारनें आवश्यक ते फेरफार जरूर केले पाहिजेत, हें भोंड्यांच्या लिखाणाचें सूत्र होतें. हिंदुधर्मशास्त्रांत अनेक भिन्न भिन्न मतप्रणाली आहेत; त्या त्या काळीं मान्य झालेली रूढि हा हिंदुधर्माचा अपरिवर्तनीय भाग होऊं शकत नाहीं; हिंदुसमाजाला जर प्रगत राष्ट्रांच्या मालिकेंत मानाचें स्थान पटकवायचें असेल, तर तो समर्थ बनण्याकरितां जुन्या कायद्यांत परिपोषक असे फेरफार कालमानानुसार केले पाहिजेत, असें भोंडे यांचें प्रतिपादन होतें.

'अखिल हिन्दुस्थानांतील वकील वर्गाची संघटना व एकीकरण' या शीर्षकाखालीं निरनिराळ्या प्रांतांतील वकिलांची संख्या व हायकोर्टातील ॲडव्होकेट्स्चें स्थान याचा त्यांनीं परामर्श घेऊन राष्ट्रीयत्वास व एकतेस पूरक अशी योजना उचलून धरली व ब्रिटिश अमदानींतील बॅरिस्टर, सॉलिसिटर व वकील यांच्यामधील कृत्रिम, अनावश्यक व असमर्थनीय भेद नष्ट अगर कमी करावेत, असें सुचविलें. मुंबई, कलकत्ता, मद्रास येथें ओरिजिनल साईडला मोठ्या किमतीचा दिवाणी दावा लावतांना कोर्ट फीची माफी, पण कौन्सिलची मात्र भरघोस फी भरावी हा मोठा अन्याय होय, हें त्यांनीं लेखांत

दर्शविलें. आतां हा भेद पुष्कळ कमी होत चालला आहे, हें अर्वाचीन न्यायालयीन फरकामुळें व कायद्यानें दृष्टोत्पत्तीस येत आहे.

## पुणें म्युनिसिपल सभासद

नानासाहेब हे १९२८ ते १९३८ पर्यंत पुणें नगरपालिकेचे लोकनियुक्त सभासद व १९५१ ते १९५५ पर्यंत महानगरपालिकेचे कार्पोरेटर होते. या अवधींत त्यांनीं लोकहिताचीं व महत्त्वाचीं कामें पुष्कळ केलीं. डिस्ट्रिक्ट म्यु. कायद्याअन्वयें व तत्कालीन नियमांनीं सरकारी इमारती घरपट्टी देण्यास पात्र नसत. पुढें १९२५ सालीं बरोज् ॲक्ट पास झाल्यावरहि मूळ नियम रद्द केल्याशिवाय सरकारी इमारतींकडून घरपट्टी म्यु. स वसूल करण्याचा अधिकार नाहीं, असा सरकारचा दावा होता त्या वेळचे म्यु. अध्यक्ष डॉ. नायडू यांनीं या वादांत म्यु. ची बाजू मांडण्याचें काम भोंडे यांजकडे सोपविलें. त्यांनीं पुणें म्यु. चें म्हणणें व कायद्याची भूमिका निवेदन करणारी नोटीस पुणें कलेक्टर यांस धाडली. त्याचा उपयोग होऊन कलेक्टर व कमिशनर यांनीं समंजस धोरण स्वीकारून नोटिशींतील मागणी मान्य केली. या नोटिशीचा परिणाम असा झाला कीं, मुंबई इलाख्यांतील इतर सुमारें २५ बरो म्युनिसिपालिट्यांना सरकारी इमारतींबाबत घरपट्टीच्या रूपानें सालोसाल दहा-दहा हजार रुपये मिळूं लागले. शिवाय इमारती बांधण्याच्या कामांत म्यु. कडून होणाऱ्या अडचणी व अडथळे, वशिलेबाजी व अयोग्य मोह आणि भाडेनियंत्रण कायद्याची आवळ हीं लोकसंख्येच्या वाढीस भरपूर अशा नवीन इमारती न होण्यास कारणें होत, असें त्यांनीं प्रतिपादिलें.

सत्याग्रहामुळें कारागृहाची शिक्षा झालेले म्यु. सदस्य होण्यास कायद्यानें नालायक ठरले होते. म्हणून ' अशा गुन्ह्यांत नैतिक अधःपात नसल्यास तुरुंग भोगलेला मनुष्य अपात्र ठरूं नये ' अशी दुरुस्ती कायद्यांत करावी, असा ठराव भोंडे यांनीं म्यु. त आणला व तो सर्वानुमतें मंजूर झाला. पुढें कॉंग्रेसच्या राजवटींत हें तत्त्व कायद्यांत अनुस्यूत करण्यांत आलें, हें सर्वांना माहीतच आहे.

## कायदाविषयक सदसद्‌विवेकबुद्धीचे निदिध्यासक

म्युनिसिपल कारभारासंबंधीं भोंडे यांनीं केसरी वगैरे वृत्तपत्रांतून अनेक लेख वेळोवेळीं लिहिले व वार्षिक कारभाराचीं समालोचनें करून स्थानिक

## श्री. भोंडे यांचे कर्तबगार बंधु



श्री. ना. वि. भोंडे,
बी. ए., एल्एल्. बी.

स्वराज्याच्या प्रगतीबाबत व आर्थिक स्थैर्याबद्दल उपयुक्त सूचना केल्या. बिगर शेतसाऱ्याच्या उत्पन्नाचा, विक्रीकराचा व करमणुकीच्या कराचा भाग राज्यसरकारनें म्यु.स द्यावा व पुण्यात औद्योगिक कार्यास कॉर्पोरेशननें उत्तेजन द्यावें, ह्या त्यांच्या लेखांतील सूचना निःसंशय स्वागतार्ह होत. भोंडे याचा कायद्यासंबंधीं अभिप्राय आग्रही नसून निःपक्षपाती असे, त्यामुळें त्यांच्या काळांतले सर्वच म्युनिसिपल अध्यक्ष भोंड्यांच्या मताला मान देत. म्हणून श्री न. वि. गाडगीळ म्हणत : "Bhonde is the custodion of the legal conscienee of the Municipal President."

## शिक्षणक्षेत्रांत

भोंडे हे शिक्षणक्षेत्रांतहि लक्ष घालीत. मुंबईच्या चिकित्सक समूह शाळेत त्यांनीं शिक्षकाचें काम केलेलें आहे. नू. म. विं. त व पुढें भारत हायस्कूलमध्यें ते विनामूल्य वर्ग घेत. सदर शाळेच्या विद्याप्रसारिणी सभेचे ते स्थापनेपासून सतत गव्हर्निंग कौन्सिलवरील सदस्य व स्थायी समितीचे चेअरमन आहेत ह्या शाळेची प्रस्थापना, संगोपन व संवर्धन यांत भोंडे यांचा बराच भाग आहे. शिवाय ग्रामपंचायत कायद्याचे वर्ग व सहकारी कायद्याचे वर्ग भोंडे यांनीं चालविले. लोकल सेल्फ गव्हर्मेंटच्या मध्यविभागाच्या वर्गांत ते म्यु. कायद्याचे प्राध्यापक होते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत ए. आर्. पी. चें. शिक्षण मुंबई येथें घेऊन आल्यावर हवाई हल्ल्यापासून नागरिकांनीं आपल्या जीविताचें संरक्षण कसें करावें या बाबतींत त्यांनीं नू. म. विद्यालयांत शिक्षणवर्ग चालविले व पांचशें विद्यार्थी तयार केले. सर्वसामान्यपणें हा असहकाराचा काळ होता, तरी राष्ट्रोपयोगी व जीवनावश्यक तेथें विरोध व शक्य तेथें सहकार हें त्यांचें तत्त्व होतें.

## खाजगी जीवन

सार्वजनिक जीवनाप्रमाणेंच नानासाहेबांचें खाजगी जीवनहि यशस्वी झालें आहे सूर्योदयापूर्वीं टेकडीवर नियमित फिरावयास जाण्याचा त्याचा क्रम आज ३२ वर्षांचा आहे. ईशकृपेनें त्यांना कशाचीच कमतरता नाहीं. त्यांच्या सुखी संसारात कोणतीच उणीव नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. त्यांच्या

पत्नी सौ. यमुनाताई यांचें त्यांना प्रत्येक कामांत सहकार्य असतें. त्यांचे बंधु विभक्त असले तरी त्यांच्यामधील परस्परांचे संबंध प्रेमाचे व आदराचे आहेत. नानासाहेबांचे नामवंत थोरले बंधु गोपाळराव यांचें तर त्यांना नेहमींच सहाय्य, सहानुभूति व आशीर्वाद असतो. नानासाहेबांना दोन अपत्यें आहेत. मुलगी सुस्थळीं दिलेली असून मुलगा कॉलेजमध्यें शिक्षण घेत आहे. वकिलीच्या व्यवसायांत त्यांनीं द्रव्य व लौकिक चांगला संपादन केला आहे. त्यांच्या बहुविध सार्वजनिक सेवेचें वर्णन वर केलेंच आहे. स्वार्थ व परार्थ या कांहींशा परस्परविरुद्ध दोन गोष्टी साधण्याचा प्रयोग त्यांनीं यशस्वीपणानें करून दाखविला आहे. 'Simple living and high thinking' या तत्त्वानुसार त्यांचें वर्तन आहे. खाजगी व्यवहारांतील त्यांचें वागणेंसुद्धां अत्यंत सरळ, सचोटीचें, सभ्य व सौजन्यपूर्ण असतें. ते निगर्वी व निर्व्यसनी आहेत. शक्य होईल तितकें इतरांच्या उपयोगी पडणें हा त्यांचा स्वभाव संबंधितांना चांगला माहीत आहे. वेळ फुकट न घालविणें हा त्यांचा मोठा गुण आहे. व्यवसाय सांभाळून उरलेला वेळसुद्धां ते रिकामपणांत चकाट्या पिटण्यांत किंवा ख्यालीखुशालींत कधींच घालवीत नाहींत. फुरसतीचा प्रत्येक क्षण ते कामीं लावतात. एरव्हीं त्यांच्या हातून झालें इतकें कार्य खासच झालें नसतें. नागरिक या नात्यानें त्यांचें वागणें निर्दोष व आदर्श आहे, यांत शंका नाहीं.

## समन्वयबुद्धि व राष्ट्रीय दृष्टि

व्यवसायांत व व्यवहारांत ज्ञानाबरोबर सरलता, विध्वंसनाऐवजीं विधायकता, विवादापेक्षां समेट, विरोधाऐवजीं सहकार व जुळतें घेणें हीं वैशिष्ट्यें नानासाहेबांच्या सार्वजनिक व खाजगी जीवनांत प्रत्ययास येतात संस्था अगर व्यक्ति कशाहि असोत, त्यांच्या वैगुण्याकडे कानाडोळा करून त्यांचा सत्कार्याला उपयोग कसा करून घेतां येईल एवढेंच त्यांचें पहाणें असतें. याचें उदाहरण म्हणून देशस्थ ऋग्वेदी संस्थेचें देतां येईल. या संस्थेशीं त्यांचा पंचवीस वर्षें संबंध आहे. परंतु या समाजानें कोणतेहि खास राजकीय, सामाजिक अगर स्थानिक हक्क मागूं नयेत, नोकऱ्यांत प्रमाण मागूं नये, एकराष्ट्रीयतेस विसंगत असें कोणतेंहि कृत्य करूं नये, केवळ श्रमविभागाच्या तत्त्वावर कार्य चालवावें व अखिल भारताचा केवळ अविभाज्य घटक म्हणून संस्थेनें

आपलें धोरण ठेवावें व कार्यक्रम आंखावा असें त्यांचें स्वच्छ मत आहे व म्हणून तसा ठराव त्यांनीं न्यायमूर्ति केशवराव यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या परिषदेंत स्वतः तयार करून मांडला. प्रथम या ठरावाला इतरांचा विरोध होता. परंतु अखेर तो सर्वांना पटून एकमतानें पास झाला. सदर संस्थेचा दृष्टिकोन व कार्य एकराष्ट्रीयत्वास, बहुजनसमाजाच्या व इतर ज्ञातींच्या हितास बाधक होणार नाहीं, अशा धोरणानेंच ते या संस्थेंत भाग घेत असतात. ज्ञातिविषयक संस्था नसाव्या हें खरें असलें तरी मर्यादित मनोवृत्तीच्या द्रव्याचा व कार्यस्फूर्तीचा ओघ अजिबात बंद होण्यापेक्षां समाजाच्या एका घटकाकडे जरी तो वळला, तरी एकूण समाजाच्या प्रगतीत तो सहाय्यकच ठरेल असें ते मानतात. सारांश, सर्वांगीण सुधारणेला जें जें सहाय्य होईल, तें तें संबंधित संस्था व समाजाचे वर्ग यांच्याकडून पदरांत पाडून घेण्याची भोंडे यांची वृत्ति, धोरण व कार्यक्रम आहे. सारांश, राष्ट्रीय व सामाजिक हितबुद्धि भोंडे यांच्या प्रत्येक कार्याच्या बुडाशीं असते आणि म्हणून सर्व समाजाची प्रगति होईल अशा कोणत्याहि चळवळीला साहाय्य देणें, यथाशक्ति त्यांत भाग घेणें व संकुचित हितबुद्धीचा दृष्टिकोन नाहींसा करणें हें त्यांच्या आचाराचें, विचाराचें व उच्चाराचें मध्यवर्ती सूत्र होय.

* * *

## परिशिष्ट : २

# श्री० गोपाळराव भोंडे–गुणग्रहण

श्री. गोपाळराव भोंडे यांच्या नकलांचें कौतुक आजवर अनेकांनीं केलें आहे. आपणहून अनेकांनीं त्यांस प्रशस्तिपत्रकें दिलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं अभिप्राय खालीं देत आहों.

: १ :

## प्रतिभावान् आणि अभिजात नट गोपाळराव भोंडे

### श्री. वसंत शांताराम देसाई

१९२१ ते १९२४ पर्यंत मी माझ्या विद्यार्थिदशेंत मुंबईंत होतों तेव्हांपासून श्री. गोपाळराव भोंडे यांचा लौकिक मी ऐकत होतों. परंतु १९२४ नंतर मी पुण्याला आलों तरी १९२७ पर्यंत मीं त्यांना पाहिलें नव्हतें, मग त्यांच्या नकला पाहणें तर दूरच राहो ! १९२७ सालीं एके दिवशीं मी गंधर्व नाटक मंडळीच्या बिऱ्हाडीं बसलों असतां गोपाळराव आले आणि बालगंधर्वांनीं त्यांची आणि माझी ओळख करून दिली. महाराष्ट्राच्या एका असामान्य कलावंताच्या मध्यस्थीनें दुसऱ्या एका असामान्य कलावंताशीं माझी ओळख व्हावी, हा एक योगच समजला पाहिजे !

माझी ओळख झाल्यापासून गोपाळराव माझ्याशीं अत्यंत आपुलकीनें वागूं लागले. गोपाळरावांना बोलायला पुष्कळ पाहिजे. त्यांची विनोदबुद्धि अत्यंत तीव्र आणि जागृत ! त्यामुळें गप्पाष्टकांच्या बैठकींत ते असले म्हणजे फार मौज येते. ते फर्ग्युसन कॉलेजांत शिकत होते आणि बालगंधर्वांचा महाराष्ट्राच्या कलाजीवनांत नुकता उदय झाला होता, तेव्हांपासून दोघांच्या परिचयाची सुरुवात झालेली उभयतांची एकमेकांवर निस्सीम भक्ति होती, त्यामुळें गंधर्व मंडळी पुण्याला असली म्हणजे तिच्या रंगमंदिरांत किंवा बिऱ्हाडीं गोपाळराव वारंवार येत असत आणि आम्ही देखील घरीं जात असूं.

असे कांहीं दिवस गेल्यानंतर त्यांच्या नकला पाहण्याचा जेव्हां मला योग आला, तेव्हां मी अक्षरशः आश्चर्यचकित झालों!

गोपाळरावांच्या नकला पाहण्यापूर्वीं मीं इतर कांहीं नकलाकारांच्या नकला पाहिल्या होत्या. एखाद्याच्या आवाजासारखा आवाज काढणें किंवा त्याच्या पद्धतीनें बोलणें-सारांश, एखाद्या विशिष्ट 'ध्वनी'ची आठवण करून देणें-इतकेंच त्या नकलाकारांचें सामर्थ्य होतें! मारवाड्यासारखें मराठी बोलणें, दक्षिणेकडील मराठ्यासारखें हिंदी बोलणें, मद्रदेशीसारखें इंग्रजी बोलणें, आगगाडी सुटल्यावर मागें राहिलेल्या गांवढळ बायकांसारखें रडणें अशा गोष्टींच्याच नकला बहुधा केल्या जात असल्यामुळें, गोपाळरावांच्या नकला त्याच प्रकारच्या पण जास्त सफाईदार असतील, असा माझा समज होता. पण मीं पाहिला तो प्रकार सर्वस्वीं निराळा होता!

लोकमान्य टिळकांचें भाषण, शिवराम महादेव परांजपे यांचें भाषण, बालगंधर्व, शंकरराव मुजुमदार आणि नानासाहेब जोगळेकर यांच्या संबंधांतला एक प्रसंग, एका ऑफिसांतला प्रसंग आणि एका भटजीबुवांच्या संबंधांतला एक प्रसंग, संगमनेरकर शीघ्रकवींचें शीघ्रकवित्व अशा नकला त्या दिवशीं गोपाळरावांनीं केल्या आणि त्यानंतर मीं तसे अनेक कार्यक्रम पाहिले. त्या नकलांचें वैशिष्ट्य असें कीं, ज्याची नक्कल करावयाची त्याच्या स्वभावाचें प्रतिबिंब दिसेल अशा एखाद्या प्रसंगावर ती आधारलेली असायची. नुसत्या भाषणाची नक्कल केली तरी त्यांतहि वक्त्याच्या स्वभावाचें प्रतिबिंब पहायला मिळत होतें. त्याच्या प्रत्येक नकलेला जणूं काय एक छोटेंसें कथानक असे आणि त्यांत आरंभ, उत्कर्ष आणि चटकदार पर्यवसान असे तीन टप्पे असत. विस्कळितपणाला यत्किंचितहि वाव मिळणार नाहीं, असा बांधेसूदपणा त्यांच्या प्रत्येक नकलेंत प्रत्ययाला येत असे.

त्यांचें दुसरें असाधारण वैशिष्ट्य असें कीं, ज्या व्यक्तीची नक्कल करावयाची तिच्यासारखा आवाज काढणें किंवा अंगविक्षेप करणें या गोष्टी गोपाळराव अत्यंत सफाईनें करीतच, पण त्यांचा चेहरासुद्धां त्या व्यक्तीसारखा दिसूं लागायचा! एखाद्यासारखा पोशाख घालून आणि त्याचें सोंग काढून ते नक्कल करीत तेव्हांच नव्हे, तर स्वतःच्या पोशाखांत किंवा दर्शनांत कोणताहि

बदल न करितां ज्या वेळीं ते अनौपचारिक नकला करीत, त्या वेळीं सुद्धां त्यांचा चेहरा त्या व्यक्तीसारखा दिसूं लागत असे.

लोकमान्य टिळक, शंकरराव मुजुमदार आणि शीघ्रकवि संगमनेरकर अशा सर्वस्वीं भिन्न दर्जाच्या आणि प्रवृत्तींच्या व्यक्तींच्या नकला गोपाळरावांनीं एकाच कार्यक्रमांत लागोपाठ केल्या तरी प्रत्येक वेळीं ते निराळे दिसायचे! एकदां तर आम्ही एका दिवाणखान्यांत बसलों असतां 'भालाकार' भोपटकरांची नक्कल करण्याकरितां म्हणून गोपाळराव त्या दिवाणखान्यांतून बाहेर गेले आणि एका क्षणांतच परत आले. पण बाहेर गेले ते गोपाळराव आणि परत आले ते मात्र 'भालाकार' असें आम्हांला वाटावें इतके ते हुबेहूब 'भालाकारां' प्रमाणें दिसूं लागले! आश्चर्य असें कीं, चष्मा आणि टोपीच्या ठेवणींत थोडा बदल केलेला आणि गळ्यांत एक उपरणें अडकवलेलें, यापेक्षां त्यांनीं स्वतःच्या दर्शनांत कोणताच फरक केला नव्हता!

हा नकलाकार नसून जादूगार आहे, असें मला क्षणमात्र वाटलें. पण जादूगाराची भिस्त नजरबंदीवर असते गोपाळरावांच्या जादूगिरींत नजरबंदीला मुळींच अवकाश नव्हता! संपूर्ण तन्मयता ही त्या जादूगिरीची एकच एक शक्ति होती! ज्या व्यक्तीची नक्कल करावयाची तिच्याशीं गोपाळराव इतके समरस होतात कीं, त्या व्यक्तीच्या आवाजापुरती किंवा एखाद्या विशिष्ट लकबीपुरती त्यांची नक्कल मर्यादित न राहतां, तिचें शंभर टक्के प्रतिबिंब आपल्याला त्या नकलेंत पहायला सांपडतें—आणि म्हणूनच, आपण नक्कल पहात नसून अस्सलच पाहत आहोंत, असें प्रेक्षकाला वाटतें!

एखादा महान् गायक म्हटला तरी त्याच्या कांहीं लकबींची निर्जीव नक्कल केलेली आपण पुष्कळ वेळां पाहतो आणि म्हणूनच तशी नक्कल हास्यास्पद ठरते. महान् गायकाच्या स्वरविलासाचें मौलिक अंतरंग त्याची नक्कल करणाऱ्या गायकाच्या गळ्यांतून प्रतीत होते आहे, असा अनुभव फारच क्वचित् येतो. ज्या व्यक्तीची नक्कल करावयाची तिच्या अंतरंगाशीं समरस होण्याची तपश्चर्या करून ती सिद्धि गोपाळरावांनीं प्राप्त करून घेतली असल्यामुळें, मीं त्यांचा "महाराष्ट्राचा असामान्य कलावंत" असा सुरुवातीलाच उल्लेख केला आहे. आणि म्हणूनच, त्यांच्या कलाचातुरीला 'नक्कल' म्हणणें हा त्यांच्यावर एक प्रकारचा अन्याय करण्यासारखें आहे,

असें मला वाटतें. गोपाळराव हे नुसते नकलाकार नसून 'अभिजात नट' आहेत आणि त्यांचें हें स्थान गेलीं चाळीस-पन्नास वर्षे तुलनेपासून सुद्धां अबाधित राहिलें असून, नजिकच्या भविष्यकाळांत त्याजवर कोणी हक्क सांगूं शकेल असें मला वाटत नाहीं.

गोपाळरावांच्या कलेचा एक छोटा चित्रपट घ्यावा, असे अनेक प्रयत्न करूनसुद्धां, महाराष्ट्रांतील एकाहि चित्रपटनिर्मात्याला त्याचें अद्याप अगत्य वाटूं नये, याचें मात्र मला वाईट वाटतें!

: २ :

## अद्वितीय नकलाकार – भोंडे

### प्रा. ना. सी. फडके

### पुण्याचा ताजमहाल

" आमच्याकडे दोन दिवस राह्यला या कीं एकदां पुण्याला " असं परप्रांतांतल्या एखाद्या गृहस्थाला मीं आग्रहानं म्हटलं कीं तो साहाजिक विचारतो, " तुमच्या पुण्यांत बघण्यासारखं काय काय आहे ? " हा प्रश्न ऐकला कीं शनिवारवाडा, पर्वती. बंडगार्डन, सिंहगड अशा जुन्या ऐतिहासिक स्थळांप्रमाणें नव्यानं झालेलं खडकवासल्याचं लष्करी विद्यालय, नॅशनल लॅबोरेटरी यांचीं नांवं मी घेतों, पुण्यांतल्या कॉलेजांची यादी वाचतों. ज्याला मी आमंत्रण देतों तो पाहुणा फारशी उत्सुकता दाखवीत नाहीं.

पुण्यांतील प्रसिद्ध सिनेमा स्टूडिओंचें आमिष मी दाखवितों तरी देखील पाहुण्याच्या चर्येवर फारसा उत्साह दिसत नाहीं. पण मग जेव्हां मी त्याला म्हणतों, " भोंड्यांच्या नकला दाखवीन मी तुम्हांला " तेव्हां त्याचा मुद्रा पालटते व तो औत्सुक्यानं विचारतो, " खरंच दाखवाल ? भोंडे आहेत अजून ? " मी त्याला हंसत सांगतों, " आहेत तर ! आज घटकेला ते पंचाहत्तर वर्षांचे आहेत. पण नकला करण्याच्या प्रश्नापुरते अगदीं खणखणीत आहेत. तुम्हांला दाखवीन मी त्यांच्या नकला. पाहुण्याचा चेहरा आनंदानें अगदीं तेजाळून निघतो. ताजमहाल दाखविण्याचं आमंत्रण मिळाल्याप्रमाणें.

खरोखर आपल्या गांवीं ताजमहाल असल्याचा अभिमान आग्रेवाल्यांना जितका वाटेल तितकाच भोंडे पुण्याचे आहेत या गोष्टीचा आम्हां पुण्याच्या लोकांना अभिमान वाटावा, अशी त्यांच्या कलेची थोरवी आहे. श्री. गोपाळ विनायक भोंडे ही एक व्यक्ति नसून अविस्मरणीय आख्यायिका आहे बाल गंधर्व, हरिभाऊ आपटे, नायडू, देवधर यांच्याप्रमाणें! जिनसीवाले, टिळक यांच्याप्रमाणें, असं देखील म्हणायला हरकत नाहीं. कारण या दोघांच्याहि नकला भोंडे करतात. त्यांच्या टिळकांच्या उत्कृष्ट नकलेमुळेंच ते साऱ्या महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेरच्याहि कित्येक शहरीं प्रसिद्ध आहेत. एक काळ असा होऊन गेला कीं, मराठी लोकांना गंधर्वांच्या नाटकांचं जसं वेड लागलेलं होतं, तसंच 'भोंड्यांच्या नकलां'चं वेड लागलेलं होतं. कुठेंहि भोंड्यांच्या नकला होणार आहेत असं कळलं कीं हजारों लोकांची गर्दी लोटत होती मुंबईच्या ब्राह्मण सभेंत भोंड्यांच्या नकला असल्या कीं तिन्ही मजल्यांवरचीं सभागृहं तर चिकार भरून जायचींच, पण शिवाय बाहेरच्या रस्त्यावरहि लोकांची ही थाप जमून वाहतूक बंद व्हायची, हें ठरलेलं. कित्येकदां अनावर गर्दीमुळें नकलांचा कार्यक्रमच रद्द करण्याचा प्रसंग यायचा! आजपर्यंत भोंड्यांनीं आपल्या नकलांचे दोन-अडीच हजार कार्यक्रम सहज केले असतील लक्षावधि लोकांना आपल्या अद्वितीय कलेच्या दर्शनानं चार-चार सहा-सहा घटका मंत्रमुग्ध करून टाकलं असेल!

हुबेहुबपणा हाच त्यांच्या नकलांचा विशेष आहे, आणि हा हुबेहुबपणा नुसत्या व्यक्तीच्या आवाजापुरताच नसतो तर अगदीं सर्व सर्व बाबतींतला असतो. इतका कीं, नक्कल ऐकणाराच्या दृष्टीला भोंडे दिसत नाहींत तर ज्या व्यक्तींची नक्कल ते करीत असतील ती व्यक्तीच दिसूं लागते!

टिळक, रँग्लर परांजपे, सावरकर, भोपटकर, पांगारकर, बापूजी अणे, चिंतामणराव वैद्य अशा माणसांना आपण प्रत्यक्ष पहात आहोंत, असं श्रोत्यांना वाटतं. आवाजाप्रमाणें आवाज काढण्याची देणगी कित्येक जणांना असते, पण पांच-दहा मिनिटांच्या वर त्यांच्या नकला टिकत नाहींत. याउलट भोंड्यांची नक्कल म्हणजे त्या त्या पुढाऱ्याचं चांगलं भरघोस अर्ध्या तासाचं व्याख्यान असतं! इतर नकलाकार टिळकांचा आवाज काढतात, पण टिळकांसारखे दिसत नाहींत. ते सावरकरांसारखं पांच मिनिटं बोलून दाख-

वितात, पण सावरकरांसारखे दिसत नाहींत. उलट भोंडे सावरकरांची नक्कल करूं लागले कीं, पहाणाराला वाटतं, आपल्यापुढें प्रत्यक्ष सावरकरच अवतरले आहेत. याचं कारण असं कीं, भोंडे नकलेच्या वेळेस मनानं खरोखरच सावरकर बनतात. एखाद्या माणसाला पिशाच्चानं झपाटावं त्याप्रमाणं त्या त्या नकलेच्या वेळेस ती ती व्यक्ति भोंडयांना झपाटते. भोंडे जागेवर रहात नाहींत, त्यांच्या ठिकाणीं प्रत्यक्ष टिळक प्रगट होतात! पराकोटीची तद्रूपता ही भोंडयांच्या अलौकिक कलेची गुरुकिल्ली म्हणायला हवी.

## परकायाप्रवेश

यामुळेंच टिळकांच्या नकलेसाठीं वेशभूषा केल्यानंतर त्यांना रँग्लर परांजप्यांच्या नक्कलेतलीं चार वाक्यें म्हणायला सांगितलीं तर म्हणतां येणार नाहींत! किंवा भालाकार भोपटकरांच्या सोंगांत पांगारकरांची आर्या म्हणतां येणार नाहीं. किंवा सावरकरांचं सोंग घेतल्यावर बाल गंधर्वांचे हेल काढतां येणार नाहींत. त्या त्या नकलेच्या वेळेस भोंडे संपूर्णतः ती ती व्यक्ति बनलेले असतात. एक प्रकारें परकायाप्रवेशाचा चमत्कार भोंडे करून दाखवितात असच म्हटलं पाहिजे.

## गुरु नाहीं व शिष्यहि नाहीं

या सगळ्याचा उघडच अर्थ असा कीं, भोंडयांची कला जशी थक्क करून सोडणारी आहे, तशीच ती एका अर्थी आंधळी आहे.

या कलेच्या बाबतींत त्यांनीं जाणतेपणानं अमुक खटपट केली असं सांगतां येणार नाहीं. तुम्ही जर त्यांना विचाराल, आवाज कसा कमाविलात, मुद्रेचा अभिनय कसा बसविलात, हातवारे कसे पक्के केलेत तें सांगा. तर ते म्हणतील, " काय सांगूं कपाळ ? यांपैकीं कांहींदेखील मीं केलं नाहीं! अमक्याची नक्कल करायची ठरविली आणि ती मी करूं लागलों इतकेंच!" बाल गंधर्वांनीं गाण्याची मेहनत खूप केली. त्यांना मोठे गुरुहि मिळाले. परंतु या गोष्टी हिशोबांत धरूनहि असंच म्हणायला हवं कीं, त्यांना निसर्गाचीच देणगी इतकी मोठी आहे कीं, त्यांच्या कंठांतून केवळ स्फूर्तीनं स्वरमाला निघाल्या कीं त्यांत रागस्वरूप आपोआप प्रगट व्हावं! भोंड्यांची गोष्ट अशीच आहे त्यांच्या कलेंत प्रयत्नाचा भाग फार थोडा आहे. सारा विलास आहे तो निसर्गदत्त

देणगीचा. तिला तुम्ही प्रतिभा म्हणा, काय वाटेल तें म्हणा, परंतु ती सर्वांशीं स्वयंप्रकाशी आहे खचित. यामुळेंच कोणत्याहि गुरूची गरज भोंड्यांना लागली नाहीं ! आणि यामुळेंच कोणाचा गुरु भोंडे होतील अशीहि शक्यता नाहीं आपण काय करतों, कसं करतों, हें भोंड्यांना स्वतःलाच कळलेलं नाहीं तर ते दुसऱ्याला काय सांगणार ? 'आम्हांला नकलाची कला शिकवा' म्हणणारे लोक भोंड्यांकडे पुष्कळ आले. पण "आज अमावस्या आहे, आज नको," "आठ दिवसांनीं मुहूर्त चांगला आहे तेव्हां बघूं" अशा थापा मारून भोंड्यांनीं शिष्य होऊं पहाणाऱ्या साऱ्या लोकांना परत धाडलं आहे. आतां त्यांच्या नादीं कुणी लागत नाहीं. 'दुसरा भोंडे' तयार होण्याची शक्यता अगदींदेखील नाहीं. गोपाळ विनायक भोंडे हे एकच 'भोंडे' महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांत नमूद केले जातील.

'भोंड्यांसारखे भोंडेच' असं आणखी एका अर्थानं म्हणायला हवं. भोंडयांच्या संग्रहीं थोर पुढाऱ्यांचीं व्याख्यानं जशीं आहेत, त्याचप्रमाणें त्यांच्या पोतडींत इतरहि पुष्कळ खभंग टमंग 'चिजा' आहेत.

जांवयाला कौतुकानं ओल्या नारळाच्या करंज्या घालणारी विधवा आहे, अफाट शिव्या देणारे फटकळ मास्तर आहेत, मोरोपंतांची 'केकावलि' शिकविणारे मास्तर आहेत, खरे नांवाचें गेंगाणे अकाउंटंट आहेत. नखं खाणारा डांबरट विद्यार्थी आहे. बालगंधर्व आहेत. अशा शेंकडों व्यक्ति आहेत.

भोंडयांच्या सर्वच संवादात्मक नकलांची तऱ्हा अशी आहे. त्यांतली एकेक पहातांना या संसारांतलं एकेक गमतीदार नाटक आपण बघत आहोंत, असं वाटत. नकलेला योग्य अशा प्रसंगाची निवड करण्यांत तर भोंडयांनीं कौशल्य दाखविलेलं दिसतंच, परंतु व्यक्तींचे भिन्न भिन्न स्वभाव आणि त्यांतून उत्पन्न झालेलं नाट्य, या दोन्ही गोष्टी भोंडे केवढ्या कौशल्यानं दाखवितात ! या नकला बघतांना मनांत येतं, मानवी स्वभावाचं मार्मिक अवलोकन आणि चित्रण करण्याच्या बाबतींत पहिल्या प्रतीच्या नाटककाराचे गुण भोंडयांच्या ठिकाणीं आहेत खचित. भोंडयांच्या या नकला म्हणजे सवंग हास्य निर्माण करणाऱ्या चटोर माकडचेष्टा नाहींत, तर उत्कृष्ट स्वभावदर्शनाचे मनोहर नमुने आहेत.

('लोकसत्ता', ता. २२-७-५६ वरून)

## : ३ :

# समाजाचें कलाभूषण

**श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर,** बनारस युनिव्हर्सिटी

कोणतीहि उत्तम कला ही खऱ्या प्रतिभेचें अंग आहे सामान्यांतील असामान्यत्व शोधून काढणें हा प्रतिभेचा स्वभाव आहे व त्याचें अभिनयानें दिग्दर्शन करणें हें कलेचें लक्षण आहे. कला ही व्यक्तीच्या, वस्तूच्या अथवा प्रसंगाच्या सौंदर्याचें. विशिष्टत्वाचें व अपूर्णतेचें आविष्करण करतें. त्याबरोबरच ती त्यांतील रस-सूचकतेचें काम करते व आपणांला बोध व आनंद देते.

नकला ही उत्तम कला आहे. ती नाट्यकला आहे. ती बहुरूपी कला आहे. ती यथार्थरूपानें प्रगट होण्यास नकलाकारामध्यें कलावंताची अवलोकन-शक्ति, वस्तूंच्या. व्यक्तींच्या व प्रसंगांच्या सामान्य स्वभावाची व असामान्य गुणांची ओळख व त्यांचें स्थलकालोचित आविष्करण करण्याची कलाशक्ति पूर्णपणें पाहिजे. "नकला" ही नुसती अनुकरणाची कला नव्हे. त्यामध्यें कलावस्तु, कला-व्यक्ति व कला-प्रसंग यांचें विशिष्ट लक्षण व हृद्गत हावभाव-रूपानें प्रगट करण्याचें व त्यांच्या विशिष्टत्वाचें चित्र पूर्णपणें उभारण्याचें आहे.

नकलांमध्यें- नकलाकार त्यांचें आविष्करण करतांना केव्हां केव्हां विनोद व थट्टा, केव्हां केव्हां उपरोध व उपहास असतो पण तो नकलांचा मुख्य गुण अथवा प्रधान लक्षण नव्हे. 'नकला' या मुख्यतः असामान्यत्वसूचक व विशेषत्व-दर्शक आहेत. कलेचे हेच प्रधान गुण आहेत. शास्त्राचें क्षेत्र निराळें आहे. त्याचें लक्ष सामान्यत्वाचें वर्णन व विश्लेषण करण्याकडे असतें.

श्री. गोपाळराव विनायक भोंडे हे एक नामांकित नकलाकार व कलावंत आहेत. त्यांच्या नकलांचे प्रयोग मीं स्वस्थतेनें पाहिले आहेत. त्यांची नकला करण्याची हातोटी व कौशल्य विलक्षण आहे. त्यामध्यें त्यांची सूक्ष्मबुद्धि व सूक्ष्मदृष्टि उत्तम दिसून येते. त्यांना ती स्वाभाविक देणगी आहे व तिला त्यांनीं स्वप्रयत्नानें व अभ्यासानें पूर्णतेला नेली आहे. त्यांच्या अभिनयकलेमध्यें कृत्रिम-पणा व ओढाताण नाहीं. त्यांच्या नकला सहज स्वाभाविकपणें घडून येतात.

ते अनेक व्यक्तींचीं संभाषणें एकटेच करूं शकतात व त्यांत प्रत्येक व्यक्तीचें व प्रसंगाचें विशिष्टत्व शेवटपर्यंत राखतात.

त्यांनीं केलेल्या लोकमान्य टिळक, प्रो जिनसीवाले, प्रो. शिवरामपन्त परांजपे, रँग्लर रघुनाथराव परांजपे, बॅ. विनायकराव सावरकर, श्रीयुत केळकर, पांगारकर इत्यादींच्या नकला हुबेहुब व अप्रतिम वठतात. त्या प्रत्येकाची मूर्ति व अंगविक्षेप, आवाज व शब्दरचना, विचार व उच्चार हे तंतोतंत व उत्कटतेनें वठवण्यांत श्रीयुत भोंडयांचा हातखंडा आहे. ते बायकांच्या नकला त्यांच्या आवाजांत व हावभावांत उत्तम करतात. ते १०० वर निवडक व्यक्तींचें व प्रसंगांचें चित्रण त्या व्यक्तींच्या आवाजानें, अंगविक्षेपानें, हालचालीनें, वेशभूषेनें करूं शकतात. त्यामध्यें त्यांचें वैशिष्ट्य व पूर्णता सुंदरपणें दिसतें. त्या त्या व्यक्तींचे अन्तर्गत स्वभाव व बाह्य वर्तणूक व त्या त्या प्रसंगाचें स्वरूप व लक्षणें त्यामध्यें दृग्गोचर होतात.

श्री. गोपाळराव हे साध्या वृत्तीचे व गोड स्वभावाचे गृहस्थ आहेत त्यांना आपल्या अभिनयकलेचा व कलाकौशल्याचा फाजील अभिमान नाहीं. त्यांच्या अभिजात गुणांबद्दल मी त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों. त्यांची नकलाशक्ति व संपन्नता ही नुसत्या महाराष्ट्राचीच नव्हे तर आपल्या देशाची प्रतिष्ठा व कीर्ति वाढविणारी गोष्ट आहे. ते आपल्या समाजाचें कलाभूषण आहेत.

: ४ :

## श्री. दा. वि. गोखले, केसरी

श्री. गोपाळ विनायक भोंडे ऊर्फ अप्पासाहेब यांच्या नकलांचे प्रयोग मीं अनेक वेळां पाहिले आहेत. नकला करण्याचें त्यांचें कौशल्य उत्कृष्ट प्रतीचें आहे यांत शंका नाहीं. ज्याची नक्कल केली जाते त्याच्या चांगल्या ढबी व वाईट खोडी यांचें हुबेहुब अनुकरण करणें फार अवघड असतें. याहिपेक्षां त्यांच्या इतर बाबीबाबत हुबेहूब वातावरण उत्पन्न करणें हें अवघड आहे. हें श्री. अप्पासाहेब चेहऱ्यावरील आविष्कार व इतर बारीक हालचाली दाखवून उत्तम रीतीनें करतात यांत शंका नाहीं.

: ५ :

## विरळा कलागुण

**राजा महाराजसिंग,** गव्हर्नर ऑफ बॉंबे

**Government House,**
**Ganesh Khind,**
**Poona 7**
*October 6, 1950*

Prof. G. V. Bhonde displayed considerable powers of Imitation at a performance which he gave before me and several members of my staff on October 1, 1950, at which he impersonated several well known leaders living and dead.

We all appreciated his gifts which are very rarely found. I wish well to him.

: ६ :

## अनामिका सार्थवती

**महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार**

आमच्या नूतन मराठी विद्यालयाचे एक वडील माजी विद्यार्थी आमचे आळंकर, घरोब्याचे शेजारी श्री. अप्पासाहेब भोंडे यांच्या नकला-कौशल्याचा प्रयोग प्रथम मीं इ स १९०५ सालीं पाहिला. तेव्हापासून गेल्या ४० वर्षांत अनेक वेळां त्यांचे प्रयोग मीं पाहिलेले आहेत. इ. स. १९०५ सालीं पाहिलेल्या नकलांत बहुतेक नकला शिक्षक, घरगुती मंडळी व शेजारीपाजारी यांच्याच होत्या, निदान त्याचा भरणा विशेष होता. पुढें अप्पासाहेबांनीं कित्येक सार्वजनिक पुढारी मंडळीच्या भाषणांचें व ढबींचें अनुकरण वठवून दाखविण्याचा यशस्वी प्रयत्न केला. आश्चर्य हें वाटतें कीं, आज त्यांचें वय साठीच्या पुढें गेलें आहे, तरी त्यांचें कौशल्य अणुमात्रहि कमी झालेलें दिसत नाहीं.

अप्पासाहेबांच्या अनुकरणप्रयोगांत अनुकृत मंडळींचे आवाज, चर्या आणि चालण्याबसण्याची ढब यांचें अतिशय मनोहर व मार्मिक अनुकरण

वटविलेलें आढळून येतें. क्षणोक्षणीं ते चर्येत व आवाजांत एवढा हुबेहूब पालट करून दाखवितात कीं, पहाणाराचें मन थक्क होऊन जातें. त्यांचे अनुकरणप्रयोग कधीं कंटाळवाणे होत नाहींत. त्यांची गोडी अविट राहते. अशीं अनुकरणें करून दाखविणें ४० वर्षांपूर्वी जरा हलकेपणाचें समजण्याचा प्रघात होता. पण पुढें पुढें समाजांत कलादृष्टि व रसिकता वाढीस लागल्यानें आज हजारों मंडळी भोंडे यांचे प्रयोग उत्सुकतेनें पाहतात. प्रयोगांना टिंगलीचें स्वरूप येऊं नये म्हणून भोंडे काळजी घेतात, असेंहि मला दिसून आलें आहे.

प्रि. भाटे, प्रि रँ. परांजपे, नू. म. वि. तील बापट मास्तर, आबा कुलकर्णी इत्यादिकांचीं अनुकरणें आवाज, बाह्यरूप इत्यादि सर्व दृष्टींनीं भोंडे तंतोतंत उठवतात. या मंडळींचे खरे खरे (त्यांचे वापरण्याचे) पोषाख करून जर भोंडे अजूनहि त्यांच्या घरांत जातील तर घटकाभर घरचीं माणसेंसुद्धां विस्मित राहून फसतील, अशी मला खात्री वाटते.

भालाकार भोपटकर यांच्या चाली-पोषाखांवरून भोंडे यांस पाठीमागून किंवा कोनानें जर अनुकरणप्रयोगांत पाहिलें तर खास भोपटकर म्हणून पाठीवर थाप मारण्याचा भोपटकर-मित्रांना मोह होईल.

टिळकांच्या नकलेंत अलीकडे विशेष सुधारणा झालेली आढळली आणि ती इष्ट अशी आहे. तोच प्रकार कै० पांगारकरांचा होय.

भोंडे यांचे प्रयोग पाहून आम्हीं कांहीं मंडळींनीं असले प्रयोग करून पाहिलेले आहेत. इतकी लोकप्रियता व छाप या प्रयोगांना लाभलेली आम्हांस अनुभवानें सांगतां येईल.

अनेक नकलाकार म्हणून अलीकडे पुढें आलेले आहेत. त्यांत नानवडेकरांसारखे कित्येक पट्टुहि आढळतात. परंतु विशेष व्यक्तिवाचक अनुकरणांत भोंडे यांनींच अनामिका सार्थवती केली असेंच म्हणणें न्यायाला व सत्याला धरून होईल.

त्यांचें रेकार्ड घेण्याची कल्पना स्तुत्य आहे, पण ती आतां प्रत्यक्ष अमलांत जितक्या लवकर येईल तितकें उत्तम.

: ७ :

## ईश्वरदत्त देणगी

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**, धर्मकोश मंडळ, वाई

भोंडे यांच्या परिचयांत त्यांच्या ठिकाणीं असलेली शालीनता व सभ्यता ठसा उमटविल्याशिवाय रहात नाहीं. नकलाकार म्हणून त्यांना महाराष्ट्रांतील सुशिक्षित पिढी ओळखते. खरा कलाकार त्यांच्या अंतरंगांत असल्यामुळेंच ते अविस्मरणीय नकलाकार बनले आहेत. ज्यांनीं शिवराम महादेव परांजपे व कै. लोकमान्य टिळक यांचीं भाषणें ऐकलीं असतील किंवा कै ह. भ. प. पांगारकर यांचीं रसाळ व भक्तिपर प्रवचनें श्रवण केलीं असतील, त्यांना ते आपल्या नकलांच्या भूमिकेंतून पुन्हा ह्या दिवंगत व्यक्तींचें या भूमीवर दर्शन घडवितात. हा कांहीं सामान्य गुण नव्हे. ही एक ईश्वरदत्त देणगी आहे.

: ८ :

## अभिजात अभिनयपटु–भोंडे

**नटसम्राट केशवराव दाते**

श्री. भोंडे हे नुसते नकलाकार नसून ते एक अभिजात अभिनयपटु नट आहेत. त्यांच्या कलेंत इतर नकलाकारांप्रमाणें चेष्टा नसून व्यक्तिदर्शन असतें म्हणूनच ते श्रेष्ठ कलाकार होत. भोंडे टिळकांसारखे अगर दुसऱ्या एखाद्या व्यक्तीप्रमाणें हुबेहुब आपल्याला दिसतात ही जी आपल्या मनाला भूल पडते, त्याचें कारण त्यांनीं केलेली बाह्य वेषभूषा एवढेंच नाहींतर त्या त्या व्यक्तींचीं शारीरिक व्यंगें व लकबी हीं त्यांना आंतरिक भावनेनें समजतात व लगेच तीं त्यांच्या शरीराचा ताबा घेतात. ही आंतरिक समज म्हणजेच इन्स्टिंक्ट, जीनियस किंवा प्रतिभा म्हणा. आपल्या कौशल्यानें व मेहनत करून गोपाळ-रावांनीं अनेक मोठमोठ्या व्यक्तींचीं दर्शनें लोकांना करवलीं आहेत व त्यांत त्यांच्या तोडीचा असा कलाकार मीं तरी निदान पाहिला नाहीं. श्री. गोपाळ-रावाची कला इतकी अभिजात आहे कीं, चित्रपटरूपानें तिचें जतन करून ठेवलें तर महाराष्ट्रांतील दिवंगत झालेल्या अनेक थोर व्यक्तींचें अल्पशः

जिवंत दर्शन पुढील पिढ्यांना साध्य होईल. श्री. गोपाळरावांच्या प्रतिभेला व व्यक्तिदर्शनाकरितां त्यांना कराव्या लागणाऱ्या चिंतनाला माझे शतशः धन्यवाद.

: ९ :

## अभिमानास्पद कलावैभव

**श्री बाबा राघवदास ( पाछापूरकर )**, बहरज आश्रम, गोरखपूर (यू. पी.)

अप्पासाहेब भोंडे यांच्या नकलांची कला फार उच्च दर्जाची आहे. त्यांचें जेवढें कौतुक, गौरव, सत्कार करावा तितकें थोडेंच. फारच मोठी कला आपण पहात आहोंत हें जाणून सुद्धां महाराष्ट्र आपलें कर्तव्य बजावत नाहीं, ही खेदाची गोष्ट आहे. तथापि महाराष्ट्र आपलें कर्तव्य बजावील अशी आशा बाळगण्यास अद्यापहि वाव आहे. श्री. ना. सी. फडके यांच्या मार्मिक लेखावरून या प्रसिद्ध कलाकाराचा मोठेपणा आणि कलेचें महत्त्व हें सहज लक्षांत येतें. उत्तर प्रदेशांतील लोकांना भोंडे यांचें नांव व त्यांची कला ऐकून त्याबद्दल अत्यंत अभिमान वाटतो.

: १० :

## या कलेचें संरक्षण करा

**लोकनायक बापूजी अणे** ( माजी गव्हर्नर, बिहार )

अप्पासाहेब भोंडे यांना मी १९-१०-२१ पासून ओळखतों. ते एक नामांकित कलाकार आहेत. महाराष्ट्रांत गेल्या ५० वर्षांत प्रसिद्धीस आलेल्या अनेक नामवंत वक्त्यांची हुबेहूब ते नकल करतात. ती इतकी बेमालूम असते कीं, नक्कल चालली असतांना आपणांसमोर भोंडे उभे नसून जिची नक्कल केली जात आहे ती व्यक्तीच उभी असून बोलत आहे, अशी श्रोत्यांची व प्रेक्षकांची भावना होते. नकलेंत नुसती अवाजाचीच अनुकृति नसते, तर मूळ व्यक्तीच्या वेशभूषेचीहि ते अनुकृति करतात. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते आपल्या चेहऱ्याची ठेवणहि नकलित व्यक्तीच्या रूपास शक्य तितकी

अनुरूप करून टाकतात. सीनिअर रँग्लर परांजपे, लक्ष्मणराव पांगारकर, लोकमान्य बाळ गगाधर टिळक यांच्या वक्तव्यांची नक्कल करतांना त्यांना ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांस माझ्या वरील विधानाचा प्रत्यय आला असला पाहिजे, असें मी खात्रीनें म्हणूं शकतों.

भोंडे यांच्या वयास ७५ वर्षे झालीं. त्यांच्या कांहीं नकला तरी पुढील पिढीस उपलब्ध होतील, अशी व्यवस्था मुंबई सरकारनें करावी. एखाद्या उत्कृष्ट गवयाच्या गायनाचा नमुना जपून ठेवणें हें जितकें कलेचा अभ्यास व उत्कर्ष या दृष्टीनें उपयुक्त आहे, तितकेंच भोंड्यांसारख्या अलौकिक नकलाकाराच्या करामतीचे नमुनेहि शक्य तितके चिरस्थायी करणें हेंहि उपयुक्त आहे, असें कोणाहि कलाभिज्ञास वाटावें असें मला वाटतें. शिवाय लोकमान्य टिळक कसे होते हें समजण्याकरितां जर चरित्रें लिहिलीं जातात, छायाचित्रें व पुतळे मांडले जातात, तर ते कसे बोलत होते व चालत होते याच्या हुबेहुब नकलेचें कां संरक्षण करूं नये? एखाद्या बोलपटाइतकें तरी तें पुढील पिढीस उपकारक ठरावें. अर्थात् ती नक्कल म्हणूनच ठेवावी व दाखवावी लोकांच्या मनांत नक्कल जर अशी, तर अस्सल किती प्रभावी असेल, अशी कल्पना उद्‌भूत होऊन परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं.

आणखी एक सूचना मला श्री. अप्पासाहेब भोंडे यांच्या बाबतींत करावीशी वाटते ती ही कीं, त्यांच्या ह्या लोकोत्तर गुणानें पुणेकरांनीं व महाराष्ट्रीयांनीं ५० वर्षे मनमुराद आनंद लुटला, पण त्यांच्या गुणास अनुरूप असा त्यांचा त्यांच्याकडून सत्कार झाला नव्हता, तो व्हावा. त्याचप्रमाणें सरकारच्या प्रसिद्धि खात्याच्या शिफारशीनें हिंदुस्थान सरकार निरनिराळ्या कलावंतांचा गुणगौरव, पारितोषिकें अथवा पदव्या वगैरे देऊन करीत आहे; त्याचप्रमाणें श्री. अप्पासाहेब भोंडे यांचाहि तशा प्रकारें गुणगौरव सरकारकडून व्हावा व त्यांच्या अभिजात कलापटुत्वावर राज्यमान्यतेचा शिक्का मारला जावा, असें मला वाटतें.

अप्पासाहेबांचा वृद्धापकाळ सुखांत व निश्चित समाधानांत जावो.

: ११ :

## A gifted man indeed

**( डॉ० रँ. परांजपे यांचा अभिप्राय व त्याखाली के० बॅरिस्टर जम्नादास मेहता यांची पसंती )**

I have known Mr. Gopal Vinayak Bhonde for over 40 years and have frequently seen his exquisite imitations. He has a wonderful gift, which enables him to bring before one many personalities long past like Tilak, S. M. Paranjpe, Jinsiwala, Pangarkar, &c. He not only imitates their exterior characteristics of dress, but is able to change his voice in such a way that one who had heard the original many years ago immediately recognises it. Although he imitates the little tricks and mannerisms of eminent persons, he does not do it in such a way as to make them look ridiculous. I myself have also been a subject of his imitative genius; but I enjoy the exhibition almost more than others.

Besides the imitation of notable persons his reportaire contains many humorous incidents and discussions in which he changes his voice to suit two or more different speakers. Thus the Hospital Nurse, or the School Master with a mischievous boy are perfect specimen of imitative arts. It can be truthfully said that Mr. Bhonde has spread more innocent laughter among people than almost any other professional humourist.

Mr. Bhonde is now getting old and I have often thought that it would be worthwhile preserving in the form of a Talkies some records of his imitations, Tilak, Paranjpe and others, died before talking film was envented. Mr. Bhonde's imitations of them will keep their memory green in a manner different from their writings.

I wish Mr. Bhonde many years of health and hope that he will continue to entertain and instruct fresh generations of people.

29-6-44 Sd. R. P. Paranjpye

Approved

**Jamnadas Mehta**

## नकलाकार ? नव्हे ! कलाकार !

**'लोकसत्ता'**, मुंबई

कोणाहि व्यक्तीच्या चालण्याची व बोलण्याची नक्कल करणें ही कांहीं आपल्याकडे फार चांगली गोष्ट समजत नाहींत सामान्यतः नक्कल म्हणजे त्या व्यक्तीची टवाळी, त्या व्यक्तीच्या दोषांचें आविष्करण, असेंच मानण्याचा आपला प्रघात आहे. आणि दैनंदिन व्यवहारांत याच हेतूनें नक्कल केली जाते अथवा होत असते. तोतरा, गेंगाणा, चमत्कारिक आवाजाचा, बोलतांना कांहींतरी लकब असलेला, ठसक्यांत किंवा ठेक्यांत बोलणारा अशा व्यक्तींची ती तीं व्यंगें उघड करून दाखविण्यासाठीं नकलेचा उपयोग करीत असतात आणि "क्षते प्रहारा निपतन्त्यभीक्ष्णम्" या मानवी स्वभावाला अनुसरून व्यंग पाहिल्यावर करमणूक करून घेण्याची प्रवृत्ति अशा व्यंगावर टोंच मारणाऱ्या नकलांना उत्तेजनहि देत असते. नकलांमध्यें ही जी दोषैकदृष्टि आहे, तीमुळेंच कलाक्षेत्रांत नकलांना मज्जाव झाला असला पाहिजे. परंतु श्री. भोंडे यांनीं सामान्य, अव्यंग व माननीय व्यक्तींचें यथार्थदर्शन करण्याच्या कलात्मक हेतूनें या नकलांचा प्रथमच वापर केला ; आणि त्यामुळेंच नकलांना कलात्मक दर्जा प्राप्त करून दिला. त्या त्या व्यक्तींच्या भोंडेकृत नकला पाहिल्या कीं क्षणभर आपण त्या व्यक्तींच्या सहवासांतच आहोंत, असा भास होतो. नकलाकार भोंडे या क्षेत्रांतील अद्वितीय कलाकार आहेत, हें आतां निर्विवाद ठरलेलें आहे. महाराष्ट्रांत बालगंधर्व व नकलाकार भोंडे या व्यक्ति अशा आहेत कीं, त्यांच्या कलेबद्दल 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' असें म्हणूनच स्वस्थ बसावें लागतें.

—दि. २२ जुलै १९५६.

* * *

# महाराष्ट्रांतील अन्य नकलाकार

प्रस्तुतचा ग्रंथ जरी भोंड्यांविषयीं असला तरी सर्व महाराष्ट्रीय नकलाकारांचा उल्लेख येथें करणें आम्हांस अगत्याचें वाटतें. त्यांची यादी सरदार आबासाहेब मुजुमदार, अध्यक्ष, भोंडे सत्कार समिति, यांजकडून आलेली खालीं देण्यांत येत आहे. त्यांपैकीं बहुतेक जण महाराष्ट्रांत प्रसिद्ध असून कांहीं जण वरच्या दर्जाचे कलाकार आहेत. —लेखक

## नकलाकारांची यादी

| नांव व ठिकाण | | नांव व ठिकाण | |
|---|---|---|---|
| नटवर्य अ. ब. धुमाळ, | पुणें. | श्री. मनोहर जोशी, | सोलापूर |
| श्री. भगवान पंडित, | ,, | ,, रा. ग. कुलकर्णी, | विटे |
| ,, बंडोपंत श्रोत्री, | ,, | ,, मा ध बेलवलकर, | कल्याण |
| ,, एच्. जी. घोडके, | ,, | ,, नटेश पेंटर, | नाशिक |
| ,, व्ही. डी. पंडित, | ,, | ,, रणजित बुधकर, | दादर |
| ,, हरिभाऊ भंडारे, | ,, | ,, दा. दा. कोठीवान, | नागपूर |
| ,, कामत बंधू, | दादर | ,, मुकुंदराव पाध्ये, | रामपूर |
| ,, चिं.बा. ओंकार, B.Sc.B.T. | पुणें | ,, डोंगरे, | अकोला |
| ,, गोलिवडेकर, | पुणें | ,, नानासाहेब रेटर, | नागपूर |
| ,, ग. दि. माडगूळकर, | ,, | ,, कृष्णराव वामन ढाळेफळकर, | अ. नगर |
| ,, राजा पंडित, | कोल्हापूर. | ,, सदानंद जोशी, | दादर |
| ,, शाहीर नानिवडेकर, | मुंबई | ,, चंद्रकांत कुमटेकर, | पुणें |
| ,, बी. के. दादरकर, | उरण | प्रो. राजाभाऊ टाकूर, | पुणें |
| ,, कुमारसेन समर्थ, | मुंबई | श्री. विश्वनाथराव पेडणेकर, रेडिओस्टार, | पुणें |
| ,, दीनानाथ टाकळकर, | पुणें | ,, बाळ इंगळे, रेडिओस्टार, | पुणें |
| ,, पतकी, | सोलापूर | ,, सिनेस्टार महमदसाहेब, | पुणें |
| ,, हरिभाऊ गोडबोले, | पुणें | ,, गो. नि. दांडेकर, चित्रपट-कथालेखक, | तळेगांव दाभाडे |
| ,, बापू गाडगीळ, | ,, | श्री. के. बाबूराव खटावकर, | चिंचवड |
| ,, प्रभाकर पोतदार, | दौंड | ,, देसाई, | मुंबई |
| ,, विश्वास फाटे | सोलापूर | | |
| ,, भीमराव क्षीरसागर, | ,, | | |